


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

ISSN 2456-656X

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

एप्रिल ते सप्टेंबर २०१८

## मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळालाच पाहिजे!

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे

मराठी भाषेला

...जात भाषेचा दर्जा मिळालाच पाहिजे

मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी 'मसाप'चा दिल्लीत आवाज!

अनुक्रमणिका










'मसाप'च्या ११२व्या वर्धापनदिन समारंभात ज्ञानपीठ पुरस्कार प्राप्त प्रसिद्ध लेखिका डॉ. प्रतिभा राय यांच्या हस्ते ज्येष्ठ पर्यावरण शास्त्रज्ञ डॉ. माधव गाडगीळ यांना ग्रंथकार पुरस्कार प्रदान.

## ● मसाप सन्मान आणि भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार ●




डॉ. प्रभाकर मांडे यांना 'मसाप सन्मान' आणि राजा शिरगुप्पे यांना 'डॉ. भीमराव कुलकर्णी कार्यकर्ता पुरस्कार' प्रदान करताना डॉ. गो. बं. देगलूरकर आणि परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे

## ● उत्कृष्ट कार्यकर्ता आणि उत्कृष्ट शाखा पुरस्कार ●



सातारा जिल्हा प्रतिनिधी रवींद्र बेडकिहाळ कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना



गिरीश दुनाखे कार्यकर्ता पुरस्कार स्वीकारताना




राजा फडणीस उत्कृष्ट शाखा पुरस्कार स्वीकारताना पिंपरी-चिंचवड शाखेचे कार्यकर्ते

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक क्र. ३६३, एप्रिल ते सप्टेंबर २०१८

संपादक
**डॉ. पुरुषोत्तम काळे**

संपादन समिती
**डॉ. मनोहर जाधव । डॉ. नीलिमा गुंडी । डॉ. भास्कर ढोके**
**डॉ. रणधीर शिंदे । डॉ. वर्षा तोडमल । डॉ. संदीप सांगळे**

प्रकाशक
**प्रकाशक पायगुडे**
प्रमुख कार्यवाह




**महाराष्ट्र साहित्य परिषद**
टिळक रस्ता, पुणे ४११०३०. दूरभाष : ०२०-२४४७५९६३
संकेतस्थळ : www.masapapune.org
ई-मेल : masaparishad@gmail.com
(कार्यालयाची वेळ : स. ९.३० ते १२, दु. ४.३० ते रा. ८)



अनुक्रमणिका












मुद्रक-प्रकाशक
**प्रकाश पायगुडे**
प्रमुख कार्यवाह
महाराष्ट्र साहित्य परिषद,
टिळक रस्ता, पुणे ४११०३०.

जाहिरात व्यवस्थापक
**वि. दा. पिंगळे**
९८८१२३५०३३

संपादकीय संयोजन
**संदीप खाडे**

अक्षरजुळणी व सजावट
**आर्ट ॲडव्हर्टायझिंग**

मुखपृष्ठ
**जयदीप कडू**

मुद्रितशोधन
**अनुश्री भागवत**

मुद्रणस्थळ
**एस.ए. प्रिंटर्स, एल.एल.पी.**
फ्लॅट नं.५, ३रा मजला,
सिद्धीविनायक अपा.,
शिवदर्शन, पुणे ४११००९.

मूल्य : १५ रुपये

प्रकाशन क्र. ३६३
एप्रिल-सप्टेंबर २०१८




# अं | त | रं | ग





अनुक्रमणिका










संपादकीय

**डॉ. पुरुषोत्तम काळे**



# "मराठी भाषेच्या अभिजात दर्जाचे घोडे अडले कुठे?"



हा एप्रिल ते सप्टेंबर या कालावधीतील जोडअंक प्रसिद्ध होत असताना महाराष्ट्रात गणेशोत्सव उत्साहाने साजरा होत आहे. गणपती ही बुद्धीची देवता आहे. संकटांचा नाश करण्यासाठी विघ्नहर्त्याची प्रार्थना श्रद्धावान करतात. या निमित्ताने श्रींकडे मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा यास्तव निर्णयकर्त्यांना बुद्धी दे, अशी प्रार्थना आम्ही करतो. मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषद गेले काही महिने विविध सनदशीर मार्गांनी प्रयत्न करीत आहे. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी कार्यकर्त्यांसह दिल्लीला आंदोलन करून आले. बडोद्याच्या अखिल भारतीय साहित्य संमेलनात मा. मुख्यमंत्र्यांनी साहित्यिकांचे शिष्टमंडळ मा. पंतप्रधानांच्या भेटीला नेऊन हा प्रश्न सोडविण्याचे आश्वासन दिले होते. त्यालाही काही महिने लोटले. या प्रश्नासाठी जेवढा जनमताचा दबाव तयार व्हायला हवा, तेवढा तो झालेला नाही, ही वस्तुस्थिती आहे. पठारे समितीच्या अहवालावर भाषातज्ज्ञांच्या समितीने अनुकूल निर्णय दिल्यानंतरही हा निर्णय केंद्रीय मंत्रिमंडळ घेत नाही. महाराष्ट्राचे प्रतिनिधित्व करणारे मा. मंत्री या प्रश्नावर काहीही बोलत नाहीत, हे निराशाजनक आहे. मुंबईसहित संयुक्त महाराष्ट्र राज्य व्हावे यासाठी झालेल्या आंदोलनप्रसंगी संसदेमध्ये तत्कालीन पंतप्रधान जवाहरलाल नेहरू यांना 'आपल्या मनात मराठी लोकांविषयी दुजाभाव आहे', असे सुनावणाऱ्या आणि अर्थमंत्रिपदाचा राजीनामा देणाऱ्या चिंतामणराव देशमुखांची आम्हाला आठवण येते आहे. मराठी भाषिकांच्या सहनशीलतेचा अंत राज्यकर्त्यांनी न पाहता, राजकारण न करता मराठीला तिचा हक्क द्यावा, यासाठी मराठी भाषिकांनी जनमताचा रेटा लावावा. महाराष्ट्र साहित्य परिषदेने या प्रश्नासाठी न्यायालयात जाण्याचे ठरविले आहे. केंद्रीय मंत्रिमंडळातील महाराष्ट्राच्या सर्व मंत्रिमहोदयांनी हा प्रश्न मा. पंतप्रधानांकडे आणि केंद्रिय मंत्रिमंडळाच्या बैठकीत आग्रहपूर्वक मांडावा असे आम्ही आवाहन करतो. मा. गडकरी, मा. जावडेकर आणि मुख्यमंत्री फडणवीस यांनी हा प्रश्न सोडविण्यात पुढाकार घ्यावा.

हा अभिजात दर्जाचा प्रश्न नेमका काय आहे? तो दर्जा मिळाल्याने काय होईल? त्यासाठी काय केले पाहिजे? या प्रश्नांची चर्चा या अंकातील चार लेखांमध्ये हरी नरके, सुधीर देवरे, शिरीष लांडगे आणि कार्याध्यक्ष मिलिंद जोशी यांनी केली आहे. मा. हरी नरके यांनी पठारे समितीचे समन्वयक म्हणून मोलाचे काम केले आहे. या समितीचा अहवाल त्यांनी परिश्रमपूर्वक तयार करून सादर केल्यालाही पाच वर्षे लोटली. सरकारच्या मराठी भाषेप्रति असलेल्या या अनास्थेचे कारण काय असावे? मराठी संस्कृतोद्भव नाही. हे पुराव्याने या अहवालात सिद्ध केले आहे. राजारामशास्त्री भागवतांनी याविषयी दिलेले साधार पुरावे या अहवालात उल्लेखलेले आहेत. संस्कृताभिमान्यांचा छुपा विरोध





अनुक्रमणिका

मराठीच्या 'अभिजात' दर्जाला असावा, असा संशय आम्हाला येतो आहे. ते काहीही असो, महाराष्ट्राच्या ४८ खासदारांनी मातृभाषेसाठी मा. पंतप्रधानांकडे नेटाने पाठपुरावा करावा. मराठी साहित्यव्यवहाराची आद्य संस्था म्हणून 'महाराष्ट्र साहित्य परिषद' मराठी भाषेच्या अभिजात दर्जाविषयी जे जे करणे शक्य आहे ते करील. सावित्रीबाई फुले विद्यापीठ, पुणे या विद्यापीठाच्या स्थापनेमागील उद्देशही मराठी भाषासंवर्धन हाच आहे. विद्यापीठातील विचारवंतांनी मराठीच्या अभिजात दर्जाविषयीच्या आंदोलनास पाठिंबा द्यावा. महाराष्ट्रातील आणि बृहन्महाराष्ट्रातील मराठी भाषिकांनी या आंदोलनात सहभागी व्हावे.

भारतरत्न मा. अटलबिहारी वाजपेयी यांचे निधन महिन्यापूर्वी झाले. सहिष्णुवृत्तीचे मूर्तिमंत उदाहरण म्हणजे अटलजी! प्रखर राष्ट्रवादी, फर्डे वक्ते, कविहृदयाचे, संवेदनशील. अटलजींच्या निधनाने देश हळहळला. खऱ्या अर्थाने अटलजी statesman होते. पक्ष, विचारधारा या पलीकडे त्यांचे स्मरण भारतीय लोक सदैव करतील. अटलजी उजव्या विचारसरणीचे तर लोकसभेचे माजी सभापती सोमनाथ चटर्जी डाव्या विचारसरणीचे. सोमनाथदांचेही निधन नुकतेच झाले. सोमनाथ चटर्जींनीही वैचारिकतेला पक्षनिष्ठेचे कुंपण कधीही घातले नाही. देशहिताला त्यांनी सर्वोच्च प्राधान्य दिले. या दोघांच्या निधनाने भारतीय राजकारणातील एक आदर्शवादी परंपरेतील दुवा निखळून पडला आहे. हिंदू-मुस्लीम एकतेसाठी सदैव आग्रही असणारे फक्रुद्दिन बेन्नूर, ख्यातकीर्त पुरातत्त्वज्ञ म. के. ढवळीकर आणि नुकतेच निधन पावलेले मराठवाड्यातील प्रसिद्ध कवी तुळशीराम काजे या सर्व दिवंगत व्यक्तींना आदरांजली!

हा अंक जोडअंक म्हणून काढायचा असे कार्यकारिणीच्या बैठकीत ठरल्याने गेला अंक प्रकाशित झाला नाही. याबाबत पत्रिकेच्या वाचकांनी विचारणा करून पत्रिका नियमितपणे प्रकाशित व्हावी, अशी अपेक्षा व्यक्त केली. पत्रिका प्रकाशनाचा खर्च दिवसेंदिवस महागाईमुळे वाढत आहे. म.सा.परिषदेच्या आजीव सभासदांना पत्रिका मोफत पाठवली जाते. जाहिरातीबावत वारंवार आवाहन करूनही जाहिरातींचे प्रमाण नगण्य आहे. पत्रिका आर्थिकदृष्ट्या सक्षम व्हावी यासाठी सभासदांनी म.सा. पत्रिकेला जाहिरात स्वरूपात आणि वैयक्तिक देणग्यांद्वारे आर्थिक मदत करावी, असे आवाहन आम्ही करीत आहोत.

या अंकामध्ये अभिजात मराठी दर्जाबावत सविस्तर माहिती देणारे चार लेख प्रकाशित केले आहेत. मराठीच्या अभिजात दर्जाविषयक शासननियुक्त पठारे समितीचे समन्वयक डॉ. हरी नरके, अहिराणी बोलीचे संशोधक डॉ. सुधीर देवरे, भाषातज्ज्ञ शिरीष लांडगे आणि परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांचे लेख या प्रश्नाच्या सर्व बाजू समजून घेण्यासाठी उपयुक्त ठरतील. म.सा.प. आणि आळंदी देवस्थान ट्रस्ट यांच्या वतीने घेण्यात आलेल्या पहिल्या पसायदान साहित्य संमेलनाच्या अध्यक्षा तारा भवाळकर आणि युवा नाट्य संमेलनाचे अध्यक्ष डॉ. आशुतोष जावडेकर यांची भाषणे साहित्याविषयीचे सखोल चिंतन प्रगट करणारी आहेत. दिवंगत पंतप्रधान 'भारतरत्न' अटलबिहारी वाजपेयी यांच्याविषयीचा डॉ. सु. प्र. कुलकर्णी यांचा लेख कविहृदयाच्या अटलजींचा यथार्थ परिचय करून देतो. लोकसाहित्याचे संशोधक आणि भाष्यकार असलेल्या डॉ. विश्वनाथ शिंदे यांचा 'म्हार महात्म्य' हा जातिपुराणांची वैशिष्ट्ये आणि निर्मितिप्रक्रिया विशद करणारा लेख लोकसाहित्याविषयीची वाचकांची जाण समृद्ध करील. दिवंगत ख्यातकीर्त पुरातत्त्वज्ञ म. के. ढवळीकर यांच्या पुरातत्त्वसंशोधनाविषयीचा अरुणचंद्र पाठक यांचा लेख ढवळीकरांच्या व्यासंगाचा आणि विद्वत्तेचा परिचय करून देतो. 'साहित्य अकादमी' पुरस्कारप्राप्त नवनाथ गोरे यांच्या 'फेसाटी' या कादंबरीच्या भाषाशैलीबाबत भाष्य करणारा प्रा. आवासाहेब शिंदे यांचा लेख धनगरी बोलीची वैशिष्ट्ये स्पष्ट करतो. मा. नवनाथ गोरे यांचे मनःपूर्वक अभिनंदन. श्री. गोरे यांचे मार्गदर्शक प्रा. डॉ. रणधीर शिंदे यांनी नवनाथ गोरे यांना लिहिते केले. लेखक घडविणे हे सोपे काम नाही. प्रा. रणधीर शिंदे यांचेही अभिनंदन! त्यांनी असेच 'लिहिते हात' घडवावेत यासाठी शुभेच्छा! पत्रकार राणा अयुब यांनी लिहिलेल्या 'गुजरात फाईल्स'चा अनुवाद दीपक बोरगावे यांनी सरस केला आहे. या पुस्तकाचा परिचय दयानंद कनकदंडे यांनी करून दिला आहे. 'नवभारत नियतकालिक' हे महाराष्ट्राच्या सामाजिक जडणघडणीचे साक्षीदार आहे. नवभारतमधील स्त्री-प्रश्नांची चिकित्सा हा प्रा. चांगुणा कदम यांचा लेख तत्कालीन स्त्री-प्रश्नविषयक चर्चांची माहिती देणारा आहे.

हा अंक प्रकाशित झाल्यानंतर आपल्या प्रतिक्रियांच्या अपेक्षेत आम्ही राहू. या प्रतिक्रिया जागेअभावी प्रसिद्ध जरी करू शकत नसलो तरी आम्ही त्याची गांभीर्याने दखल घेतो.

आगामी काळात येणाऱ्या दीपावलीच्या सर्वांना शुभेच्छा!

◆

**डॉ. पुरुषोत्तम काळे**
चलभाष : ९४०४९३७७१०
purushottamdkale@gmail.com

(टीप : हा अंक मसापच्या www.masapapune.org या संकेतस्थळावर तसेच डेलीहंट या मोबाइल ॲपवरही उपलब्ध आहे.)



अनुक्रमणिका



लेख

प्रा. हरी नरके





उच्चकुलीन या अर्थाने प्रचलित असलेल्या अभिजात या संकल्पनेला पुढे प्रबोधनकाळात श्रेष्ठ दर्जाचा असा अर्थ प्राप्त होत गेला. केंद्र सरकारने कोणत्याही भाषेला हा दर्जा देण्यासाठी प्रामुख्याने श्रेष्ठता हाच निकष लावलेला आहे. प्राचीनता, श्रेष्ठता, स्वयंभूपणा आणि सलगता हे या दर्जासाठीचे ४ निकष आहेत. मराठी ते सर्व पूर्ण करते, हे आम्ही आमच्या ४३६ पृष्ठांच्या अहवालात ठोस पुराव्यांच्या आधारे सिद्ध केलेले आहे.



# अभिजात मराठी : गेल्या दहा वर्षांचा अथक प्रवास





गेली चार वर्षे मराठीच्या अभिजात दर्जाचा विषय प्रलंबित आहे. ५ फेब्रुवारी २०१५ ला साहित्य अकादमीच्या तज्ज्ञांनी मराठीचा अहवाल मंजूर करावा आणि मराठीला अभिजात दर्जा द्यावा, अशी शिफारस केली. याला आता ४ वर्षे होत आलीयत.

या वर्षाच्या जानेवारी महिन्यात मराठीच्या अभिजात दर्जाबावत आनंदाची बातमी आली होती. भारत सरकारचे सांस्कृतिक मंत्री श्री. महेश शर्मा यांनी लोकसभेत पुढील आश्वासन दिले-

Proposal for grant of classical status to Marathi language is under active consideration of the Government : Culture Minister

Six languages i.e. Tamil, Sanskrit, Telugu, Kannada, Malayalam and Odia have been given status of classical languages. The Criteria adopted by the Government to determine the eligibility of a language for granting classical language status, are as under:

High antiquity of its early texts/ recorded history over a period of 1500-2000 years;

A body of ancient literature/ texts, which is considered a valuable heritage by generations of speakers;

The literary tradition be original and not borrowed from another speech community;

The classical language and literature being distinct from modern, there may also be a discontinuity between the classical language and its later forms or its offshoots.

A proposal for granting of classical status to Marathi language has been received from Marathi Language Department, Government of Maharashtra. The said proposal was placed before the Committee of Linguistic Experts for its consideration. The said Committee recommended the grant of classical status to Marathi language and the said recommendations are under consideration of the Ministry.

However, in the light of several Writ Petitions filed by Shri R. Gandhi in the High Court of Judicature at Madras on the











अनुक्रमणिका

subject, it was decided to wait for the outcome of the said Writ Petitions. The Hon'ble High Court of Judicature at Madras has disposed of the Writ Petitions vide common order dated 08.08.2016 declining to interfere in the matter and disposed of all the petitions. Consequently, the proposal for grant of classical status to Marathi language is again under active consideration of this Ministry.

आता या घटनेला आठ महिने उलटून गेले. पुढचे पाऊल पडलेले नाही.

अभिजातचा पाठपुरावा करण्यासाठी साहित्यिकांना पंतप्रधानांच्या भेटीला आपण घेऊन जाऊ असे आश्वासन बडोद्याला झालेल्या अ.भा.मराठी साहित्य संमेलनात मुख्यमंत्री श्री. देवेंद्र फडणवीस यांनी दिले होते. त्या संदर्भातही काही हालचाल झालेली नाही.

गेली चार वर्षे मराठीच्या अभिजात दर्जाचा विषय का रेंगाळत राहिलेला आहे, याचा आपण जरा शोध घेऊयात.

लोकसभेत बोलताना केंद्रीय सांस्कृतिक मंत्री डॉ. महेश शर्मा यांनी जानेवारी २०१८ मध्ये खालील गोष्टी अधिकृतपणे प्रथमच मान्य केल्या होत्या.

मराठीला अभिजात दर्जा मिळावा यासाठी जो अहवाल आम्ही, प्रा.रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखालील समितीने ५ वर्षांपूर्वी महाराष्ट्र शासनामार्फत भारत सरकारला सादर केलेला होता, त्याची योग्य त्या भाषातज्ज्ञांमार्फत सर्व तपासणी झालेली आहे.

भाषातज्ज्ञांनी पठारे समितीच्या अहवालाला संपूर्ण मान्यता दिलेली आहे.

केंद्र सरकारच्या सांस्कृतिक मंत्रालयाने भाषातज्ज्ञांची ही शिफारस स्वीकारलेली आहे.

मराठीला अभिजात दर्जा देण्याची बाब केंद्र सरकारने सक्रिय विचारार्थ घेतलेली आहे.

हे फार मोठे यश होते.

त्यानंतर केवळ पंतप्रधानांच्या संमतीने हा विषय कॅबिनेटसमोर ठेवून त्याला कॅबिनेटची मंजुरी घेऊन घोषणा करण्याची औपचारिकता बाकी राहिलेली होती.

त्यासाठी गरज होती ती सर्व मराठी भाषकांनी सर्वपक्षीय मराठी राजकारण्यांवर दबाव निर्माण करून, सर्व मराठी नेत्यांनी दिल्लीत आपापले पक्षभेद बाजूला ठेवून मराठीचे लॉबिंग करायला प्रवृत्त करण्याची.

ह्या राजकीय नेत्यांची इच्छाशक्ती का कमी पडतेय?

१६ वर्षांपूर्वी केंद्र सरकारने सर्वप्रथम तमिळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा दिला. पुढे संस्कृत, तेलुगु, कन्नड, मल्याळम आणि ओडिया यांनीही हा दर्जा मिळवला.

उच्चकुलीन या अर्थाने प्रचलित असलेल्या अभिजात या संकल्पनेला पुढे प्रबोधनकाळात श्रेष्ठ दर्जाचा असा अर्थ प्राप्त होत गेला. केंद्र सरकारने कोणत्याही भाषेला हा दर्जा देण्यासाठी प्रामुख्याने श्रेष्ठता हाच निकष लावलेला आहे. प्राचीनता, श्रेष्ठता, स्वयंभूपणा आणि सलगता हे या दर्जासाठीचे ४ निकष आहेत. मराठी ते सर्व पूर्ण करते, हे आम्ही आमच्या ४३६ पृष्ठांच्या अहवालात ठोस पुराव्यांच्या आधारे सिद्ध केलेले आहे.

बोलीभाषांची विविधता हे मराठीचे खरे वैभव असून, त्याचा आपण अभिमान बाळगला पाहिजे. मराठीला ५२ बोलीभाषा आहेत. जिला जास्त ओढे ती नदी मोठी, याच न्यायाने मराठीला रसद पुरवणाऱ्या या सर्व बोली महत्त्वाच्या आहेत. या सर्वच बोलीभाषांतील साहित्य खूप सकस आहे. वैदर्भी, कोकणी, अहिराणी, मालवणी, कोल्हापुरी, मराठवाडी, अशा ५२ बोलींनी मराठीला श्रीमंत केलेले आहे.

बहिणाबाई, उद्धव शेळके, भुजंग मेश्राम, सदानंद देशमुख, रंगनाथ पठारे, व्यंकटेश माडगूळकर, लक्ष्मण गायकवाड, लक्ष्मण माने, राम नगरकर, आनंद विंगकर, राजन गवस, मच्छिंद्र कांबळी, प्र. ई. सोनकांबळे, बा. भ. बोरकर, नामदेव ढसाळ या साऱ्यांमुळेच मराठी समृद्ध झालेली आहे. दलित साहित्याने मराठीला सामाजिक दस्तऐवज देऊन तिला कसदार आणि कलदार केलेले आहे.

अभिजातपणासंबंधी केंद्र सरकारच्या निकषातील साहित्याची आणि भाषेची श्रेष्ठता विचारात घेता, 'गाथा सप्तसती, पादलिप्त, हरिभद्राची समरादित्याची कथा, उद्योतन सुरीची कुवलयमाला, चक्रधरांचे लीळाचरित्र, ज्ञानेश्वरी, तुकारामगाथा, एकनाथांची भारुडे, माझा प्रवास, गावगाडा, घग, कोसला, बनगरवाडी, बॅरिस्टर अनिरुद्ध धोपेश्वरकर, गोलपिठा, शांतता कोर्ट चालू आहे,' हे ग्रंथ इतके चिरेबंदी आहेत की मराठीची श्रेष्ठता स्वयंस्पष्ट आहे. फुले-आंबेडकर, टिळक - आगरकर, राजवाडे-केतकर, राजारामशास्त्री भागवत, प्रबोधनकार ठाकरे यांचे वैचारिक लेखन श्रेष्ठ प्रतीचे आहेच.

राजारामशास्त्री भागवतांच्या संशोधनाचा निष्कर्ष सांगताना दुर्गा भागवतांनी म्हटले आहे, की जुनी माहाराष्ट्री संस्कृतपेक्षा जुनी व खरी जिवंत भाषा आहे हे त्यांनी दाखवले आहे. मराठी संस्कृतोद्भव नाही. ती संस्कृतपेक्षा जुनी भाषा आहे. नात्याने ती संस्कृतची मावशी आहे.

गाथा सप्तशतीतील मराठी, जे महाराष्ट्री प्राकृत या नावाने ओळखले गेले, हरिभद्र, भद्रबाहू, उद्योतन सुरी आदींचे लेखन आणि चक्रधर, ज्ञानेश्वर, चोखा, चोंभा, सावतामहाराज, नामदेव, संत बहिणाबाई, एकनाथ, बखरी, ते फुले-आंबेडकर, अण्णा भाऊ, लोकहितवादी, आगरकर, रानडे, टिळक, विष्णुभट गोडसे, लक्ष्मीबाई टिळक, साने गुरुजी, बेडेकर, भाऊ पाध्ये, नेमाडे, ढसाळ, कोलटकर, चित्रे यांच्या साहित्याची

महत्ता आणि त्यांचे जैविक नाते महत्त्वाचे आहे.

अभिजात मराठी भाषा म्हणजे श्रेष्ठ मराठी भाषा. इथे कुलेजातीवर्ण हे अवघेचि गा अकारण!

अनेक जातिधर्मांचे लोक मराठी बोलतात. अनेक पंथ, धर्म, प्रांत, संस्कृती यांना मराठीने पोटात सामावून घेतलेले आहे. त्यामुळे खांद्यावर मायमराठीची पताका घेतलेल्या साडेबारा कोटींची ती भाषांमाजी भाषा साजिरी आहे.

संत एकनाथ म्हणतात, ती चोरांपासून जन्मलेली नाही. ती हातात जादू असलेल्या कष्टकऱ्यांची-ज्ञानवंतांची भाषा आहे. ही श्रमाची-घामाची, निर्मितीची भाषा आहे. मराठी ज्ञानभाषा आहे. धर्मभाषा आहे. अक्षरभाषा आहे. अजरामर भाषा आहे.

समजा, जगातील सर्व भाषा मेल्या आणि अवघ्या दहाच जगल्या तरी मराठी जगणार आहे हे लक्षात ठेवा. अमृतातेही पैजा जिंकणारी मराठी ही जगातली दहाव्या क्रमांकाची भाषा आहे. मराठीतले कोश वाङ्मय जगात दुसऱ्या क्रमांकाचे आहे. मराठीला स्वतंत्र राज्य आहे. ती राज्यभाषा आहे. तिला २००० वर्षांचा इतिहास आहे. १२ कोटींपेक्षा जास्त लोक मराठी बोलतात. जगातल्या ११२ देशांमध्ये मराठी भाषक राहतात. मराठी ज्ञानभाषा असल्याने जगातले सगळे विषय मराठी सहजपणे आपल्या कवेत घेऊ शकते. हे सगळे निकष एकत्र केले तर मराठी ही जगातली चौथ्या क्रमांकाची भाषा ठरते.

माणूस हा विचारशील प्राणी आहे. प्रत्येक माणूस आपल्या भाषेतून विचार करतो. त्यामुळे मातृभाषा ही माणसाची अस्मिता आणि अस्तित्वखूण असते. माणसाने भाषेच्या माध्यमातूनच आजवर कला, साहित्य, ज्ञान, तत्त्वज्ञान यांची निर्मिती केलीय. साहित्य, विचार, तत्त्वज्ञान यांच्याद्वारे संस्कृतीची जनुकं भाषेच्याच माध्यमातून एका पिढीकडून दुसरीकडे वाहून नेली जातात.

कोणतीही भाषा ही स्थिर नसते. ती सतत प्रवाही असते. बदलती असते. त्यामुळेच एकीकडे बारा कोसांवर भाषा बदलते आणि दरपिढीगणिक भाषेला नवी ऊर्जा मिळत असते. त्याही अर्थाने ती सतत बदलत जाते.

कोणतीही भाषा बालवयातच ज्ञानेश्वरी, लीळाचरित्र आणि विवेकसिंधू यांसारखे जागतिक दर्जाचे ग्रंथ कसे प्रसवू शकेल? आठशे वर्षांपूर्वी मराठीत हे ग्रंथ लिहिले गेले तेव्हा मराठी बालभाषा नव्हती, तर ती एक परिपक्व झालेली समृद्ध भाषा होती.

ज्ञाननिर्मिती, साहित्य, विचार, तत्त्वज्ञान आणि संस्कृतीची त्या आधीची फार मोठी परंपरा मराठीला होती.

मग मराठीतला आद्यग्रंथ कोणता? आणि मराठीचं नेमकं वय किती?

मराठीतला आज उपलब्ध असलेला पहिला ग्रंथ आहे, गाहा सत्तसई- गाथा सप्तसती. गाथा म्हणजे कविता. सातशे लोककवितांचा संग्रह म्हणजे हा ग्रंथ होय. पैठणच्या हाल या सातवाहन राजाने सुमारे दोन हजार वर्षांपूर्वी पन्नास कवींच्या या ७०० कविता संकलित केल्या. संपादित केल्या.

सातवाहनांची राजभाषा मराठी असल्याने त्यांचे जिथे जिथे राज्य होते, तिथे तिथे या ग्रंथाची हस्तलिखिते मिळालेली आहेत. सातवाहनांचे संपूर्ण भारतावर तर राज्य होतेच परंतु पार अफगाणिस्तानपर्यंत राजभाषा मराठीची पताका फडकत होती. म्हणजे मराठीने २००० वर्षांपूर्वीच अटकेपार झेंडे लावलेले होते.

मुळात महाराष्ट्री प्राकृत, महाराष्ट्री अपभ्रंश आणि मराठी या तीन वेगळ्या भाषा नाहीतच. ही एकाच भाषेची तीन वेगवेगळी नावं आहेत. हे सत्य सर्वप्रथम १९३२ साली ल.रा. पांगारकर यांनी उजेडात आणलं.

मराठीची ही तीन नावं मराठीच्या आद्यकाळ, मध्यकाळ आणि अर्वाचीन काळात प्रचलित होती. वेगवेगळ्या काळात रूढ असलेली मराठीची ही नावं पुढे देशी भाषा आणि नागर भाषा म्हणूनही वापरात असल्याचे दिसते.

जुन्या काळात धर्मग्रंथांची भाषा होती संस्कृत, पण तिचा जन्म झाला वैदिक भाषेपासून आणि वैदिकची आई होती वैदिकपूर्व बोली भाषा. हार्वर्ड विद्यापीठाचे डॉ. मायकेल विट्झेल यांनी आपल्या 'ट्रेसिंग दि वैदिक डायलेक्ट्स' या ग्रंथात हे दाखवून दिले आहे.

तेव्हा संस्कृत ही जगातल्या किंवा भारतातल्या सर्व भाषांची मूळ भाषा होती ही सांगितली जाणारी माहिती खरी नाही.

पाणिनीने जेव्हा या भाषेचे व्याकरण लिहिले, तेव्हा तो तिला छंद भाषा म्हणतो. महाराष्ट्री प्राकृत किंवा महारठ्ठी या नावाने दोन-अडीच हजार वर्षांपूर्वी प्रचलित, लोकप्रिय व मान्यताप्राप्त असलेली भाषा ही संस्कृतपेक्षाही जुनी असल्याचे म.म. राजारामशास्त्री भागवत, विदुषी दुर्गा भागवत यांचे आजोबा, यांनी १८८५ सालीच दाखवून दिले होते. त्यांचा 'मराठ्यासंबंधी चार उद्‌गार' हा ग्रंथ जिज्ञासूंनी अवश्य वाचावा. त्यांचा 'मराठीची विचिकित्सा' हाही ग्रंथ महत्त्वाचा आहे. १९२७ साली ज्ञानकोशकार डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर यांनी प्राचीन महाराष्ट्राचा इतिहास दोन खंडात लिहिला. त्यात त्यांनी मराठीचे वय किमान अडीच हजार वर्षे असल्याचे पुराव्यानिशी दाखवून दिलेले आहे.

एक होता कावळा नि एक होती चिमणी... ही प्रत्येक मराठी घरात आजही सांगितली जाणारी गोष्ट आहे. ती पहिल्यांदा ग्रंथात लिहिली गेली ८०० वर्षांपूर्वी. लीळाचरित्रात धानाई नावाच्या हट्टी मुलीला श्री चक्रधरांनी ती सांगितली असली तरी ती त्या आधी हजार-बाराशे वर्षे मराठी लोकजीवनात सांगितली जात होती. ती कथा विलक्षण लोकप्रिय होती.

तमिळ भाषेला अभिजात दर्जा मिळण्यात संगम साहित्याचा मोठा वाटा आहे. हे साहित्य २३०० वर्षे जुने आहे. कावेरी नदीवर धरण बांधले जात असल्याचा प्रसंग त्यात आला आहे. या धरणाच्या कामासाठी जगभरातून तज्ज्ञ मागवण्यात आलेले



अनुक्रमणिका

होते. महाराष्ट्रातील मराठी गवंडी मोठे कुशल असल्याचे वर्णन त्यात आलेले आहे. मराठी जर तेव्हा नसती तर मराठीत बोलणारे गवंडी २३०० वर्षांपूर्वी कुठून आले असते?

शिवनेरी किल्ल्याजवळ सह्याद्रीच्या कुशीत एका लेण्यात एक शिलालेख आहे. तो ब्राह्मी लिपीत आहे. त्यात 'महारठीनो' असा मराठी बोलणाऱ्या लोकांचा उल्लेख आढळतो. अलीकडेच इतिहासकार डॉ. शोभना गोखले यांनी या शिलालेखावर नव्याने संशोधन करून त्याचे वय दोन हजार वर्षांपेक्षा अधिक असल्याचे प्रमाणित केलेले आहे.

'विनयपिटक' हा पाली भाषेतील पवित्र धर्मग्रंथ आहे. तो बिहारमध्ये राजगृहाला सव्वादोन हजार वर्षांपूर्वी लिहिला गेला. त्यात 'महारठ्ठ'चा उल्लेख आलेला आहे. श्रीलंकेतील 'दीपवंश' आणि 'महावंश' या सिंहली लिपीतील दीड हजार वर्षांहून जुन्या ग्रंथांमध्येही हा उल्लेख मिळतो.

इसवी सनाच्या दुसऱ्या शतकात वररुचीने 'प्राकृतप्रकाश' हा व्याकरण ग्रंथ लिहिला. त्यात त्याने शौरसेनी, मागधी, पैशाची व महाराष्ट्री या प्राकृत भाषांचे व्याकरण सिद्ध केले. आधीचे सगळे नियम सांगून झाल्यानंतर शेवटचा नियम सांगताना तो म्हणतो, 'शेषं महाराष्ट्रीवत'. यावरून त्या काळात आपल्या महान आणि विशाल देशाच्या वेगवेगळ्या भागात प्रचलित असलेल्या सगळ्या भाषांना मराठीचे नियम लागू पडत होते. यातून मराठीची प्रतिष्ठा, मान्यता आणि श्रेष्ठता स्पष्ट होते. मराठी या सर्व प्राकृत भाषांचे नेतृत्व करीत होती.

संस्कृत महाकवी कालिदास आणि शूद्रक यांच्या 'शाकुंतल' आणि 'मृच्छकटिक' या नाटकांमध्ये अनेक संवाद मराठीत आहेत. 'महाभारत' या जगप्रसिद्ध महाकाव्यात अनेक मराठी शब्द आलेले आहेत. यज्ञाच्या वेळी पंडितांना मराठीत बोलायला बंदी घालण्यात आल्याची नोंद भागवत यांनी दाखवून दिलेली आहे. संस्कृत ही धर्मभाषा असली तरी हे पंडित खाजगीत मराठीत बोलत असत, हे यातून उघड होते. संत एकनाथांनी 'संस्कृत वाणी देवे केली मग प्राकृत काय चोरापासोनी झाली?' असे संतप्त उद्‌गार काढले होते. विंचू चावला... ही एकनाथांची भारुडाची मराठी आजची अस्सल मराठी असूनही ते तिला प्राकृत म्हणतात कारण महाराष्ट्री प्राकृत हीच मराठी आहे. रघुनाथराव गोडबोले यांनी १८६३ साली प्रकाशित केलेल्या मराठी शब्दकोशाला 'महाराष्ट्रीय भाषेचा कोश' असेच म्हटले आहे, ते यामुळेच.

मराठीवर संस्कृतचा जरूर प्रभाव आहे. मात्र मराठीने संस्कृतकडून जेवढे घेतले, त्याच्या दामदुप्पट परतही केले. मराठीवर इतर प्राकृत भाषा, सगळ्या द्राविडी भाषा आणि पर्शियन यांचाही प्रभाव आहे. मराठीचे स्वतःचे जे अस्सल आहे, ते जगातल्या इतर कोणत्याही भाषेत नाही. जगातल्या अनेक भाषांमध्ये राष्ट्रगीते आहेत. विश्वगीत पसायदान मात्र एकट्या मराठीकडे आहे.

उद्योतनसुरीने इ.स.७७८ मध्ये 'कुवलयमालेत' मराठी माणूस लढवय्या, काटक, शूर, काळासावळा, धट्टाकट्टा आणि भांडकुदळ असल्याचे नमूद केलेले आहे.

महाकवी हरिभद्राचे 'आठव्या शतकातील समरादित्याची कथा' हे मराठी महाकाव्य अभिजात असल्याचे डॉ. ए. एम. घाटगे यांनी प्राकृत शब्दकोशात सप्रमाण दाखवून दिलेले आहे.

मराठी अभिजात आहे हे आता तज्ज्ञांनीही मान्य केलेले आहे.

प्रा. रंगनाथ पठारे समितीच्या सर्व भाषातज्ज्ञांनी चारपाच वर्षे अहोरात्र मेहनत करून हे सर्व पुरावे मिळवले. अभिजात मराठीचा अंतरिम अहवाल आम्ही सहा वर्षांपूर्वीच मराठीत सादर केला होता. जागतिक पातळीवरील भाषातज्ज्ञ हा अहवाल तपासणार असल्याने त्यांच्या सोयीसाठी पठारे समितीने अभिजात मराठीचा अहवाल इंग्रजीत लिहून तो सादर केला. १ वर्ष त्याच्या छाननीत गेलं.

त्यानंतर लेखाच्या सुरुवातीला सांगितलेला घटनाक्रम महत्त्वाचा ठरला.

मराठीला हा दर्जा अधिकृतपणे मिळणे म्हणजे मराठीच्या जागतिक प्रतिष्ठेवर शिक्कामोर्तब होणे. त्यामुळे मराठी माणसाचा न्यूनगंड कमी होईल. मराठी शिकवण्याची सोय देशातील ५०० विद्यापीठांमध्ये होईल. मराठीच्या समग्र विकासासाठी केंद्र सरकारकडून दरवर्षी सुमारे ५०० कोटी रुपये अनुदानरूपाने मिळतील. मराठी शाळा, शिक्षण, शिक्षक यांची दर्जावाढ, वाचन संस्कृती वाढवणे, ग्रंथालये संवर्धित केली जाणे, मराठी पुस्तके स्वस्तात मिळणे, मराठी मुलामुलींना अधिकाधिक रोजगार मिळणे यासाठी या दर्जामुळे खूप मदत होईल.

मराठीचे गोमटे व्हायला अभिजात दर्जा गती देईल.

जी भाषा रोजगार देते, तीच जगते. मराठीची रोजगारक्षमता वाढवण्यासाठी अभिजात दर्जा हा कळीचा विषय बनलेला आहे.

महाराष्ट्र साहित्य परिषद, अ.भा.मराठी साहित्य महामंडळ आणि इतर अनेकांनी या कामी घेतलेला पुढाकार अतिशय महत्त्वाचा आहे.

हे वर्ष निवडणूक वर्ष आहे. जे काम गेल्या पाच वर्षांत झाले नाही, ते होण्याची हीच योग्य वेळ आहे. गरज आहे ती रेटा लावण्याची, तो वाढवित नेण्याची.

आम्ही पठारे समितीच्या वतीने आमचे कर्तव्य केले. मला असा विश्वास वाटतो की, लढवय्या मराठी माणूस आणि आपले राजकीय नेते आपली सगळी ताकद पणाला लावतील आणि मराठीला हा दर्जा मिळवून घेतील.

●

**प्रा. हरी नरके**
समन्वयक- अभिजात मराठी भाषा समिती, महाराष्ट्र शासन.
बी/१२, तेजलकुंज,
करिष्मा इमारतीसमोर, कर्वेरोड,
कोथरूड,पुणे ४११०३८
harinarkegmail.com



अनुक्रमणिका



लेख

**प्रा. मिलिंद जोशी**

# 'मराठी'ला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी 'मसाप' ची लोकचळवळ





**केवळ बघ्याची भूमिका न घेता मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने ऑगस्ट २०१६ पासून लोकचळवळ उभारली. लेखकांची बैठक, पंतप्रधान कार्यालयाला एक लाखाहून अधिक पत्रं पाठविण्याचा उपक्रम, राजकीय इच्छाशक्तीला आवाहन करण्यासाठी केलेला पत्रव्यवहार आणि राजकीय नेत्यांच्या घेतलेल्या भेटी, राजधानी दिल्लीत जाऊन उठविलेला आवाज, प्रसंगी समविचारी व्यक्ती आणि संस्था यांच्या सहकार्याने न्यायालयात जाण्याचा घेतलेला निर्णय हे महाराष्ट्र साहित्य परिषदेचे सारे प्रयत्न महत्त्वाचे आहेत.**

**- प्रा. मिलिंद जोशी**

कार्याध्यक्ष, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे





**अभिजात' दर्जासाठी साहित्यिकांची एकजूट**

मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केंद्र सरकारने तत्काळ कार्यवाही करावी या आग्रही मागणीसाठी २६ ऑगस्ट २०१६ रोजी साहित्य परिषदेत साहित्यिकांची बैठक झाली. मसापच्या पुढाकाराने या बैठकीचे आयोजन करण्यात आले होते. या बैठकीला साहित्य परिषदेचे अध्यक्ष डॉ. रावसाहेब कसबे, अभिजातसाठीच्या समितीचे सदस्य हरी नरके, माजी संमेलनाध्यक्ष डॉ. नागनाथ कोत्तापल्ले, मसापचे पूर्वाध्यक्ष डॉ. प्र. चिं. शेजवलकर, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठाचे मराठी विभाग प्रमुख डॉ. अविनाश सांगोलेकर, ज्येष्ठ कवयित्री डॉ. अरुणा ढेरे, डॉ. रामचंद्र देखणे, 'साधना'चे संपादक विनोद शिरसाट, भारत सासणे, लक्ष्मीकांत देशमुख, प्र. ना. परांजपे, डॉ. न. म. जोशी, डॉ. प्र. ल. गावडे, डॉ. राजा दीक्षित, डॉ. मेधा सिधये, ह. मो. मराठे, रमण रणदिवे, मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, प्रकाशक परिषदेचे अध्यक्ष अरुण जाखडे, अनिल कुलकर्णी, अंजली कुलकर्णी, अनिल गुंजाळ, नाट्य परिषदेचे दीपक रेगे, चित्रपट महामंडळाचे अध्यक्ष मेघराजराजे भोसले, प्रमोद आडकर, माधव राजगुरू, उद्धव कानडे, वि. दा. पिंगळे, बंडा जोशी, डॉ. सतीश देसाई, डॉ. अरविंद संगमनेरकर उपस्थित होते. या बैठकीत हरी नरके यांनी मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळण्यासंदर्भात समितीने केलेल्या कामाची माहिती उपस्थितांना सांगितली. त्यानंतर उपस्थित सर्व मान्यवरांनी









आपापली मते व्यक्त केली.

मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्र शासनाने तीन वर्षांपूर्वीच केंद्र शासनाला अहवाल सादर केलेला आहे. ज्या चार निकषांच्या आधारे भाषेला अभिजात भाषेचा दर्जा दिला जातो, त्याचे सबळ पुरावे दिलेले आहेत. केंद्र सरकारने साहित्य अकादमीकडे हा अहवाल तपासणीसाठी पाठवलेला होता. ५ फेब्रुवारी २०१५ रोजी साहित्य अकादमीच्या भाषा समितीने सर्वानुमते मराठीला अभिजात भाषेचा दर्जा द्यावा, अशी लेखी शिफारस केलेली आहे. केंद्र सरकारच्या विविध विभागांनी या अहवालाची छाननी करून अनुकूल अभिप्राय दिलेला आहे. आता केंद्र सरकारने (कॅबिनेटने) तत्काळ मंजुरी देऊन मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा देत असल्याची घोषणा करावी अशी आग्रही मागणी या बैठकीत करण्यात आली. तसेच पंतप्रधान नरेंद्र मोदी यांना साहित्यिकांच्या स्वाक्षरीचे निवेदन पाठविण्याचा निर्णय घेण्यात आला.

या बैठकीत तातडीच्या आणि दीर्घकालीन कृतिआराखड्याची चर्चा करण्यात आली.

**कृतिआराखडा :**

१) महाराष्ट्रातील शाळा, महाविद्यालयातील विद्यार्थी आणि प्राध्यापकांनी तसेच ग्रंथालयातील वाचकांनी आणि सामान्य नागरिकांनी मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा या संदर्भात पंतप्रधानांना पत्र पाठवावे यासाठी मसापने पुढाकार घ्यावा.

२) साहित्य महामंडळातही हा विषय ऐरणीवर आणावा. बृहन्महाराष्ट्रासह इतर साहित्य संस्थांनाही आवाहन करावे.

३) भाषा आणि संशोधनविषयक काम करणाऱ्या संस्थांनाही या अभियानात सहभागी करून घ्यावे.

४) माहिती तंत्रज्ञान क्षेत्रात काम करणाऱ्यांनीही ई-मेल द्वारे या अभियानात सहभागी व्हावे यासाठी त्यांना आवाहन करावे.

५) मराठी आमदार, खासदार आणि केंद्रीय मंत्री यांनाही निवेदने देऊन पाठपुराव्याचा आग्रह करावा.

६) सामाजिक दबाव वाढावा यासाठी सामान्य लोकांचा या अभियानातला सहभाग वाढवावा.

**पंतप्रधान कार्यालयाला एक लाख पत्र पाठविण्याचा उपक्रम :**

मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा या संदर्भात पंतप्रधानांना पत्र पाठविण्याच्या उपक्रमात साहित्य परिषदेच्या आवाहनाला सकारात्मक प्रतिसाद देत समाजातील अनेक लोक, शाळा तसेच महाविद्यालयातील विद्यार्थी, प्राध्यापक व सेवक सहभागी झाले. मसापच्या सातारा जिल्ह्यातील शाहूपुरी शाखेने एक लाखाहून अधिक पत्रं पंतप्रधान कार्यालयात पाठविली. या उपक्रमाचे उद्घाटन अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळाचे अध्यक्ष डॉ. श्रीपाद भालचंद्र जोशी यांच्या हस्ते सातारा येथे झाले. मसापच्या इतर सर्व जिल्ह्यांतील शाखांनीही हा उपक्रम यशस्वीपणे राबविला. त्याचप्रमाणे महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या वतीने महाराष्ट्रातील ४८ खासदारांना त्यांनी संसदेत मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा, यासाठी आवाज उठवावा म्हणून त्यांना पत्र पाठविण्यात आले.

**मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांची भेट**

४ मे २०१७ रोजी मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस भिलार येथे पुस्तकाच्या गावाच्या उद्घाटनासाठी येणार होते. मुख्यमंत्र्यांनी पंतप्रधान कार्यालयाकडे पाठपुरावा करावा आणि या संदर्भात महाराष्ट्र शासनाची भूमिका जाहीर करावी यासाठी भिलारच्या उद्घाटन कार्यक्रमात मुख्यमंत्र्यांना काळे झेंडे दाखविण्याचा निर्णय मसापच्या सातारा जिल्ह्यातील कार्यकर्त्यांनी घेतला. त्यानंतर मुख्यमंत्र्यांनी महाबळेश्वर येथे हॅलिपॅडवर मसापच्या शिष्टमंडळाला भेटीसाठी बोलावले. मसापचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या नेतृत्वाखाली मुख्यमंत्र्यांना भेटलेल्या या शिष्टमंडळात सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी, रवींद्र बेडकीहाळ, कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे, कार्यवाह वि.दा. पिंगळे, हरीश पाटणे यांचा समावेश होता. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्र शासन प्रयत्नशील असून व्यक्तिशः मी यासाठी पाठपुरावा करेन असे आश्वासन मुख्यमंत्र्यांनी दिले.

**'अभिजात'साठीची कृतिशील कार्यवाही विचाराधीन**

**पंतप्रधान कार्यालयाचे मसाप कार्याध्यक्षांना पत्र**

'मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केंद्र सरकारकडे पाठपुरावा करण्यात मसापने पुढाकार घेतला. त्यासाठी लोकचळवळ उभी केली. लेखकांची बैठक, पंतप्रधान कार्यालयाला शाखांमार्फत पाठविलेली एक लाखाहून अधिक पत्रे, मुख्यमंत्र्यांनी या प्रश्नाबाबत भूमिका घ्यावी यासाठी मसाप शिष्टमंडळाने घेतलेली आक्रमक भूमिका, मसापच्या वतीने सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी यांनी सातत्याने केलेला



अनुक्रमणिका



पत्रव्यवहार यामुळे धूळ खात पडलेल्या अभिजात साठीच्या प्रस्तावावर कार्यवाही सुरू झाली. सहा महिन्यांपूर्वी मसाप ने पाठविलेल्या पत्राला उत्तर देताना मद्रास उच्च न्यायालयातील याचिका निकाली निघाल्याने सांस्कृतिक कार्यालयाला सुधारित कॅबिनेट नोट तयार करण्यासाठी आदेश देण्यात आल्याचे कळविण्यात आले होते. पण त्यानंतर सहा महिन्यात कोणतीच ठोस कार्यवाही न झाल्यामुळे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी ८ डिसेंबर रोजी पंतप्रधान कार्यालयाशी पत्रव्यवहार करून नवीन वर्षात मराठी भाषादिनापूर्वी मराठीला अभिजात भाषेचा दर्जा देण्यासाठी ठोस आश्वासन द्यावे अन्यथा जानेवारीत दिल्लीत मराठीप्रेमींसमवेत धरणे आंदोलन करण्याचा इशारा दिला होता, तसे पत्रही पंतप्रधान कार्यालयाला पाठविले होते. या आंदोलनात छत्रपती घराण्याचे वारसदार या नात्याने सहभागी होण्याचा निर्णय साताऱ्याचे आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले यांनी पत्रकार परिषद घेऊन जाहीर केला होता. परिषदेच्या पत्राला उत्तर देताना मराठीला अभिजात भाषेचा दर्जा देण्यासाठीच्या कृतिशील कार्यवाहीसाठी केंद्र सरकार विचाराधीन असल्याचे कळविण्यात आले. या संदर्भात पंतप्रधान कार्यालय पोर्टल (PMOPG/D/2017/0589953 dated 20/12 /2017) वर माहिती देण्यात आली.

**केंद्रीय मंत्री नितीन गडकरी यांची भेट**

मसाप कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले, सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी, मसाप पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे, अविनाश कदम, डॉ. सचिन जाधव, सुरेंद्र वारद यांनी केंद्रीय मंत्री नितीन गडकरी यांची त्यांच्या मुंबईतील निवासस्थानी ११ जानेवारी २०१८ रोजी भेट घेतली.

मराठी भाषेला अभिजात दर्जा देण्यासाठीचे सर्व सोपस्कार पूर्ण झाले असून आता केवळ केंद्रीय मंत्रिमंडळाच्या मंजुरीची आवश्यकता आहे. त्यासाठी आपण पुढाकार घ्यावा. या साहित्य परिषदेच्या आवाहनाला सकारात्मक प्रतिसाद देत मराठीला 'अभिजात' दर्जा मिळावा, यासाठी पूर्ण प्रयत्न करेन असे आश्वासन केंद्रीय भूपृष्ठ, वाहतूक व नौवाहन मंत्री नितीन गडकरी यांनी महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शिष्टमंडळाला दिले.

**मसाप तर्फे अभिजातसाठी माजी मुख्यमंत्री पृथ्वीराज चव्हाण यांना निवेदन**

मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी महाराष्ट्राचे माजी मुख्यमंत्री पृथ्वीराज चव्हाण यांनी व्यक्तिशः पाठपुरावा करावा यासाठी त्यांची ९ जानेवारी २०१८ रोजी भेट घेऊन कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी साहित्य परिषदेतर्फे त्यांना पत्र दिले. सोबत ज्येष्ठ पत्रकार पी. साईनाथ, ज्येष्ठ कवयित्री डॉ. अरुणा ढेरे आणि पुणे जिल्हा प्रतिनिधी डॉ. सतीश देसाई उपस्थित होते. पृथ्वीराज चव्हाण यांनी तत्काळ केंद्रीय मंत्री प्रकाश जावडेकर यांना फोन लावून त्यांच्याशी या संदर्भात चर्चा केली.

**मनसे अध्यक्ष राज ठाकरे यांना निवेदन आणि भेट**

औदुंबर (जिल्हा सांगली) येथे कवी सुधांशु जन्मशताब्दी आणि पंचाहत्तरावे औदुंबर साहित्य संमेलन १२ ते १४ जानेवारी २०१८ या कालावधीत संपन्न झाले. १४ जानेवारीला समारोपाच्या कार्यक्रमात मसाप कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी आणि मनसे अध्यक्ष राज ठाकरे एका व्यासपीठावर होते. त्यापूर्वी कवी सुधांशु यांच्या घरी झालेल्या चर्चेत प्रा. जोशी यांनी मसाप ने मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केलेल्या प्रयत्नांची माहिती राज ठाकरे यांना दिली. 'मन की बात' करणाऱ्यांकडून मराठीला अद्याप अभिजात भाषेचा दर्जा मिळालेला नाही. आपण 'मनसे' बात करून हा विषय मार्गी लावावा असे प्रा. जोशी यांनी आपल्या जाहीर भाषणात सांगितले. तसेच राज ठाकरे यांना निवेदनही दिले.

**सांस्कृतिक मंत्री विनोद तावडे यांना निवेदन अणि भेट**

१९ जानेवारी २०१८ रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद, अखिल भारतीय मराठी प्रकाशक संघ आणि अखिल भारतीय मराठी साहित्य महामंडळ यांच्या वतीने आयोजित लेखक-प्रकाशक कार्यशाळेच्या उद्घाटनासाठी सांस्कृतिक मंत्री विनोद तावडे आले होते. महाराष्ट्र शासनाने मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी केंद्र शासनाकडे पाठपुरावा करून आग्रही भूमिका घ्यावी, असे पत्र कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, कोषाध्यक्ष सुनिताराजे पवार यांनी मसापच्या वतीने विनोद तावडे यांना दिले.

**राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांना आवाहन**

२२ जानेवारी २०१८ रोजी मसापच्या वतीने बडोदा संमेलनाच्या स्वागताध्यक्ष आणि बडोद्याच्या महाराजा सयाजीराव गायकवाड विद्यापीठाच्या कुलपती राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांचा डॉ. डी.वाय. पाटील





विद्यापीठाचे कुलपती डॉ. पी.डी. पाटील यांच्या हस्ते सत्कार करण्यात आला. पंतप्रधान नरेंद्र मोदी यांच्या लोकसभेच्या उमेदवारी अर्जावर आपण स्वाक्षरी केली होती. बडोदा संमेलनाच्या निमित्ताने आता आपण मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठीच्या परवानगी पत्रावर पंतप्रधानांची स्वाक्षरी घ्यावी. असे आवाहन कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांनी केले. त्याला प्रतिसात देत 'मी नक्की प्रयत्न करेन' असे आश्वासन राजमाता शुभांगिनीराजे गायकवाड यांनी दिले.

**अभिजात साठी मसापचा दिल्लीत आवाज**

मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा याकडे केंद्र सरकारचे लक्ष वेधण्यासाठी महाराष्ट्र साहित्य परिषदेने दिल्लीत धरणे आंदोलनाचा इशारा दिला होता पण दिल्ली पोलिसांनी परवानगी नाकारल्यामुळे साहित्य परिषदेच्या कार्यकर्त्यांनी मराठी भाषेला अभिजातचा दर्जा देण्याची सदसद्विवेकबुद्धी केंद्र सरकारला मिळावी यासाठी महाराष्ट्र सदनातील शिवछत्रपतींच्या पुतळ्यासमोर २६ जानेवारी २०१८ रोजी प्रार्थना केली आणि 'जय भवानी जय शिवाजी'च्या घोषणांनी परिसर दुमदुमून गेला. स्वातंत्र्यानंतरच्या सत्तर वर्षांच्या कालखंडात महाराष्ट्रातील एखाद्या साहित्यसंस्थेने भाषिक प्रश्नासाठी थेट राजधानी दिल्लीत जाऊन आवाज उठविण्याची ही ऐतिहासिक घटना होती. महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, साताऱ्याचे आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले, मसाप सातारा जिल्हा प्रतिनिधी विनोद कुलकर्णी, रवींद्र बेडकीहाळ, पुणे जिल्हा प्रतिनिधी राजन लाखे, लेखक राजेंद्र माने, डॉ. उमेश करंबळेकर यांच्यासह अनेक मराठीप्रेमी यावेळी उपस्थित होते. दिल्लीत साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी आणि आमदार शिवेंद्रसिंहराजे भोसले यांच्यासह मसाप कार्यकर्त्यानी केंद्रीय मनुष्यबळ विकास मंत्री प्रकाश जावडेकर यांची त्यांच्या निवासस्थानी भेट घेऊन त्यांना अभिजातचा विषय मार्गी लावण्यासाठी पुढाकार घेण्याचे आवाहन केले. त्याला जावडेकरांनी सकारात्मक प्रतिसाद दिला.

**न्यायालयात जाण्याचा निर्णय**

मराठीच्या अभिजात दर्जासाठी मसापने दिल्लीत जाऊन आवाज उठवल्यानंतर पंतप्रधान कार्यालयाशी सातत्याने केलेल्या पत्रव्यवहाराला 'कृतिशील कार्यवाही विचाराधीन' एवढेच ठोकळेबाज उत्तर मिळत आहे. बडोदा येथे १६, १७, आणि १८ फेब्रुवारी २०१८ रोजी झालेल्या ९१ व्या अ.भा. मराठी साहित्य संमेलनाच्या उद्घाटनासाठी मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस आले होते. अभिजात दर्जासाठी लवकरच साहित्यिकांचे शिष्टमंडळ घेऊन पंतप्रधानांच्या भेटीसाठी जाण्याचे आश्वासन मुख्यमंत्री देवेंद्र फडणवीस यांनी दिले. सहा महिने झाले तरी कोणतीही ठोस कार्यवाही झाली नाही. मराठीला अभिजात भाषेचा दर्जा देण्यासंदर्भात केंद्रीय मंत्रिमंडळात कोणती कार्यवाही झाली, असे माहितीच्या अधिकारात विचारले असता गोपनियतेचे कारण पुढे करत माहिती देण्यात आली नाही. नोव्हेंबर अखेरपर्यंत मुख्यमंत्र्यांनी शिष्टमंडळासह पंतप्रधानांची भेट न घेतल्यास समविचारी व्यक्ती आणि संस्था यांच्या सहकार्याने 'अभिजात'साठी प्रसंगी न्यायालयात जाण्याचा निर्णय मसापच्या २९ ऑगस्ट २०१८ रोजी झालेल्या कार्यकारी मंडळाच्या तसेच वार्षिक सर्वसाधारण सभेत घेण्यात आला. या संदर्भात पंतप्रधान नरेंद्र मोदी यांना नुकतेच पत्र पाठविण्यात आले असून त्यांनी ३ महिन्यात मराठीला अभिजात भाषेचा दर्जा देण्याचा निर्णय घ्यावा, असे आवाहन करण्यात आले आहे.

**विशेष नोंद**

- मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी ज्येष्ठ नेते शरद पवार यांनी पंतप्रधानांची भेट घेऊन त्यांना पत्र दिले.
- खासदार श्रीरंग बारणे यांनी अभिजात साठी संसदेत आवाज उठवला. लोकसभा अध्यक्ष सुमित्रा महाजन यांनीही त्यास अनुकूलता दर्शवली
- मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी साहित्य परिषदेने उभारलेल्या लोकचळवळीला 'अभिजात'साठीच्या समितीचे अध्यक्ष आणि साहित्यिक रंगनाथ पठारे यांनी पाठिंबा देऊन कार्यकर्त्यांचे बळ वाढविले.
- या चळवळीत मसाप कार्यकारी मंडळाचे सर्व सदस्य, तसेच नंदकुमार सावंत, ॲड. चंद्रकांत बेबले, संतोष यादव, संजय माने, वजीर नदाफ, किशोर बेडकिहाळ, अविनाश कदम, अशोक मोहिते, जयेंद्र चव्हाण, राजू भोसले, फिरोज पठाण, सचिन सावंत, अविनाश बाचल, संदीप खाडे, ज्योत्स्ना नांदगिरीकर, भारती निनगुरकर, पराग कुलकर्णी यांचे मोलाचे सहकार्य लाभले.

●

**प्रा. मिलिंद जोशी**
मोबाइल : ९८५०२७०८२३









लेख

डॉ. सुधीर रा. देवरे

# मराठी अभिजात भाषा आहेच!





मराठी भाषेचा उगम संस्कृत भाषेपासून झाला नसून ती पूर्ववैदिक बोलींमधून तयार झाली, असे संशोधन अठराव्या शतकातच राजारामशास्त्री भागवत यांनी करून ठेवले आहे. संस्कृत भाषा तयार होण्याआधी वैदिक भाषा अस्तित्वात होती. या सूत्राने मराठी भाषेचे वय दोन हजार वर्षांपेक्षा जास्त ठरते. दुसऱ्या शतकातील 'वररूचीचे व्याकरण' या ग्रंथात मराठी व्याकरणाचे नियम सांगितले आहेत. याचा अर्थ दुसऱ्या शतकात मराठी भाषा अस्तित्वात होती. अडीच हजार वर्षांपूर्वीच्या 'विनयपिटक' या पाली भाषेतील धर्मग्रंथात 'महारठ्ठ' उल्लेख आढळतो, हे या भाषेच्या अस्तित्वाचे प्रमाण आहे. श्रीलंकेतील सिंहली भाषेतील 'दीपवंश' ग्रंथात 'महारठ्ठ', 'महाराष्ट्र' शब्द आढळतात, त्या अर्थी हा प्रदेश आणि भाषा त्या काळी अस्तित्वात असल्याचे पुरावे मिळतात.





राठी भाषेला केंद्र शासनाकडून अभिजात भाषेचा दर्जा मिळावा यासाठी सात वर्षांपासून महाराष्ट्र शासन आणि मराठी साहित्य जगतातून प्रयत्न सुरू आहेत. ते प्रयत्न तीन-चार वर्षांपूर्वी बहुतांशपणे यशस्वीरीत्या पूर्ण झाल्याचे समजले जात होते. आणि मराठी भाषेला अभिजात दर्जा मिळाल्याची आनंदाची बातमी लवकरच दिल्लीहून प्रसारीत होईल अशी अपेक्षा त्या वेळी केली जात होती. (मात्र दिवसेंदिवस ती आशा आता मावळत चालल्याचे लक्षात येत आहे.) मराठी भाषेला असा अभिजात दर्जा मिळाला तर मराठीच्या विकास-अभिवृद्धीसाठी केंद्र सरकारकडून महाराष्ट्र शासनाला दरवर्षी तीनशे ते पाचशे कोटी रुपयांचे अनुदान मिळणार आहे, भाषा संवर्धनासाठी ही जमेची बाजू. आपल्यासाठी मराठी ही या आधीही अभिजात भाषा होती आणि यापुढेही राहणार आहे. पण केंद्र सरकारकडे अभिजाततेचा दावा करून हे सिद्ध करण्याचे काम महाराष्ट्र शासनाला करावे लागणार होते. ते काम त्यांनी एका अभ्यास समितीकडे सोपवून केले होते. समितीनेही आपले योगदान देत प्रकल्पात आवश्यक त्या निकष-अटींची पूर्तता करून शासनाकडे दस्तऐवज सुपूर्द केला होता.

आज जगात मराठी बोलणाऱ्यांची संख्या नव्वद दशलक्ष इतकी असून मराठी भाषा जगातील दहाव्या क्रमांकाची भाषा समजली जाते. असे असूनही केंद्र सरकार मराठी भाषेला अभिजात भाषेचा दर्जा का देत नाही, असा प्रश्न इथल्या साहित्य जगतासह, शासनासह सर्वसामान्य पण जाणत्या मराठी लिहित्या बोलत्या माणसाला पडणे स्वाभाविक होते. परंतु नवी दिल्लीतील केंद्र शासनाच्या अखत्यारीत असलेल्या सांस्कृतिक मंत्रालयाने भाषेच्या अभिजाततेसाठी काही निकषांसह अटी घातल्या होत्या. अशा अटी पूर्ण झाल्या, की त्या विशिष्ट भाषेला अभिजात भाषेचा दर्जा दिला जातो आणि त्या भाषेच्या अभिवृद्धीसाठी दरवर्षी तीनशे ते पाचशे कोटी रुपयांचे अनुदान केंद्र सरकार त्या भाषेच्या शासनाला देते. आतापर्यंत तमिळ, तेलगू, कन्नड, संस्कृत, मल्याळम व उडीया अशा एकूण मोजक्याच सहा भाषांना केंद्र शासनाने अभिजात भाषेचा दर्जा दिला आहे. मराठीला हा दर्जा यदाकदाचित पुढे मिळाला तर मराठी ही देशातली सातवी अभिजात भाषा ठरेल. मराठी भाषेने जवळजवळ त्यासाठीच्या सर्व अटींची लिखित पूर्तता याआधीच (२०१३ ला) केंद्र शासनाकडे केली आहे.

केंद्रीय संस्कृती मंत्रालयाकडून कोणतीही भाषा अभिजात ठरविण्यासाठीचे प्रमुख चार निकष ठरविण्यात आले असून त्यापैकी दोन जास्त महत्त्वाचे आहेत. ते चार निकष सारांश रूपाने पुढीलप्रमाणे आहेत: अ) भाषेची प्राचीनता दीड ते दोन हजार वर्षं जुनी असावी, ब) भाषेची मौलिकता आणि सलगता दिसून यावी, क) भाषिक आणि वाङ्मयीन परंपरेचे स्वयंभूपण- म्हणजेच भाषेत अभिजात ग्रंथ असावेत, ड) प्राचीन भाषा व तिचे आधुनिक रूप यांची सांगड दिसायला हवी.



अनुक्रमणिका

म्हणजे प्राचीन भाषेचे संदर्भ आणि आजची भाषा एकच आहे असे सिद्ध करण्यासाठी त्यात ओढून ताणून आणलेला संबंध दाखविण्यात आलेला नसावा.

वरील सर्व निकष पाहता मराठीला अभिजात भाषेचा दर्जा प्राप्त करणे मुळीच अवघड नव्हते. मात्र त्यासाठी योग्य ते संशोधनात्मक पुरावे महाराष्ट्र शासनाने केंद्र सरकारला सप्रमाण व प्रभावीपणे सादर करायला हवे होते. आणि ते काम शासनाने गठीत केलेल्या साहित्यिक-संशोधक समितीने योग्य आणि प्रभावी पद्धतीने पार पाडले आहे. या कामासाठी महाराष्ट्र शासनाने साहित्यिक, अभ्यासक, संशोधक यांचा एक अभ्यासगट स्थापन केला होता.

मराठी भाषेच्या प्राचीनतेच्या पुराव्यात मात्र आपण स्वत:च तयार केलेल्या सापळ्यात अडकून पडलो आहोत. महाराष्ट्राच्या वाङ्मयीन इतिहासात आपल्याच मराठी इतिहासकारांनी मराठीचा उदय एकदम अलीकडे म्हणजे अकराव्या- बाराव्या शतकात आणून ठेवल्याचे लक्षात येते. मराठीतील 'ज्ञानेश्वरी' हा पहिला पद्यात्मक ग्रंथ आपण मानतो तर महानुभाव पंथाचे 'लीळाचरित्र' आणि इतर ग्रंथ हे पहिले गद्यात्मक लिखाण असल्याचे आपण मराठी साहित्य-सांस्कृतिक इतिहासात सांगत आलो असल्यामुळे आपली मराठी अकराव्या- बाराव्या शतकापासून म्हणजे केवळ आठ नऊशे वर्षांपूर्वी अस्तित्वात आली, असा आपणच इतर भाषिकांचा अनाठायी समज करून दिला होता. तो इतिहास खोडणे ही साधी सोपी गोष्ट नाही.

मराठी भाषेला मौलिकता, अखंडता आणि सलगता तर परंपरेने होतीच. तिच्यात कुठलाही कालिक खंड आढळत नाही. मराठी भाषेत लीळाचरित्र आणि ज्ञानेश्वरीसारखे अभिजात ग्रंथही आहेत. मराठीत प्रकाशित झालेल्या पुस्तकांची संख्या एक लाखापेक्षा अधिक आहे. यातले कमाल पाच हजार ग्रंथ जागतिक स्तरावर गुणवत्तेने श्रेष्ठ ठरवण्याच्या दर्जाचे आहेत. अभिजात याचाच दुसरा अर्थ श्रेष्ठ हा आहे. मराठी भाषेचे आधुनिक रूप हे तिच्या अर्वाचीन रूपापेक्षा वेगळे असले तरी त्यांच्यातले आंतरिक नाते सुस्पष्टपणे अधोरेखित होते. प्राचीन मराठी भाषा आणि तिचे आधुनिक रूप यांची सांगड तिच्या व्याकरणासह सहज घालता येत होती. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरकालीन मराठी भाषा आणि आताची मराठी भाषा, शिवकालीन भाषा आणि आताची भाषा, अठराव्या शतकातली मराठी भाषा आणि आताची मराठी भाषा यात थोडाफार भाषिक फरक असला तरी ती एकच भाषा आहे आणि फक्त भाषाशास्त्राच्या नियमानुसार भाषेच्या कालप्रवाहामुळे तिचे हे बदल आहेत, हे अगदी सहज स्पष्ट होत होते. मुख्य अडचण होती ती मराठी भाषा ही दीड ते दोन हजार वर्षं जुनी आहे हे सिद्ध करण्याची.

मराठी भाषेचा उगम संस्कृत भाषेपासून झाला नसून ती पूर्ववैदिक बोलींमधून तयार झाली, असे संशोधन अठराव्या शतकातच राजारामशास्त्री भागवत यांनी करून ठेवले आहे. संस्कृत भाषा तयार होण्याआधी वैदिक भाषा अस्तित्वात होती. या सूत्राने मराठी भाषेचे वय दोन हजार वर्षांपेक्षा जास्त ठरते. दुसऱ्या शतकातील 'वररूचीचे व्याकरण' या ग्रंथात मराठी व्याकरणाचे नियम सांगितले आहेत. याचा अर्थ दुसऱ्या शतकात मराठी भाषा अस्तित्वात होती. अडीच हजार वर्षांपूर्वीच्या 'विनयपिटक' या पाली भाषेतील धर्मग्रंथात 'महारठ्ठ' उल्लेख आढळतो, हे या भाषेच्या अस्तित्वाचे प्रमाण आहे. श्रीलंकेतील सिंहली भाषेतील 'दीपवंश' ग्रंथात 'महारठ्ठ', 'महाराष्ट्र' शब्द आढळतात, त्या अर्थी हा प्रदेश आणि भाषा त्या काळी अस्तित्वात असल्याचे पुरावे मिळतात. यावरून मराठी भाषेची प्राचीनता किमान दीड- दोन हजार वर्ष जुनी असावी, हा अभिजात दर्जा मिळवण्यासाठीचा निकष मराठी भाषा पूर्ण करत होती. हे सर्व ढळढळीत अधोरेखित करून केंद्र सरकारला पुराव्यासह आपण सादर करणे गरजेचे होते. तसे सुस्पष्ट पुरावे प्रभावीपणे मांडून ते केंद्राला सादर केले गेलेत.

मराठीचा भाषिक प्रवास महारठ्ठी भाषा, मरहठ्ठी, महाराष्ट्री प्राकृत, अपभ्रंश मराठी, आजची मराठी असा झाला आहे. प्राचीन महारठ्ठी भाषा, मरहठ्ठी भाषा, महाराष्ट्री प्राकृत भाषा, अपभ्रंश मराठी भाषा आणि आजची मराठी भाषा असा एकूण मराठीचा प्रवास आहे. या वेगवेगळ्या भाषा नसून मराठी या एकाच भाषेची ती रूपे आहेत, असे ल. रा. पांगारकर यांनी सोदाहरण दाखवून दिले आहे. 'लीळाचरित्र', 'ज्ञानेश्वरी', 'विवेकसिंधू' हे मराठीतले आद्य ग्रंथ नाहीत, तर ते मराठी प्रगल्भ व श्रीमंत झाल्यानंतरचे श्रेष्ठ ग्रंथ आहेत. हे ग्रंथ आठशे वर्षांपूर्वी ज्या मराठी भाषेत लिहिले गेले, ती त्याच्या आधी किमान चौदाशे वर्षे समृद्ध भाषा होती याचे शिलालेख, ताम्रपट, पोथ्या आणि हस्तलिखित ग्रांथिक पुरावे आज उपलब्ध झाले आहेत. मराठीत आज उपलब्ध असलेला आणि दोन हजार वर्षं जुना असलेला ग्रंथ म्हणजे 'गाथा सप्तशती' (अथवा गाथा सत्तसई) हा आहे. दुसऱ्या शतकातील सतरावा सातवाहन राजा व कवी हाल याने हा ग्रंथ लिहिला आहे. पुण्यातील भांडारकर प्राच्य विद्या संशोधन संस्थेकडे सुमारे तीस हजार प्राचीन पोथ्या उपलब्ध आहेत. त्यातील ऐंशी ग्रंथ दीड ते दोन हजार वर्षं इतके जुने आहेत, असे संशोधकांचे म्हणणे आहे. त्यात प्रामुख्याने कालिदासाचे 'शाकुंतल' (चौथे शतक), शूद्रकाचे 'मृच्छकटिक' (सहावे शतक), प्रवरसेनाचे 'सेतुबंध' (पाचवे शतक), भद्रबाहुचे 'नियुक्ती' (तिसरे शतक) आदींचा समावेश आहे. रामायण - महाभारतातही शेकडो मराठी शब्द सापडतात. दोन हजार

वर्षांपूर्वी 'वृहत्कथा' हा पैशाची भाषेतील ग्रंथ गुणाढ्य या मराठी लेखकाने लिहिला आहे. 'विनयपिटक', 'दीपवंश', 'महावंश' या बौद्ध ग्रंथांमध्ये पाली व सिंहली भाषेत महाराष्ट्राचा उल्लेख आलेला आहे. संस्कृत भाषेला संस्कृत हे नाव मिळण्याआधी महाराष्ट्री भाषा अस्तित्वात होती आणि ती प्रगल्भही झालेली होती, असे साधार पुरावे मिळतात. मराठी भाषेतला पहिला शिलालेख २२२० वर्षांपूर्वीचा म्हणजे इसवी सन सुरू होण्याच्या आधीचा आहे. तो ब्राह्मी लिपीतून असून पुणे जिल्ह्यातील जुन्नर जवळच्या नाणेघाटात हा शिलालेख आहे. तसेच मराठीतल्या 'लीळाचरित्र' व 'ज्ञानेश्वरी' या ग्रंथांना या आधीच युनोने अभिजात ग्रंथांचा दर्जा दिलेला आहे. मराठी भाषेच्या भौगोलिक क्षेत्रात पासष्ट प्रकारच्या विविध बोली असून साहित्यात या बोलींच्या उपयोजनेमुळे प्रमाण मराठी दिवसेंदिवस श्रीमंत होत आहे. मराठीतली एक घटकबोली अहिराणी ही इसवी सनाच्या दुसऱ्या-तिसऱ्या शतकापासून बोलली जात असल्याचे पुरावे मिळतात, त्या अर्थी प्रमाणभाषा मराठीही तितकीच जुनी असल्याचे उपलब्ध पुराव्याने सिद्ध होते.

श्री. व्यं. केतकर, राजारामशास्त्री भागवत, रघुनाथ गोडबोले, रामकृष्ण भांडारकर, रावसाहेब मंडलिक, डॉ. वेबर, वि. भी. कोलते, वि. का. राजवाडे, इरावती कर्वे, कृ. पां. कुलकर्णी, दत्तो वामन पोतदार, वि. ल. भावे, रा. भि. जोशी, ल. रा. पांगारकर, द. ग. गोडसे या संशोधकांच्या संशोधनानुसार मराठी भाषेची सुसंगती लावणे सोपे होते. अशी सुसंगती लावण्याचे किचकट काम महाराष्ट्र शासनाने या कामासाठी २०१२ला प्रा. रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखाली स्थापन केलेल्या समितीतील डॉ. श्रीकांत बहुलकर, डॉ. मैत्रेयी देशपांडे, डॉ. कल्याण काळे यांनी केले. आजच्या या अभ्यासक- संशोधकांनी ह्या पोथ्यांमधील मराठी शब्द शोधण्याचे काम केले. समितीने जुन्या पोथ्यांमधून मराठीतले तब्बल सात लाख शब्द शोधून काढलेत. समितीतील प्रा. हरि नरके, आनंद उबळे, सतीश काळसेकर आदींसह भालचंद्र नेमाडे यांनीही या कामासाठी आपले योगदान दिले आहे.

या सगळ्या सरासरी संशोधनानुसार मराठी भाषा किमान इसवी सनाच्या पहिल्या दुसऱ्या शतकाच्या सुमारास बोलीच्या स्वरूपात अस्तित्वात आली असावी, असा उपलब्ध पुराव्यांनी कयास बांधता येतो. असे प्रमाणासहित सिद्ध करण्याचे काम महाराष्ट्रातील साहित्यिकांनी व संशोधकांनी केले आहे. या समितीने एकशे सत्तावीस पानांचा मराठीत तर चारशे पानांचा इंग्रजीत आपला अभ्यासपूर्ण प्रस्ताव महाराष्ट्र शासनाला काही वर्षांपूर्वी (२०१३ला) सादर केला होता आणि तो वेळ न दवडता त्याच वेळी महाराष्ट्र शासनाने केंद्र सरकारला सादर केला होता, असे सांगितले जाते. उपरोक्त चार प्रकारच्या कसोटीत मराठी भाषा कशी बसते, हे सगळे २०१३ साली सप्रमाण प्रभावीपणे नवी दिल्लीतील केंद्र शासनाच्या सांस्कृतिक मंत्रालयाच्या निदर्शनास आणून दिले होते. म्हणून मराठीला अभिजात भाषेचा दर्जा मिळणे आता अवघड नाही आणि दूरही नाही, असा त्या वेळी महाराष्ट्रभर प्रचार झाला होता. मात्र अशी सुखद बातमी अजूनही ऐकायला मिळत नाही.

तीन दाक्षिणात्य भाषांना अभिजात भाषेचा दर्जा दिल्यानंतर केंद्राला संस्कृत भाषा आठवली. युनोने संस्कृत भाषेला अभिजात भाषा ठरवले आहे, मग ती भारतात अभिजात का नाही? असा प्रश्न उपस्थित होऊन घाईघाईने संस्कृत भाषेलाही अभिजात भाषेचा दर्जा देण्यात आला. त्यानंतर अजून दोन भाषांनी अभिजाततेचा दावा केला. तो मान्य झाला. याच वेळी अभिजाततेसाठी मराठीनेही दावा केला. केंद्रीय सांस्कृतिक मंत्रालयाला पुन्हा सुधारित प्रस्ताव पाठवल्याचे महाराष्ट्र शासनाकडून आता सांगितले जाते.

दरम्यान ज्या भाषेला केंद्राकडून अभिजात दर्जा दिला गेला, अशा उडीया भाषेसंदर्भात एक घटना घडली. 'उडीया ही भाषा अभिजात ठरू शकत नाही, म्हणून तिला दिलेला अभिजात दर्जा मागे घेण्यात यावा', अशी एक जनहित याचिका न्यायालयात दाखल करण्यात आल्याची बातमी, तीन वर्षांपूर्वी वाचण्यात आल्याचे आठवते. उडीया भाषेच्या अभिजात दर्जाला- निर्णयाला आव्हान देणारी याचिका गांधी नावाच्या नागरिकाने दाखल केली होती. ती याचिका रद्द ठरवून मद्रास उच्च न्यायालयाने ऑगस्ट २०१७ मध्येच हा खटला फेटाळून लावला.

आता भारतातील प्रत्येक भाषा अभिजात असल्याचा दावा करेल की काय, अशी भीती केंद्राला वाटू लागली असावी. न्यायालयात गेलेला खटला आणि ही भीती अशा काही घटनांमुळे सध्या हे काम बंद पडले असावे की काय, असा निष्कर्ष काढायला जागा आहे. अर्थातच अशा घडामोडींनाही राजकारण म्हणतात.

(लेखक नामवंत साहित्यिक व संशोधक असून भाषा, कला, लोकवाङ्मय, लोकसंस्कृती आणि लोकजीवनाचे संशोधक आहेत.)

●

**डॉ. सुधीर रा. देवरे**
सायास, १८७, टेलिफोन कॉलनी,
पाठक मैदानाच्या पूर्वेला, बसस्थानकामागे,
सटाणा- ४२३ ३०१ जि. नाशिक.
चलभाष : ९४२२२७०८३७, ७५८८६१८८५७
Email : drsudhirdeore29gmail.com



लेख

प्रा. डॉ. शिरीष लांडगे





मराठी भाषेच्या अहवालात २२०० वर्षापूर्वीच्या सातवाहनकालीन नाणेघाटातील शिलालेखाचा संदर्भ येतो. त्यामध्ये 'महारठिनो' (पान१३), 'महरठिनो', 'महारठी' (पान१४) असे तीन वेगवेगळे उल्लेख आले आहेत. हा शिलालेखही ब्राह्मी लिपीतील आहे. नेवासा गावी झालेल्या उत्खननात सातवाहन काळातील जीवन अधिक तपशिलाने प्रकट झाले आहे. येथे सापडलेली काही नाणी चौकोनी तर काही गोल आहेत. त्यावर एका बाजूस ब्राह्मी लिपीतील 'राञो सिरिसातस' व 'राञो सिरिसातसकणिस' असे लिहिलेले आहेत.[*] त्यावरून सातवाहनकालीन नेवाशातील लोकांना ही नाणी आणि भाषा ज्ञात होती, असे म्हणता येते.



# मराठी : प्राचीन अभिजात भाषा



भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी अभिजात भाषेचा दर्जा आवश्यक असतो. हे स्वीकारून महाराष्ट्र शासनाने प्रा. रंगनाथ पठारे यांच्या अध्यक्षतेखाली अभिजात मराठी भाषा समिती नेमली. या समितीने १२७ पानांचा अहवाल ३१ मे २०१३ रोजी पूर्ण केला. अहवालाच्या प्रस्तावनेच्या परिच्छेदात अभिजात मराठी कशासाठी? याविषयी : 'मराठीला हा दर्जा मिळाला तर भाषेच्या सर्वांगीण विकासासाठी केंद्र सरकारकडून भरीव अनुदान मिळते. भाषेची प्रतिष्ठा वाढते. भाषेच्या श्रेष्ठतेवर राजमान्यतेची मोहोर उमटते. भाषेच्या विकासकार्यास अधिक चालना मिळते,'[१] असे नोंदविले आहे, तर अहवालाच्या पहिल्या प्रकरणात अभिजात भाषेचे निकष[२] :

1. High antiquity of its early texts/recorded history over a period of 1500-2000 years.
2. A body of ancient literature / texts, which is considered a valuable heritage by generations of speakers.
3. The literary tradition be original and not borrowed from another speech community.
4. The Classical language and literature being distinct from modern, there may also be a discontinuity between the Classical language and its later forms of its offshoots.

असे नोंदविले आहे. या पार्श्वभूमीवर मराठी भाषा आणि अभिजात भाषा या विषयीच्या तथ्यांचा विचार करू.

भारतामध्ये तमिळ २००४, संस्कृत २००५, तेलुगु व कन्नड २००८, मल्याळम २०१३, ओडिया २०१४ या भाषांना अभिजात भाषेचा दर्जा मिळालेला आहे. असा दर्जा मराठी भाषेला मिळावा यासाठी अनेक वर्षांपासून प्रयत्न सुरू आहेत. या भारतीय भाषा सशक्त होत्या. त्यामुळे या अभिजात भाषांमध्ये श्रेष्ठ दर्जाचे साहित्य निर्माण झाले. कारण या भाषा श्रेष्ठ तर साहित्य श्रेष्ठ असे हे सूत्र आहे.

जगभरामध्ये प्रारंभी फक्त ग्रीक आणि लॅटिन या अभिजात भाषा मानल्या जात. कालांतराने त्यामध्ये संस्कृत, अरबी, चिनी या भाषांना समाविष्ट केले आहे. अभिजात भाषा ही "It should be ancient, it should be an independent tradition that arose mostly on its own, not as an offshoot of another tradition, and it must have a large and extremely rich body of ancient literature"[३] असते, असे मानले जाते.

अशा अर्थाने इंग्लिश, जपानी, जर्मन, रशियन या भाषांना अभिजात भाषा मानले जात नाही. त्यामुळे जगाच्या तुलनेत भारतात अधिक भाषा अभिजात

आहेत! असे चित्र निर्माण होत आहे. ही अभिमानाची की आत्मपरीक्षणाची बाब आहे, याचा विचार केला पाहिजे. याचा अर्थ भारत आणि भारताच्या बाहेर अभिजात भाषांची मानके भिन्न आहेत.

म्हणून अभिजात भाषेचा प्रश्न हा विद्याशाखीय की राजकीय? असा प्रश्न निर्माण होतो. भारतामध्ये तमिळ भाषेला अभिजात भाषेचा दर्जा मिळाला. नंतर एक वर्षाच्या आत संस्कृतला मिळाला. त्यानंतर चार भाषांना अभिजात भाषेचा दर्जा मिळाला. त्या रांगेत आता मराठी, बंगाली, हिंदी असा क्रम वाढू शकतो. असे होण्यामागे एक कारण हे राजकारण दिसते. त्याचे एक उदाहरण सांगता येईल. तमिळला अभिजात दर्जा मिळाला, त्यामागे त्या भाषेचा समृद्ध इतिहास आहे. पण त्याला आणखी एक किनार आहे. स्वातंत्र्यपूर्व काळात सी. राजगोपालाचारी यांनी मद्रास प्रांतात हिंदी अनिवार्य व्हावी, म्हणून प्रयत्न केले. त्याला ई. व्ही. आर. पेरियार यांनी विरोध केला. भाषा आंदोलनाचा हा मुद्दा पुढे अस्मितेच्या राजकारणात परावर्तित झाला. तो थेट तमिळ भाषेला अभिजात भाषेचा २००० वर्षांचा निकष हा १५०० वर्षांवर आणला. काही काळानंतर कदाचित १००० वर्षांचा होईल. म्हणून भारतातील अभिजात भाषेविषयीची मानके बदलती आहेत. त्यामुळे भारतात अभिजात भाषा हा विद्याशाखीय प्रश्न असण्यापेक्षा तो भावनेचा आणि वादाचा मुद्दा झाला आहे.

अभिजात भाषेविषयीच्या एका निकषात भाषेची High antiquity of its early texts/recorded history यांना महत्त्व दिले आहे. त्यासाठी ग्रांथिक आणि कोरीव लेख यांचे पुरावे महत्त्वाचे मानले जातात. मराठीच्या अहवालातही असे संदर्भ घेतलेले आहेत. मात्र, अशा पुराव्यांनी भाषा प्राचीनतम ठरू शकेल काय? Writing is not language, but merely a way of recording language by means of visible marks.' यातील पूर्वार्ध फार महत्त्वाचा आहे. लेखन म्हणजे भाषा नव्हे. कारण, "भाषा ही मुख्यतः बोलली जाते. बोली ही भाषेची मूळ प्रकृती. भाषाभ्यासात किंवा व्याकरण-निबंधनात बोलींनाच महत्त्व दिले पाहिजे." भाषेचे मुख्य रूप हे बोली आहे. मात्र, तिचे रूप शोधता येणे कठीण आहे. त्यामुळे भाषेचे लिखित पुरावे अधिक विश्वसनीय मानले जातात. पण भाषेची तथ्ये नोंदविण्यासाठी ग्रांथिक आणि कोरीव लेख हा एक मार्ग आहे. असे अनेक मार्ग असू शकतात. त्यापैकी काही मार्ग हे भाषाशास्त्र, मौखिक परंपरा, इतिहास, पुरातत्त्वशास्त्र आदींतून शोधले जाऊ शकतात. त्यापैकी काही तथ्ये पाहू.

नेवासा परिसरामध्ये ह. धी. सांकलिया, राजगुरू, अन्सारी, पप्पू, मूर्थी, शां. भा. देव, जी. कॉर्निव्हस आणि इरावती कर्वे यांनी उत्खनन केले आहे. या संशोधनाने सिद्ध केले आहे की, महाराष्ट्रातील मानवी वस्ती दीड लाख वर्षांपेक्षा अधिक प्राचीन आहे. ' आद्य पुराश्मयुगापासून मराठ्यांच्या काळापर्यंतच्या वस्तीचा (पाच संस्कृतींचा पुरावा) सलगपणे पुरावे मिळणारे नेवासे हे महाराष्ट्रातील एकमेव उदाहरण असल्याचे सांकलियांनी सिद्ध केले आहे.

मराठी भाषेच्या अहवालात २२०० वर्षांपूर्वीच्या सातवाहनकालीन नाणेघाटातील शिलालेखाचा संदर्भ येतो. त्यामध्ये 'महारठिनो' (पान १३), 'महरठिनो', 'महारठी' (पान १४) असे तीन वेगवेगळे उल्लेख आले आहेत. हा शिलालेखही ब्राह्मी लिपीतील आहे. (तमिळ भाषेतील पहिला कोरीव लेख हा इसपूर्व ५०० मधील आदिचनल्लूरचा आहे. हा लेखही तमिळ ब्राह्मी भाषेतील आहे.) पैठण ते कल्याण या सातवाहनकालीन व्यापारी मार्गावर नाणेघाट होता. या व्यापारी मार्गावरील नेवासा हे एक महत्त्वाचे गाव होते. या गावी झालेल्या उत्खननात सातवाहन काळातील जीवन अधिक तपशिलाने प्रकट झाले आहे. येथे सापडलेली काही नाणी चौकोनी तर काही गोल आहेत. ही नाणी तांबे, शिसे पोटीन पासून बनलेली आहेत. त्यावर एका बाजूस ब्राह्मी लिपीतील 'राञो सिरिसातस' व 'राञो सिरिसातसकणिस' असे लिहिलेले आहेत.' नाण्यांचा प्रसार कोठेही होऊ शकतो. असे असले तरी ही नाणी नेवासे येथे सापडली. त्यावरून सातवाहनकालीन नेवाशातील लोकांना ही नाणी आणि भाषा ज्ञात होती, असे म्हणता येते.

या नेवासा परिसरामध्ये यादवकाळातील सहा तर मराठा काळातील सात कोरीव लेख सापडले आहेत. या सर्व कोरीव लेखांची भाषा संस्कृत आहे. त्यातील क्वचित काही शब्द मराठी आहेत. विशेष म्हणजे याच यादवकाळात आणि याच परिसरात चक्रधरांनी आणि ज्ञानदेवांनी मराठी भाषा प्रतिपादली. भाषाव्यवहारातील हा विरोधाभास लिखित आणि बोली, राज्यव्यवहार आणि लोकव्यवहार वेगळा असल्याचे स्पष्ट करतो.

या परिसरात आणखीही काही पुरावे सापडतात. येथे सापडलेल्या कोरीव लेखांमध्ये या परिसरातील काही गावे येतात. त्यापैकी पैठण येथे डॉ. फ्लीट यांना राष्ट्रकूट नृपती





अनुक्रमणिका

तृतीय गोविंद याचा ताम्रपट मिळाला. त्याचे संपादन डॉ. एफ. कीलहॉर्न यांनी केले. या लेखाची भाषा संस्कृत आणि लिपी दक्षिण भारतीय वळणाची नागरी आहे. हा ताम्रपट ४ मे ७९४चा आहे. त्यामध्ये येणाऱ्या चतुःसीमांचा अर्थ ब्रह्मानंद देशपांडे सांगताना म्हणतात,[८] संगमतीर्थ म्हणजेच प्रख्यात नृसिंहतीर्थ सावखेड अथवा सावखेडंगा (गंगापूर), धानोरा, ब्रह्मपुरी सापडत नाही. कदाचित लक्ष्मीपुरी असावे. लिंबारामिका हे गळनिंब, साराकच्छ हे सारोळा असे मानतात. देशपांडे म्हणतात, ''ही गावे औरंगाबाद जिल्ह्याच्या गंगापूर तालुका आणि अहमदनगर जिल्ह्याचा नेवासा तालुका यांच्या सीमारेषेवर सापडतात.'' म्हणजे एक हजार वर्षानंतर गावांच्या नावांमध्ये बदल झालेले दिसतात. कीलहॉर्न यांनी वाचन केले. तर त्याचे या परिसराशी अनुबंध देशपांडे यांनी स्पष्ट केले आहे. पण हा अंदाज आहे, त्यात स्पष्टता नाही.

असेच नेवासा येथील कर्णेश्वरचा शिलालेखाचा काळ हा इ. स. १२३९-४०चा आहे.[९] यामध्ये येणारे पांपूविहरि सिमगारे आज सापडत नाही. याउलट यादवसम्राट रामचंद्रदेवाचा पैठण ताम्रपटाचा काळ हा १३ फेब्रुवारी १२७२चा आहे. या शिलालेखात येणारा मजकूर पाहा.[१०]

सेऊणदेशालंकारभूतं गोदावर्युत्तरकूलेस्थितम्
बादाठाणग्रामं पाटारपिंपलग्राम वैद्यघोगरग्राम-
'यथाघाटाः पूर्वतः वाहगावाग्नेये नेऊरगावु
दक्षिणे देईगावु तथा गंगा पश्चिमे गंगा तथा
खातिगावु तथा आलुएंगावु तथा नागमठाण
वायव्ये जांतेगावु उत्तरे पाणिव ईशान्ये वाडखल'

त्यामध्ये येणारी गावांची नावे आजच्या गावांशी जुळतात. पण या कोरीव लेखांमध्ये गावांच्या नावांचे संस्कृतकरण केले आहे. हे पाहता असे म्हणता येईल की, गेल्या हजार वर्षांच्या इतिहासात काही गावांची नावे बदलली, काही नावे लुप्त झाली, तर काही नावांमध्ये स्थित्यंतर आले. हे तथ्य समाजजीवनात होणाऱ्या स्थित्यंतरावर प्रकाश टाकते.

याविषयी आणखी एक उदाहरण थोडक्यात पाहू. या परिसरातील जीवनव्यवहार, प्रथा, सण यांना दीर्घ परंपरा आहे. लीळाचरित्रात[११] नेवाशातील म्हाळसेच्या मंदिरात चक्रधर हे 'माडावरौनी सींपणे अवळोकणें' करतात. तेथे काय होत असते ते पाहा, 'तळीं सींपणे खेळत असतिः माहामघीए तै तेथ सिंपणे होए : कव्हणीं पानें घाली : कव्हणी नार्येळे घाली : काव्हणी थाळे तांबीयें घालीतिं :'' (उ.ली.२३०) असा सिंपणेचा खेळ सुरू असतो. पण हा खेळ कसा आहे? त्याचे स्पष्टीकरण लीळाचरित्राच्या सीमुगां सारंगपंडितांचे सींपणे (उ.ली.२४) या पैठण येथील लीळेत सिंपणेचे तपशिलाने वर्णन येते. ''मग भगतजनां चंदनाचे टिळे लावीले : तांबोळ दीधलीं : मग गोसावीं मेघावणे पागेचा घाटा घेतला : फटेयाचे दोन्ही पालव श्रीमुगुटावरि घातले : गोसावीयांसि सेंदुर ओळगवीले : कापुरु : कस्तुरि : पानें : पोफळें : फुलें : मग गोसावीं होळीएपासि बीजे केलें : गोसावीं स्रीचरणीचेनि आंगुठेनि 'होजे रे : होजे रे :' म्हणौनि राख उधळिली : आणि सींपणे प्रवर्तलें : राख माती चीखलु : ऐसा पाहरू एकु सींपणे जालें :'' लीळेत येणारे सींपणेचे हे वर्णन आजच्या शिमग्याशी नाते सांगते.

शिंपणे हा उत्सव कोकण परिसरात, विशेषतः कसबा-संगमेश्वर परिसरात मोठ्या प्रमाणात साजरा केला जातो. यामध्ये लाल रंगाची मनसोक्त उधळण केली जाते. अशाच एका प्रथेचा संदर्भ स. ह. जोगळेकर देतात. जोगळेकर हे 'गाथासप्तशती'[१२] या दुसऱ्या-तिसऱ्या शतकातील ग्रंथातील जीवन गोदावरी परिसरातील असल्याचे मानतात. ते म्हणतात, ''फाल्गुनोत्सव म्हणजे होळीचा सण, फाल्गुन पौर्णिमेला होळी होते, वद्य प्रतिपदेला धुळवड आणि वद्य पंचमीला रंगोत्सव होऊन शिमग्याचा सण संपतो... वात्स्यायनाने होलिकोत्सवाचा उल्लेख (कामसूत्र अधिकरण १ अध्याय ४.४२) केलेला आहे. पिचकारीत पळसाच्या फुलांच्या रंगाचे पाणी भरून ते, बुक्का एकमेकांच्या अंगावर फेकणे, ही क्रीडा फाल्गुनी पौर्णिमेला करावी असे कामसूत्रावरील टीकेत यशोधर सांगतो. आता ही क्रीडा वद्य पंचमीला करतात. वसंतोत्सव वसंत पंचमीला होतो. वात्स्यायनाने सुवसन्तोकोत्सवाचा उल्लेख केलेला आहे. यशोधर सांगतो, सुवसन्तोकोत्सवालाच मदनोत्सव असे नाव असून या उत्सवात नृत्य, गीत व वाद्य यांचे प्राधान्य असते. त्याने या उत्सवाची तिथी माघ शुक्ल पंचमी अशी दिली आहे... सिंहासनबत्तीशीच्या दाक्षिणात्य प्रतीत (हावर्ड सीरीज : संपादक डा. एड्गर्टन : पृ. १४५-६) ह्या उत्सवाची तिथी माघ शुद्ध सप्तमी दिलेली आहे... शिमग्याचा सण म्हणजे शिवेवर आलेल्या सूर्याचा सण. संस्कृत भाषेतील अ मराठीत आ होतो. या नियमाने सीमग शब्द सीमगा झाला. संस्कृत स बद्दल मराठीत कधी कधी श होतो. या नियमाने सीमग्याचे रूपांतर शीमगा झाले. नंतर शी ऱ्हस्व होऊन शिमगा हा शब्द प्रचारात आला.'' यामध्ये येणाऱ्या तिथी, काळाचे संदर्भ सध्याच्या नेवाशातील यात्रेशी जुळतात. गाथासप्तशती, लीळाचरित्र आणि सध्याचे जीवन यातील अनुबंध शोधत असताना येथील सण, परंपरा यांना दीर्घ



अनुक्रमणिका

परंपरा दिसते.

हे सर्व पाहता काही निष्कर्ष काढता येणे शक्य आहे. गेल्या हजार वर्षांच्या कालप्रवाहात गावांची नावे, सण, उत्सव यांच्यामध्ये स्थित्यंतर आणि परिवर्तन दिसते. मानवी जीवनातील ही नैसर्गिकता स्वीकारावी लागते. ही स्वीकारली तर भाषा स्थिर कशी असू शकेल? मानवी जीवनाची प्रवाहीपणा आणि परिवर्तन ही मुख्य वैशिष्ट्ये असतात. ती भाषेलाही लागू पडतात. जीवनातील स्थित्यंतर जसे स्वीकारावे लागते, तसे भाषेचे स्थित्यंतर स्वीकारावे लागेल.

त्यातही मराठी संस्कृतीचे एक वैशिष्ट्य दिसते. ते म्हणजे निर्मिती, संवर्धन आणि जतन यांमध्ये सातत्य आढळत नाही. त्यातही जतन करण्याच्या वाबतीत अक्षम्य दुर्लक्ष पाहावयाला मिळते. मूळ लीळाचरित्र खालस्याच्या घाडीत नाहीसे झाले. ज्ञानेश्वरीच्या वाबतीत एकनाथांना पाठशुद्ध आवृत्ती करायला लागली. ही उदाहरणे या संदर्भात पुरेशी बोलकी आहेत. सर्वसाधारणपणे उत्तर-दक्षिण भारताचा तुलनात्मक विचार केला तर हे दुर्लक्ष चटकन लक्षात येते. त्यामागे राजकीय, सामाजिक पर्यावरण हा घटक प्रभावी होता. त्यातही दक्षिण भारताच्या तुलनेत उत्तर भारताची पडझड अधिक दिसते. अशा पडझडीत, भौतिकाच्या उपेक्षेमुळे निर्मिती, संवर्धन आणि जतन करायला स्वाभाविक मर्यादा येताना दिसतात. अशा प्रतिकूल परिस्थितीत भाषेची तथ्ये शोधणे आणखी कठीण होऊन बसते.

म्हणून आज मराठी भाषक परिसर म्हणून ओळखल्या जाणाऱ्या प्रदेशात दीड लाख वर्षांपासून मानवी वस्तीचे सातत्य दिसते. काळप्रवाहात या वस्तीमध्ये स्थित्यंतरे आलेली दिसतात. त्यामधून मानवी जीवनाचा विकासक्रम दृष्टीस पडतो. पण त्यामध्ये सलगता आणि विलगता यांचा एक अंतर्विरोध पुढे येतो. अशा वेळी एक पेच निर्माण होतो. लाखो वर्षांचे मानवी अस्तित्व असताना मराठी भाषेचे पुरावे मात्र सातव्या, आठव्या किंवा दोन हजार वर्षांपूर्वीच्या भाषेशी जोडले जातात. अशा परिस्थितीत कोरीव लेखांतून मिळणारी भाषेची त्रुटित रूपे शोधून मराठीची प्राचीनता सिद्ध करण्याचा प्रयत्न केला जातो. त्यासाठी राजकीय गणिते जुळविण्याचे प्रतिपादन केले जाते. अशा प्रयत्नाने अभिजात भाषेचा दर्जा नक्कीच मिळेल.

मराठी भाषक परिसरातील माणूस हा दीड लाख वर्षांपासून आहे. त्याने निसर्गाशी दोन हात करीत आपली प्रगती साधली. अशीच प्रगती त्याने आपल्या भाषेत साधली. ती अद्यापही सुरू आहे. मराठी भाषा ही एक प्राचीन भाषा आहे. ती लोकभाषा होती. या लोकभाषेला चक्रधरांनी गद्यरूप तर ज्ञानदेवांनी पद्यरूप देऊन ग्रांथिक केले. पुढे ज्ञानदेवांच्या परंपरेचा अधिक विस्तार झाला. ज्ञानदेव हे जरी मराठीत बोलत असले तरी त्यांनी संस्कृतचे निकष स्वीकारले. पुढे आधुनिक मराठी गद्यरूप हे इंग्लिशच्या सावलीत परिपुष्ट होत गेले. केशवसुत, मर्ढेकरांनी इंग्लिशचे निकष स्वीकारले. त्यामुळे मराठीची पंचाईत होते. संस्कृत की इंग्लिश? या द्वैतात तिला स्वतःचे साहित्यशास्त्र नाही हे स्वीकारावे लागते. असे द्वैत मध्ययुगातही होते. आजही जगभरात अभिजात भाषा म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ग्रीक, लॅटिन, संस्कृत, अरबी, चिनी या लोकव्यवहाराच्या भाषा नाहीत. त्यांची आधुनिक रूपे आणि प्राचीन रूपे यांमध्ये अंतर आहे. मात्र, नवीन शब्द घडविणे, पुढील भाषांतील शब्दांची निर्मिती करण्याचे काम या अभिजात भाषांनी केले आहे किंवा करीत आहेत. या भाषांनी जीवनातील कोणताही विषय वर्ज्य केला नाही, म्हणून त्यांचे साहित्य समृद्ध झाले. त्यापेक्षा आजपर्यंतच्या संशोधनाअंती मराठी ही एक प्राचीन, समृद्ध भाषा आहे. तिला दोन हजार वर्षांपासूनचा इतिहास आहे.

**संदर्भ :**


१. प्रस्तावना , अभिजात मराठी भाषा समिती अहवाल - २०१३, पृ.३
२. तत्रैव, पृ. ११
३. https://en.wikipedia.org/wiki/Classical_language
४. Bloomfield, Language, https://books.google.co.inbooks, 21.
५. मराठीच्या ऐतिहासिक व्याकरणाची एक दिशा, डॉ. सुरेश डोळके स्मृतिग्रंथ, (संपादक) साहित्य प्रसार केंद्र, नागपूर. पृ. ४१२.
६. Some observation on the Excavation Chirki - Nevasa, Bulletin of the Deccan College Research Institute, VOL.XXXV/NOS.1-2/1975, P 7.
७. सांकलिया ह. धी. आणि देव शां. भा., नेवासे (१९५४-५६), डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूट, पुणे विद्यापीठ पत्रिका, ज्ञानखंड, क्र. ७ मधून पुनर्मुद्रित.
८. देशपांडे ब्रह्मानंद, श्रीज्ञानेश्वरकालीन नेवासे, ज्ञानेश्वरी सप्तशताब्दी ग्रंथ, अशोक एरंडे (संपादक), श्रीज्ञानेश्वर महाविद्यालय प्रकाशन, नेवासे, प्र. आ. १९९१, पृ. १९.
९. तत्रैव, ब्रह्मानंद देशपांडे, पृ. २१
१०. तत्रैव, ब्रह्मानंद देशपांडे, पृ. २१
११. कोलते वि. भि. (संपादक), लीळाचरित्र, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, दु. आ. १९८२.
१२. जोगळेकर स. ह., हाल सातवाहनाची गाथा सप्तशती, पद्मगंधा प्रकाशन, पुणे, प्र. आ. २०१२, पृ. २६०.


●


प्रा. डॉ. शिरीष लांडगे
जिजामाता शास्त्र व कला महाविद्यालय,
भेंडे, नेवासा, ता. जि. अहमदनगर





अनुक्रमणिका



श्रद्धांजली

# ओजोगुणी काव्यजीवन अटलजी

डॉ. सु. प्र. कुलकर्णी

अटलबिहारी वाजपेयी महान समाजपुरुष होते. त्यांच्या ओजस्वी काव्यानेच त्यांचे काव्यजीवन अमर झाले! भारतरूपी एका विशाल-विराट समाजजीवनाचे आपण एक घटक आहोत. हे समाजजीवन म्हणजे केवळ जमीन किंवा जमिनीचा एक तुकडा नाही; तर तेथे राहणारा- विविधतेने राहणारा- विविधता जपून एकतेत राहणारा 'जीता जागता राष्ट्रपुरुष' आहे. भारतातल्या मानव समाजाचे त्यांना भान होते आणि त्यांच्या काव्यजीवनातून ते सतत प्रेरणा देत राहणारे आहे. अटलजींच्या मनातील ह्या समाजपुरुषाची भक्ती सर्व भारतवासीयांनाच नव्हे; तर जगाला मोहविणारी होती. माणसाच्या विविधतेतील एकता; हे 'स्वप्न' नसून 'वास्तव' आहे; याची जाणीव त्यांच्या कवितेने, त्यांच्या भाषणाने, त्यांच्या नेतृत्वाने सतत दिली आहे. ते म्हणत - ''एकरूपता नही! विविधताओंमे एकता खोजकर सदृढ बनाएंगे।'' त्यांना 'रूपक' अहंकार मान्य नव्हता. कारण रूपकात उपमेय आणि उपमान यांच्यात प्रत्यक्षात वेगळेपण असते. 'उपमा-उत्प्रेक्षा-रूपक' ह्या उपमान-उपमेयाच्या अधिकाअधिक जवळ येणाऱ्या पायऱ्या आहेत. म्हणून समाजरूपी राष्ट्रपुरुष नव्हे; तर समाज हेच राष्ट्रपुरुषाचे दर्शन आहे. 'अपुल्यामध्ये विश्व पाहुनि पूजी मी विश्वाला!' हीच काव्यजीवनाची भूमिका आहे. हाच युगायुगांचा काव्यधर्म आहे. हीच युगायुगांची 'अधूरी विराणी' आहे. हीच त्यांच्या कवितेची 'पहचान' आहे. 'पहचान' कवितेत अटलजी म्हणतात, 'माणसाची ओळख त्याच्या जन्मावरून किंवा आर्थिक क्षमतेवरून होत नाही. ती होते निरपेक्ष मनावरून! निरीच्छ वृत्तीने!! युगायुगांचा काव्यधर्म असाच 'संन्यस्त' आहे. ते म्हणतात -



*''मन की फकीरी पर*
*कुबेर की संपदा भी रोती है।''*

मानवतेवर प्रेम करणारा फकीर वृत्तीचाच असतो. त्यालाच मनुष्य समजतो. माणसाला समजून घेणे हाच खरा काव्यधर्म आहे. काश्मीरमधील बंडखोरांशी संवाद साधण्यासाठी ते आग्रही होते. त्यांच्या कविमनाने बंडखोरांना, त्यांच्या प्रसिद्ध त्रिसूत्रीच्या माध्यमातून मैत्रीचे आवाहन केले होते. काश्मीरच्या संस्कृतीचा आदर ह्यांचे अधिष्ठान माणुसकीचे (इन्सानियत)! श्रीनगरमध्ये कारगील युद्धानंतर घेतलेल्या ह्या त्रिसूत्रींची जाहीर वाच्यता करून काश्मिरी जनतेच्या दुःखावर फुंकर टाकली! देशाचा हा सर्वांत मोठा दुखरा कोपरा आपलासा करण्यासाठी केलेला हा हृदयसंवाद जितका राजकीय, तितकाच न बोचणारा समन्वयशील होता. एक कविमनच असा विचार करू शकते. वाजपेयींची ही 'फकीरी' वृत्ती सर्वसमावेशक समाजप्रेमातूनच जोपासली गेली होती. सर्व समाज अगदी आसेतुहिमाचल समाजमनाने एक झाला पाहिजे; हा त्यांचा, त्यांच्या वक्तृत्वाचा, त्यांच्या लेखनाचा आणि कवितेचाही ध्यास होता.

*'कदम मिलाकर चलना होगा...*
*...उजियारे में, अंधकार में,*
*कल कहार में, बीच धार में,*
*क्षणिक जीत में, दीर्घ हार में,*
*जीवन के रात-रात आकर्षक,*
*अरमानो को ढलना होगा।*
*कदम मिलाकर चलना होगा।।'*

भारतीय समाजाचे 'समानम् अस्ति वो मनाः।' असे दर्शन त्यांनी वारंवार प्रतिपादन केले. हे समाजाचे सहस्रशीर्ष, सहस्राक्ष, सहस्रपाद असले तरी मनाने एकच असावे, ही



अनुक्रमणिका








**'सर्वेऽपि सुखिनः सन्तु, सर्वे सन्तु निरामयाः' हाच भारतीय तत्त्वज्ञानाचा युगायुगांचा काव्यधर्म आहे. तोच अटलजींच्या श्रद्धेच्या–व्यक्तिमत्त्वाचा–जीवनाचा अटल काव्यधर्म आहे. त्याला बाधा येईल असे काही कोणाकडून घडले, की ते आपल्या कार्यकर्त्यांची कानउघडणी करीत... १९९८च्या विजयाने हुरळून जाणाऱ्या कार्यकर्त्यांनी, त्यांच्या सुरत भेटीत, ते कारमधून उतरल्याबरोबर बेंबीच्या देठांपासून जयजयकार केला... 'जोर से बोलो जय श्रीराम!' अटलजींना ते आवडले नाही. श्रीरामाच्या नावाने मिळालेला हा जय नसून लोकांच्या मनपरिवर्तनाने मिळालेला हा जय आहे, हे सांगण्यासाठी ते म्हणाले.... किंचित उपहासाने... '.. हाँ. हाँ! जोरसे बोलो जय श्रीराम... बोलते रहो जय श्रीराम, और करो मत कोई काम!' कार्यकर्ते अन्तर्मुख झाले असतीलच!**



उपनिषदांची भूमिका 'स्वस्ति'चिंतनाची आहे. ही आध्यात्मिक चिंतनी–डूब त्यांच्या भारतवर्षाच्या प्रसिद्ध वर्णनातून सर्वांनी ऐकली आणि अनुभवलीही आहे. ते नेहमी म्हणत–

'भारतीयत्व ही राजकीय संकल्पना नसून एक सांस्कृतिक संकल्पना आहे. ती संप्रदायनिरपेक्ष आहे. विज्ञान व तंत्रज्ञान सापेक्ष सर्वकल्याणकारी संस्कृती म्हणजे भारतीयता होय!' हा 'सेक्युलर'चा अर्थ होय! तो धर्मविरोधी नाही आणि धर्मविहीनही नाही. प्रत्येकाची उपासनापद्धती ही खाजगी बाब असून ती कोणत्याही राज्याची असता कामा नये. राज्याची उपासना सर्वांच्या कल्याणासाठीच असली पाहिजे. ही भारताची प्राचीन परंपरा आहे.

*''... होकर स्वतंत्र मैंने कब चाहा है कर लूँ*
*जग को गुलाम।*
*मैंने तो सदा सिखाया है करना अपने*
*मन को गुलाम।*
*गोपाल–राम के नामों तर कब*
*मैंने अत्याचार किये।*
*कब दुनिया हिन्दू करने घर–घर में*
*नरसंहार किये।*
*... भूभाग नहीं, शत–शत मानव के*
*हृदय जीतने का निश्चय।*
*हिन्दू तन–मन, हिन्दू जीवन, रग–रग हिन्दू*
*मेरा परिचय।''*

ही हिंदुत्वाची साधी सोपी व्याख्या... पारदर्शक! सौम्य, शीतल!

'सर्वेऽपि सुखिनः सन्तु, सर्वे सन्तु निरामयाः' हाच भारतीय तत्त्वज्ञानाचा युगायुगांचा काव्यधर्म आहे. तोच अटलजींच्या श्रद्धेच्या–व्यक्तिमत्त्वाचा–जीवनाचा अटल काव्यधर्म आहे. त्याला बाधा येईल असे काही कोणाकडून घडले, की ते आपल्या कार्यकर्त्यांची कानउघडणी करीत. नुसता श्रीरामाचा जयजयकार करून जीवनाची साधना होत नाही. निष्क्रिय घोषणाबाजी करून जीवनाची साधना होत नाही. निष्क्रिय घोषणाबाजी त्यांना आवडत नसे. १९९८च्या विजयाने हुरळून जाणाऱ्या कार्यकर्त्यांनी, त्यांच्या सुरत भेटीत, ते कारमधून उतरल्याबरोबर बेंबीच्या देठांपासून जयजयकार केला... 'जोर से बोलो जय श्रीराम!' अटलजींना ते आवडले नाही. श्रीरामाच्या नावाने मिळालेला हा जय नसून लोकांच्या मनपरिवर्तनाने मिळालेला हा जय आहे, हे सांगण्यासाठी ते म्हणाले.... किंचित उपहासाने... '.. हाँ. हाँ! जोरसे बोलो जय श्रीराम... बोलते रहो जय श्रीराम, और करो मत कोई काम!' कार्यकर्ते अन्तर्मुख झाले असतीलच!

विनोद आणि विडंबन करणे हा अटलजींचा स्थायीभाव होता. 'युगबोध' ह्या कवितेतील स्वार्थी सामाजिक व राजकीय विडंबन करताना ते म्हणतात–

*''सीता का अपहरण देख होते प्रसन्न मन।*
*राम और रावण करते है स्नेहालिंगन।*
*लाल लखन दिनमे डटकर खर्राटे भरते है।*
*और भरतजी कुर्सी जाने डरते है।''*... हे आजचे ''रामायण'!

अटलजींच्या ओजोगुणी व्यक्तिमत्त्वाला झुळझुळत्या विनोदाची झालर होती. त्यामुळे संघर्ष–प्रसंगातही कधी कायमची कटुता निर्माण झाली नाही. त्यांच्या हजरजबाबी प्रसन्न व्यक्तिमत्त्वाला ही विनोदाची देणगी होती. संग्रहित आठवणीतले काही प्रसंग–

इराण–इराक युद्धात भारताने अमेरिकेच्या दडपणाने भारतीय सेनेची कुमक पाठवू नये म्हणून सी.पी.एम.चे कॉम्रेड वर्धन आणि कॉम्रेड हरकिशन सिंग सुरजित आग्रही होते. त्यांच्या भेटीत अटलजींनी हे मान्य केले आणि प्रसन्न हसून ते त्यांना म्हणाले... 'जोर से बोलिये कॉम्रेड...। इधर भी और बाहर जाकर भी...!' असे दिलखुलास प्रोत्साहन। पक्षनिरपेक्ष!

रामविलास पासवान एकदा अटलजींना म्हणाले, ''ये बी.जे.पी. बहुत राम की बातें करती है; पर उनमें कोई राम नहीं है। मेरा तो नाम ही राम है।'' अटलजी त्वरित उत्तरले; ''पासवानजी, हराम में भी राम होता है।''

पाकिस्तानचे प्रतिनिधी एकदा म्हणाले, ''काश्मीर के बिना पाकिस्तान अधूरा है।'' त्यावर मिष्कील अटलजी

म्हणाले, ''वो भी ठीक है, पर पाकिस्तान के बिन हिंदुस्तान अधूरा है।''

संसदेत 'सिमला करारावर' टीका करताना अटलजी म्हणत होते, ''मैदान में जीते, मेजपर हारे।'' त्यांना मध्येच 'टोकत' पतियाळाचे सत्पाल कपूर यांनी शेरेबाजी केली... 'करार समझनेमें अकल लगती है।'' जराही विचलीत न होता अटलजी उत्तरले, ''अकल का ठेका तो आपने ले रखा है। मगर बीच में टोकनेवाले अकल का प्रदर्शन नहीं करते।''

पाटण्याच्या एका सभेत अभिनेता शत्रुघ्न सिन्हा भोवती गर्दी झाली. अटलजी म्हणाले, ''मै भी बिहारी हूँ। बिहारी बाबू (अर्थात, शत्रुघ्नजी) भी जानते है ये भीड 'अटल'बिहारी के लिये भी है...।'' संसदेतील शत्रुघ्नजींच्या गैरहजेरीवरही त्यांनी टीकाटिप्पणी केली. शत्रुघ्नजींमध्ये सुधारणा झाली.

'रामचरित मानस'चा अटलजींवर मोठा प्रभाव होता. गोस्वामी तुलसीदासांनी 'राम' हे केवळ वृथा अभिमानाचे प्रतीक बनविले नाही. भारतीय तत्त्वज्ञानातील रामाने 'लोकधर्म' शिकविला. भारतासारख्या अनेकविध लोकसमुदायाला एकाच सूत्रात बांधण्याचा तो प्रयत्न होता. 'सर्वांभूती परमेश्वर' हेच भारतीय तत्त्वज्ञानाचे सूत्र आहे. ज्ञानाबरोबर अज्ञानालाही समजून घेणे, निर्गुणाबरोबर सगुणालाही समजणे आणि प्रकाशाबरोबर अंधारालाही मान्यता देणे- हाच 'अमृतानुभव' ज्ञानेश्वरादी संतांनी सांगितला... तोच तुलसीदासांचा 'राम' अटलजींना प्रिय होता.

*''ग्यान कहै अग्यान-बिनु,*
*तम बिनु कहै प्रकास।*
*निरगुन कहै जो सगुन बिनु,*
*सो गुरू तुलसीदास।।''*

ज्ञानी-अज्ञानी, लहान-थोर यांच्याशी सारखेच संज्ञापन करणारा राम त्यांना प्रिय होता. अटलजींवर तर 'सौम्य-नेतृत्व' म्हणून 'सौम्य टीका'ही होत असे. मानवतेचा प्रश्न आला की त्यांची कविता व नेतृत्व समंजस धोरण स्वीकारीत. विरोधी मतांचा विचार करणे- हीच त्यांची राजनीती होती. गोध्रा हत्याकांडाने व्यथित झालेल्या अटलजींनी गुजरातच्या नेतृत्वालाही ''राजधर्म 'लोकधर्मी' असतो'' हेच सुनावले होते. मानवतेची विटंबना होईल तेथे मान तुकवणार नाही... मोडेन पण वाकणार नाही... 'न दैन्यं- न पलायनम्'...

*आग्नेय परीक्षा की*
*इस घडी में-*
*आइए, अर्जुन की तरह*
*उद्घोष करें :*
*'न दैन्यं न पलायनम्।'*

या भूमिकेतूनच पोखरणचा ऐतिहासिक अणुस्फोट घडवून त्यांनी जगाला भारताच्या ज्ञान व सामर्थ्याची ओळख करून दिली. त्यानंतर जागतिक रोष शांत करण्यातही ते यशस्वी झाले. 'आमची अण्वस्त्रे ही पूर्णपणे युद्धखोर राष्ट्राला, त्यांच्या धाडसी अण्वस्त्र प्रदर्शनाला उत्तर आहे,' असे जाहीर धोरण की शत्रूला परस्पर उत्तर मिळाले. कारगिल युद्ध, संसदेवरील दहशती हल्ला, कंदाहार विमान अपहरण, १९८४च्या निवडणुकीतील दारुण पराभव... अशा कसोटीच्या काळात वाजपेयींनी आपली प्रतिष्ठा सोडली नाही आणि गमावलीही नाही.

***झुक नहीं सकते***
***टूट सकते है मगर हम झुक नहीं सकते।***

अटलजींनी पंडित नेहरूंना संसदेत वाहिलेली श्रद्धांजली म्हणजे एका कविमनाच्या नेत्याला तितक्याच कविमनाच्या नेत्याने वाहिलेली श्रद्धांजली! ते शब्द-

''... आज भारतमाता, तिचा लाडका राजपुत्र चिरनिद्रेत गेला म्हणून शोकाकुल आहे... एक स्वप्न अधूरे राहिले, एका सुमधुर संगीताची मैफिल शांत झाली. उपासमारमुक्त आणि भयमुक्त जीवन पाहणारे ते स्वप्न होते; जे अधूरे राहिले. गीतेच्या तत्त्वज्ञानाने भारलेला आणि गुलाबाचा सुगंधही त्या संगीताला होता. अंधाराला रात्रभर उजळविणारी आणि सन्मार्गावर नेणारी ती प्रकाशज्योत आता निमाली! ... आपली भूमिका चोख बजावून त्यांनी जगाच्या रंगभूमीला निरोप दिला... भारताने शांतता आणि सलोख्याच्या मार्गावर ठामपणे वाटचाल करणे; हीच त्यांना खरी श्रद्धांजली असेल..!''

आता अटलजींना श्रद्धांजली देण्यासाठी आपल्याजवळ इतके काव्यमय शब्द कोठून आणावेत! अटलजींच्याच शब्दांना आवाहन करावेसे वाटते 'शब्दांनो मागुते या।' त्यांचेच शब्द त्यांना अर्पण करू या! जसे गंगेच्या जलानेच गंगेला अर्घ्य!

अटलजी १६ ऑगस्टला गेले. भारतीयांची भावना आहे की, अटलजी भीष्माचार्याप्रमाणे इच्छामरणी होते, असे आता वाटते. 'मी मृत्यूला घाबरत नाही. हे मृत्यो! तू माझ्या पाठीमागून येऊ नकोस... समोरून ये,' असे ते मृत्यूला आवाहन करतात. जणू त्यांची मृत्यूला प्रार्थना आहे. ''अरे येशील तर १५ ऑगस्टला येऊ नको. स्वातंत्र्यदिनाच्या दिवशीच तुला अर्धे उतरावे लागू नये.'' (ये, पण १६ ऑगस्टला ये!) मृत्यूनेही ती प्रार्थना स्वीकारली!

●

**डॉ. सु. प्र. कुलकर्णी**
चलभाष : ९७६७६९९३१९



लेख

अरुणचंद्र पाठक

# मधुकर केशव ढवळीकर : एक अविस्मरणीय पुरातत्त्वज्ञ



**ढवळीकरांचे योगदान विपुल ग्रंथसंपदेपुरते मर्यादित नाही. जागतिक पर्यावरणाचा मानवी संस्कृतीवर होणारा परिणाम व निसर्गाबरोबर जुळवून घेण्याचा प्रयत्न म्हणजे संस्कृती हा त्यांचा आवडता विषय. यातून त्यांचे सखोल चिंतन जाणवत राहते. अनुकूल पर्यावरण असेल तर मानवी संस्कृतीच्या विकासाला चालना मिळते ही बाब अधोरेखित करताना भारतीय संस्कृतीच्या संदर्भात त्यांनी आपले मत व्यक्त केले. सिंधू संस्कृतीच्या काळात (इसवीसनपूर्व ३२०० ते २०००) आणि गौतम बुद्धापासून गुप्त राजवंशापर्यंतचा (इसवीसनपूर्व ६०० ते ५००) या काळात भारतात पावसाचे प्रमाण चांगले होते व स्वाभाविकपणे मानवी संस्कृतीचा विकास या वेळी झाला. उलट ज्या काळात पर्यावरण प्रतिकूल होते त्या काळात स्थलांतरे करावी लागली.**



ना व्यापार करिती जन । आवघेचि म्हणती सकांचन।
परंतु कुबेराचें महिमान । कोणासीचि नये ।।

(दासबोध - ६.९.१५)

ज्ञानक्षेत्रातील कुबेर ते ढवळीकर सर होते.

प्राचीन भारतीय इतिहास आणि संस्कृती, जागतिक पुरातत्त्व इत्यादी अनेक विषयांचा मूर्तिमंत ज्ञानकोश. त्यांनी अनेक ज्ञानशाखेत आपल्या विचारांची भर घातली. १६ मे १९३०चा जन्म. २७ मार्च २०१८ त्यांनी इहलोकीची यात्रा संपवली. अर्थशास्त्र आणि राज्यशास्त्र हे विषय घेऊन बी.ए. झाल्यानंतर काही काळ त्यांनी गोखले अर्थशास्त्र संस्थेत काम केले. १९५३ मध्ये त्यांनी भारतीय पुरातत्त्व विभागात प्रवेश केला. १९६५पर्यंत तांत्रिक साहाय्यक म्हणून पुणे, अजंठा, दिल्ली येथे काम केले.

प्राचीन भारतीय इतिहास, संस्कृती आणि पुरातत्त्व या विषयांत एम.ए. ही पदवी सुवर्णपदकासह प्राप्त. डॉ. ह. धी. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली लिहिलेला 'लाईफ इन द डेक्कन एज डेपिक्टेड इन द अजंठा पेन्टिंग्ज' हा त्यांच्या पीएच.डी.चा प्रबंध पुणे विद्यापीठाने प्रकाशित केला. १९६५ ते ६७ या काळात नागपूर विद्यापीठामध्ये पुरातत्त्व विभागाचे अधिव्याख्याता म्हणून काम केले. १९६७ मध्ये प्राचीन भारतीय इतिहास आणि पुरातत्त्व विषयाचे प्रपाठक म्हणून डेक्कन कॉलेज पुणे येथे रुजू झाले. १९८२ ते ९० या काळात सहसंचालक व संचालक म्हणून डेक्कन कॉलेजचे नेतृत्व केले. या काळात आंतरशाखीय ज्ञानशाखांच्या विकासासाठी विविध प्रयोग केले.

केंद्रीय नियोजन आयोगाच्या सांस्कृतिक समितीचे सदस्य, भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षणाच्या स्थायी समितीचे सदस्य, महाराष्ट्र राज्य गॅझेटिअर संपादक मंडळाचे सदस्य, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिराचे विश्वस्त म्हणून १९८८ पासून दीर्घकाळ कार्यरत होते. बृहन्महाराष्ट्र प्राच्यविद्या परिषदेचे अध्यक्ष तसेच या परिषदेचे मार्गदर्शक म्हणून कार्यरत. इंडियन हिस्ट्री काँग्रेस, अखिल भारतीय प्राच्यविद्या परिषद यांच्यासह अनेक प्रतिष्ठित परिषदांच्या अधिवेशनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषवले.

कोणत्याही विषयाचा सर्वांगीण आणि सखोल अभ्यास, पुरातत्त्वासह अज्ञात ज्ञानशाखेच्या ताज्या घडामोडींची व या क्षेत्रात उपलब्ध होणाऱ्या सर्व नवीन ग्रंथ व नियतकालिकांतील लेखांविषयी माहिती ते आवर्जून ठेवत. कोणत्याही विषयाचा सखोल व्यासंग, त्यांच्या विविध पैलूंची जाण त्यांना होती व यासाठी परिश्रमपूर्वक सातत्य, वाचन व चिंतन करत. त्यांच्या नवकेतन कॉलनीतील निवासाचे नाव 'श्रीवत्स' असे होते. प्राच्यविद्या अभ्यासाच्या जीवनावर झालेला हा एक परिणाम व त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शनही












त्यातून जाणकाराला घडत असे. राहणीतील साधेपणा, कामातील शिस्त, वेळ पाळण्याचे स्वतःवर घालून घेतलेले बंधन, सर्वव्यापी ज्ञानशाखांची जाण असल्याने प्रतिभा आणि त्याच्या जोडीचा सूक्ष्म विनोदबुद्धी होती. डी.डी. कोसंबी यांच्या विचारांचा प्रभाव व पुरोगामी विचाराचा स्वतः केलेला अंगीकार यातून कुठेही तडजोड न करण्याची व प्रसंगी स्पष्टपणे नोंदवण्याची त्यांची पद्धत होती. लेखनाच्या संदर्भात ठरावीक वेळ पाळणे हा त्यांचा कटाक्ष. तसेच नियमित व्यायाम-विशेषतः पोहणे हे निवृत्तीनंतर शेवटपर्यंत स्वीकारलेले व्रत.

'प्रागैतिहासिक काळ व प्राचीन ऐतिहासिक काळ हा त्यांचा विशेष आवडीचा विषय. नंदुरबार जिल्ह्यातील प्रकाशे, जळगाव जिल्ह्यातील बहाळ आणि टेकवडे, संगमनेर जवळील दायमाबाद उत्खननात त्यांचा सहभाग होता. ग्रीस देशातील पेल्ला या ठिकाणी उत्खननात ते सहभागी होते. महाराष्ट्रातील पावनार (१९६७), पंढरपूर (१९६७-६८), वाळकी (१९८५-८६), कंधार (१९८३-८४), आपेगाव (१९७६) या स्थानांच्या बरोबरच गुजरात, राजस्थानातील कुंतासी आणि प्रभासपाटण, मध्य प्रदेशामधील कायथ (१९७५), आसाममधील गुवाहाटी (१९७०) येथे त्यांनी उत्खनन केले. त्यांच्या आयुष्यातील सर्वात मोठे उत्खनन पुणे जिल्ह्यातील इनामगाव येथे झाले. प्रामुख्याने ताम्रपाषाणयुगीन वसाहतीचा शोध त्यांनी घेतला. याच ठिकाणी त्यांनी गार्डन चाईल्ड व अन्य पाश्चात्त्य विद्वानांनी मांडलेल्या सिद्धांताचा भारतीय संस्कृतीच्या अंगाने पडताळा घेण्याचा प्रयत्न केला व यातून महाराष्ट्रातील प्रथम शेतकरी व त्याची वसाहत, प्रागैतिहासिक खेडे यांचा आकृतिबंध, तेथील वसाहत रचना, ग्रामप्रमुख व इतरांचे जीवन, दैवतविषयक संकल्पना, विशेषतः मातृदेवता याचा वारली संस्कृतीमधील 'पालघट' यांच्याशी असलेला अनुबंध व घटटपल्लवाशी असलेले नाते सांगताना भारतात प्राचीन काळापासून घटटपल्लव हे समृद्धी व सफलतेचे प्रतीक म्हणून मानले गेले, यासारख्या बाबी त्यांनी नोंदवल्या.

सन १९६९ ते १९८३ या प्रदीर्घ काळात झालेल्या इनामगाव उत्खननामुळे त्यांचे काम या क्षेत्रात जगभर नोंदवले गेले. कुठल्याही उत्खनन कामानंतर लगोलग अहवाल प्रकाशित झाला पाहिजे, हा त्यांचा कटाक्ष असे. त्यांनी अनेक शोधनिबंध आंतरराष्ट्रीय ख्यातीच्या शोधपत्रिकांतून सातत्याने लिहिले. त्यांच्या नावावर अनेक मोनोग्राम (पुस्तिका) व ग्रंथ आहेत. त्यांच्या एकूण पुस्तकांची यादी माहितीसाठी शेवटी दिली आहे. त्यांची इंग्रजी व मराठी ग्रंथसंपदा मोठी असून या विषयाचा परिचय मातृभाषिकांना व्हावा या हेतूने त्यांनी जाणीवपूर्वक लेखन केले. त्यात 'प्राचीन भारतीय नाणकशास्त्र' (१९७५), 'पुरातत्त्वविद्या' (१९८०), 'पर्यावरण आणि संस्कृती' (२००४), 'आशियाचे आराध्यदैवत गणेश' (२०१६), 'कोणे एके काळी - सिंधू संस्कृती' (२००६), 'आर्यांच्या शोधात', 'महाराष्ट्राची कुळकथा' (२०११) या ग्रंथास महाराष्ट्र शासनाचा पुरस्कार मिळाला. 'भारताची कुळकथा' (२०१७) व त्यानंतर 'मुंबईचा सांस्कृतिक वारसा' या ग्रंथाचे हस्तलिखित तयार आहे.

सरांना त्यांच्या कामाबद्दल अनेक प्रतिष्ठित व्याख्यानमालेतून जाणीवपूर्वक बोलावले गेले. त्यांच्या कामाची योग्य दखल घेऊन केंद्र शासनाने त्यांना २०११ मध्ये 'पद्मश्री पुरस्कारा'ने विभूषित केले, तर अत्यंत प्रतिष्ठेची मानली गेलेली 'टागोर फेलोशिप' त्यांना प्रदान केली गेली. त्यातूनच मुंबईचा ग्रंथ सिद्ध झाला. एशियाटिक सोसायटीने सुद्धा त्यांना सुवर्णपदक व गौरववृत्ती प्रदान केली. मध्यप्रदेश सरकारचा 'जीवनगौरव पुरस्कार' दिला.

ढवळीकरांचे योगदान विपुल ग्रंथसंपदेपुरते मर्यादित नाही. जागतिक पर्यावरणाचा मानवी संस्कृतीवर होणारा परिणाम व निसर्गाबरोबर जुळवून घेण्याचा प्रयत्न म्हणजे संस्कृती हा त्यांचा आवडता विषय. यातून त्यांचे सखोल चिंतन जाणवत राहते. अनुकूल पर्यावरण असेल तर मानवी संस्कृतीच्या विकासाला चालना मिळते ही बाब अधोरेखित करताना भारतीय संस्कृतीच्या संदर्भात त्यांनी आपले मत व्यक्त केले. सिंधू संस्कृतीच्या काळात (इसवीसनपूर्व ३२०० ते २०००) आणि गौतम बुद्धापासून गुप्त राजवंशापर्यंतचा (इसवीसनपूर्व ६०० ते ५००) या काळात भारतात पावसाचे प्रमाण चांगले होते व स्वाभाविकपणे मानवी संस्कृतीचा विकास या वेळी झाला. उलट ज्या काळात पर्यावरण प्रतिकूल होते, त्या काळात स्थलांतरे करावी लागली. केवळ भारत किंवा एक भूभाग हा वेगळा काढून त्याचा अभ्यास करता येत नाही तर एकूणच जागतिक पर्यावरणाचा विचार संस्कृतीच्या अभ्यासात करावा लागतो, हे त्यांनी स्पष्टपणे अधोरेखित केले. इजिप्तमध्ये नाईल नदीला आलेल्या पुराची नोंद उपलब्ध आहे व त्याच काळात भारतातही चांगला पाऊस पडला होता. नाईलचा पूर हा भारताच्या चांगल्या मान्सूनचे दर्शन देणारा ठरला. याच संदर्भात इनामगावच्या उत्खननामध्ये पर्यावरण परिणाम म्हणून मूळ सिंधू संस्कृतीच्या लोकांना, पुढील काळातील वसाहतींना कसे स्थलांतर करावे लागले हे त्यांनी स्पष्टपणे पुराव्याच्या आधारे दाखवले. तसेच आज भारतात रूढ असणाऱ्या काही समज आणि प्रथांचे मूळ समाजजीवनात सापडते, हेही त्यांनी नमूद केले.

महाराष्ट्र शासनाच्या राज्य गॅझेटिअर विभागाने इतिहास प्राचीन काळ - खंड १ प्रकाशित केला. यात सरांचे योगदान मोलाचे होते. ताम्रपाषाणयुग व महापाषाणीय या दोन्ही कालखंडावर त्यांनी केलेले लेखन हे त्यांच्या काम व चिंतनाचा परिणाम होता. ताम्रपाषाणयुगीन आद्य शेतकऱ्याच्या वसाहतींचा ऱ्हास होण्यासाठी सततचे दुष्काळ कारणीभूत होते, यासारखे लक्षणीय निष्कर्ष त्यांनी नोंदवले, तर महापाषाणयुगीन



अनुक्रमणिका

दफनाची माहिती देताना ते म्हणाले, तथाकथित महापाषाणयुगीन खेडे हे वास्तवतः पाषाणांच्या समकालीन म्हणजे लोहयुगीन स्थिर जीवन जगणाऱ्या लोकांची खेडी असावीत. मोठ्या प्रमाणात आढळणाऱ्या शिळा-वर्तुळाविषयी माहिती देताना कालौघात विकसित झालेली ही संस्कृती कोणत्याही परकीय आक्रमणांचा परिणाम नव्हती, हे स्पष्ट करत त्यांचा संबंध स्थानिक जनजातीशी असू शकतो, यांसारखे त्यांचे काही निष्कर्ष आज पर्यंतच्या रूढ मतांना खोडून काढणारे होते. दक्षिण भारतातील महापाषाणीय थडग्यातील मानवी अस्थींचा अभ्यास काही जीवमानववंशशास्त्रज्ञांनी केला. आदिवन्नलूर येथील महापाषाणीय लोक भारतीय उपखंडात बाहेरचे होते, असे मत झुकरमनने मांडले. फादर हेरास यांचे मत याच प्रकारचे होते. हे लोक भूमध्य वंशाचे असावेत. व्हॉन फ्युहरर हैमेनडॉफ यांच्या मते महापाषाणीय लोक द्राविडांची उत्पत्ती ज्या वंशापासून झाली त्या वंशाचे (प्रोटोद्रविड) असून समुद्रमार्गे भारतात आले. गार्डन व्ही चाईल्ड यांचेही मत असेच होते. तर व्हीलर यांच्या मते भारतीय व कॅस्पियन यांच्या मिश्र वंशाच्या लोकांनी अचानक केलेल्या आक्रमणातून महापाषाणीय संस्कृती भारतात पसरली. या व अशा पूर्वसूरींच्या मतांच्या पार्श्वभूमीवर ढवळीकरांचे काम अधिक लक्षणीय ठरते.

आर्यप्रश्न हा त्यांच्या दृष्टीने भारतीय इतिहासातील एक न सुटणारे कोडे वाटते. आर्यांनी विशेषतः पुरंदर (इंद्र) यांनी सिंधू संस्कृतीचा विध्वंस केला नाही, हे त्यांनी स्पष्ट केले आहे. आर्य हे भारतीय होते व इथून ते बाहेर गेले यासारख्या मतांचे प्रतिपादन करण्याकडे त्यांचा कल दिसतो. सिंधुसंस्कृतीशी ऋग्वेदिक समाजाचा असलेला संबंध स्पष्ट करण्याचा प्रयत्न त्यांनी केला. 'भारताची कुळकथा' या ग्रंथात त्यांनी या प्रश्नाची चर्चा करण्याचा जाणीवपूर्वक प्रयत्न केला आहे. आर्य म्हणजे काही एखादा वंश होऊ शकत नव्हता, उलट एक विशिष्ट भाषा, पितृसत्ताक पद्धती, गोपजनांची संस्कृती होती, या कोसंबी यांच्या मताला पुरातत्त्वीय पुराव्यामुळे पुष्टी मिळते असे ते नोंदवतात. पुरातत्त्वीय स्थळांचा शोध घेत असताना या संदर्भातील जगभरात रूढ होऊ घातलेले सिद्धांत, भारतीय उत्खननात सापडणाऱ्या वस्तू, अभिलेख, वैदिक वाक्य यांचा समन्वय घालण्याचा प्रयत्न त्यांनी केला. विशेषतः अजंठा वेरूळ लेण्या यांचा अभ्यास करताना दण्डीचे दशकुमार चरित्र, मेगॅस्थेनिस, इत्सिंग, युआन श्वांग अशा परकीय प्रवासी वृत्तांत्ताची, तपशिलांचीही नोंद ते घेत. वेरूळ येथील कैलास लेण्याच्या संदर्भात त्यांनी केलेले काम हे उल्लेखनीय ठरते हे यामुळेच. अजंठा लेणीच्या संदर्भात तत्कालीन समाजजीवनाचे चित्रण उभे करताना त्यांनी दण्डीचे दशकुमार चरित्र, कालिदास, अन्य समकालीन साहित्य, मृच्छकटिक यांचा आधार घेत तत्कालीन निवास, चतुःशाला पद्धतीची म्हणजे मध्यभागी मोकळ्या व चारी बाजूस असलेल्या खोल्या यांची रचना व एकूणच नगररचनेच्या संदर्भात दिसणाऱ्या चित्रातील तपशील स्पष्ट केले आहेत. याशिवाय येथील वेशभूषा, केशभूषा यांच्याविषयीचे अचूक वर्णन केले आहे. पुढे या संदर्भात वॉल्टर स्पिंक यांचे झालेले काम लक्षात घेऊन वेरूळ येथील कैलास लेण्यांच्या निर्मितीच्या संदर्भात आपल्या ग्रंथातून कैलास निर्मितीच्या विविध टप्प्यांची नोंद घेऊन असे म्हटले की, कृष्ण पहिला याच्या काळात (इ.स ७५७ ते ७७२) कैलास मंदिर व त्याचे मुख्य प्रवेश नंदीमंडप, तळमजला, हत्ती व सिंहाची शिल्पे, अधिष्ठान, विजयस्तंभ यांची निर्मिती झाली होती. हा काळ बारा ते पंधरा वर्षांचा होता, तर दहाव्या शतकात कृष्ण तिसरा (इ.स ९३९ ते ९७०) याच्या मृत्यूनंतर वेरूळ येथील सर्व शिल्पनिर्मिती थांबली. कैलास निर्मितीबद्दलचा आपला सिद्धांत मांडताना त्यांनी एकूणच या परिसरातील उत्खनन केलेल्या क्षेत्राचे तपशील, उत्खनन केला गेलेला खडक, लागलेले मानवी श्रम, याचबरोबर शिल्पशैलींचे वैशिष्ट्य अशा अनेक बाबींचा विचार केला होता. कैलासच्या निर्मितीसंदर्भात यापूर्वी डॉ. हर्मन गोएटझ यांनी नोंदवले होते की कैलास मंदिराचा विकास एका राजाच्या कालखंडात होणे शक्य नव्हते. हे मत खोडून काढले व त्यांनी नोंदवले की दक्षिणेच्या स्वारीवर गेलेला दंतिदुर्ग व कृष्ण पहिला यांनी पट्टदकल येथील विरूपाक्ष मंदिर तसेच चालुक्य राज्यातील पापनाथ मंदिर पाहिले असावे. या वेळी मुळात कांचीवरून कीर्तिवर्मन या राजाने पल्लवांची शिल्पेही बदामीला आणली असावीत. बदामीवरून कृष्ण पहिला याने पल्लव व चालुक्य शिल्पकारांना वेरूळला आणून त्यांच्याकडून ही निर्मिती केली असावी. 'द आर्ट ऑफ इंडिया' या ग्रंथात शिवराममूर्ती यांनी भारतीय कलाशैलीचा विकासाचा क्रम देताना वाकाटक, गुप्त, चालुक्य, चोल, पल्लव, यादवांची नोंद घेतली असली तरी राष्ट्रकुटांची स्वतंत्र नोंद केली नव्हती. ओ. सं. गांगुली आणि ए. गोस्वामी यांच्या 'द आर्ट ऑफ राष्ट्रकुटा' (१९५६-५८) या कामानंतरच्या पुढच्या टप्प्यातील काम म्हणून डॉ. ढवळीकरांच्या 'मास्टर पीसेस ऑफ राष्ट्रकुटा आर्ट - द कैलास' (१९८३) या ग्रंथांची नोंद घ्यावी लागते. त्यांनी राष्ट्रकुटांची म्हणून शिल्प व स्थापत्यातील वैशिष्ट्य स्पष्ट केली. कैलास लेण्याच्या परलंकेतील यज्ञशाळेत मातृकामूर्ती व अन्य शिल्पांच्या संदर्भात राष्ट्रकुटांनी अधिक विकसित स्वरूपात घडवलेली शिल्पं त्यांनी लक्षात आणून दिली. याशिवाय राष्ट्रकूट शिल्पांची वैशिष्ट्ये म्हणून प्रचंड मोठा आकार, शिल्पातील नवचैतन्य, ऊर्जेने परिपूर्ण भरलेले सशक्तीचे होणारे दर्शन आणि शिल्प आपणाशी संवाद साधत आहेत असा प्रतीत होणारा भाव या बाबी त्यांनी अधोरेखित केल्या. वॉल्टर स्पिंक प्रमाणेच ढवळीकर स्पष्ट करतात की, ज्या ज्या ठिकाणी राजाश्रय व कामाची संधी होती, त्या त्या ठिकाणी शिल्पकारांचे



अनुक्रमणिका

समूह एका प्रदेशातून दुस-या प्रदेशात स्थलांतर करीत होते. वेरूळ लेण्यांची निर्मिती होत असताना राष्ट्रकूट काळात अशा सर्वच परिसरातील कलाकारांना, स्थपतींना मोठा राजाश्रय प्राप्त झाला होता. म्हणून भारतीय इतिहासात विशेषतः महाराष्ट्राच्या संदर्भात ७ वे ते १० वे शतक हा काळ राष्ट्रकुटांचा म्हणून संबोधला जातो.

डॉ. ढवळीकरांच्या कामाचे विविध पैलू त्यांच्या वैविध्यपूर्ण लेखनातून जाणवत राहतात. असे असले तरी इनामगाव उत्खनन प्रकल्प हा त्यांच्या एकूण व्यक्तिमत्त्वाला अधोरेखित करणारा ठरला. त्यांच्या उत्खननामध्ये त्यांनी अगदी डॉ. सांकलिया, डॉ. देशपांडे, डॉ. शां.ब. देव, डॉ. झेना अन्सारी या व अशा अनेक सहकाऱ्यांचे मार्गदर्शन व साहाय्य घेतले. असे असले तरी इनामगाव उत्खननामध्ये १९६०च्या दशकामध्ये अमेरिका व ग्रेट ब्रिटनमध्ये उदयाला आलेल्या सैद्धांतिक विचारधारा व ज्यामुळे पुरातत्त्वशास्त्रीय चौकट प्राप्त झाली होती- अशा पुरातत्त्वीय उत्खननाच्या विश्लेषण पद्धतीचा उदय झाला. अशा सिद्धांतांना भारतीय संदर्भात पडताळून घेण्याचा प्रयत्न त्यांनी इनामगाव येथे प्रथम केला व पुरातत्त्व उद्गाता लुई बिनफर्ड आणि त्याच परंपरेतील केंट फ्लॅनर्र या दोन पुरातत्त्व शास्त्रज्ञांचा पगडा डॉ. ढवळीकरांच्या विश्लेषण पद्धतीवर स्पष्ट दिसून येतो. त्यांनी केलेल्या कामांमुळे त्यांची जगभर नोंद घेतली गेली व डॉ. अन्सारी यांनी सुद्धा ढवळीकर यांचा श्रेष्ठ उत्खनन तज्ज्ञ म्हणून गौरव केला.

डॉ. ढवळीकरांच्या एकूण कामाची पद्धती पाहता नवीन क्षेत्रात काम करताना सर्व आंतरशाखीय संशोधनाचा उपयोग करून घेणे व सर्वांना बरोबर घेऊन काम करणे अशा पद्धतीमुळे भारतीय संदर्भात पुरातत्त्व विश्वास निर्माण झालेल्या तत्त्वज्ञानाचा पडताळून पाहण्यात ते यशस्वी ठरले. भारतीय पुरातत्त्व विभागाचे डायरेक्टर जनरल डॉ. देशपांडे यांच्या नंतरचा सर्वश्रेष्ठ पुरातत्त्वज्ञ अशी नोंद करावी लागते. जागतिक पर्यावरण व त्यांचा मानवी संस्कृतीवर पडणारा प्रभाव हा त्यांच्या दृष्टीने सतत चिंतनाचा आणि जिव्हाळ्याचा विषय होता. यातूनच त्यांनी पाण्याच्या शोधात असणाऱ्या सिंधू संस्कृतीच्या लोकांनी मोहंजोदडो, विशेषतः ढोलावीरा येथे बांधलेल्या विहिरींची नोंद घेत 'विहीर ही भारतीय संस्कृतीने आशिया खंडाला दिलेली देणगी आहे' असे मत नोंदवले.

मी महाराष्ट्र शासनाच्या गॅझेटिअर विभागाचा प्रमुख असताना (११९७-२००४) जी अनेक राज्य गॅझेटिअर प्रकाशित केली, त्यात महाराष्ट्र प्राचीन इतिहास या ग्रंथात सरांनी मोठ्या प्रमाणात लेखन केले. सातवाहन राजवंश हा महाराष्ट्रातीलच आहे हे सांगताना डॉ. अजयमित्र शास्त्री यांच्या लेखनावरील सरांचे टिपण उद्बोधक आहे. राज्य गॅझेटिअर स्थापत्य व कला ग्रंथाच्या प्रकाशनानंतर काही मंडळींनी एवढे मोठे काम केल्यावद्दल मुंबई हायकोर्टात धाव घेतली. या वेळी न्यायमूर्ती श्री. चंद्रचूड व धर्माधिकारी यांच्या खंडपीठाने असा निर्णय दिला की, या बाबत डॉ. म. के. ढवळीकर यांच्या अध्यक्षतेखाली नियुक्त केलेल्या समितीने या क्षेत्रातील वस्तुस्थिती पडताळून पाहावी व त्यांचा निर्णय हायकोर्टाचा निर्णय समजला जावा. सरांचे काम व क्षमता याची एका अर्थाने मुंबई हायकोर्टाने घेतलेली दखल होती व स्वाभाविकपणे मला मोठा दिलासा लाभला.

ढवळीकरांच्या अनेक कामांपैकी कंधार येथील राष्ट्रकुटांच्या नगरांचा घेतलेला शोध हे एक होते. त्यांनी केलेल्या उत्खननात ३७ मी. × ३२ मी. च्या चौरस आकारात क्षेत्रपाल मूर्तीचे अवशेष स्पष्ट झाले. या मानवी आकारातील क्षेत्रपाल शिल्पांची लांबी २३ मी. व रुंदी ७ मी. होती. एवढ्या प्रचंड आकाराचे मूर्तिशिल्प मध्य-आशिया खंडातील सर्वात मोठे मूर्तिशिल्प ठरले. उपलब्ध खंडित मूर्तिशिल्पे, त्यांनी केलेले विश्लेषण सुद्धा त्यांच्या प्रतिभेची साक्ष ठरतात. सरांच्या पर्यावरणवादी सिद्धांताची दखल भविष्यातसुद्धा दीर्घकाळापर्यंत घ्यावी लागेल पण शाकंभरी देवीची उपासना, गुप्तांच्या नंतरच्या राजवटीत फारशी नाणी उपलब्ध नसणे, राष्ट्रकूट, चालुक्य राजवंशाची विविध ठिकाणी सत्ताकेंद्र म्हणजे लष्करी छावण्या व स्थलांतराच्या परिणामाने विशेषतः आर. के. शर्मा व यासारख्यांच्या मताप्रमाणे सामंतशाहीच्या विशेष सिद्धांताच्या जवळ जाणारे विचार हे सर्वांनाच मान्य होतील असे नाहीत.

आर्यप्रश्नांचा त्यांनी केलेला अभ्यास हा मात्र या क्षेत्रातील येऊ घातलेल्या विचारधारेला नवी दिशा देणारा ठरतो. किंवहुना या संदर्भात त्यांनी आजपर्यंत झालेल्या एकूण कामाचा आढावा घेत जे विचार व्यक्त केले, त्यात लोकमान्य टिळकांच्या कामाची घेतलेली नोंद या सर्व बावी लक्षात घेता महाभारतात आर्यांचे मूळस्थान मेरू पर्वतीय प्रदेशात असल्याचा उल्लेख ही केवळ कविकल्पना राहत नाही. ऋग्वेदात मेरू पर्वताचा उल्लेख नसला तरी पार्झिटर याच्या मते एक ऋचा जी त्याने सूचित केली, ती हिरण्यगर्भ सूक्त यात पृथ्वीच्या उत्पत्तीची कथा आली आहे. या सर्व बाबींचा शोध घेत आर्य या भागात स्थिरावल्यावर पुढे अडीच-तीन हजार वर्षांनी ऋग्वेदाची रचना झाली, असे पार्झिटर याने दाखवून दिले. अशा प्रकारच्या चर्चेचे प्रतिध्वनी दीर्घकाळ उमटत राहतील हे निश्चित. हडप्पा संस्कृतीतील अग्निमंदिर व अग्निकुंड, पाकिस्तानात सरस्वती नदीला 'हाक्रा' असे नाव असणे व त्यामुळे येथे सापडलेल्या सिंधूपूर्व संस्कृतीला 'हाक्रा' असे नाव मिळणे व हेच लोक सरस्वती नदीच्या खोऱ्यातील आद्य वसाहतकार आहेत असे मानून हाक्रा संस्कृतीची व्याप्ती प्रामुख्याने सरस्वतीच्या खालच्या खोऱ्यात पश्चिमेकडच्या भागात होती. तेथे सिंधू व सरस्वती दोन्ही नद्या जवळजवळ आहेत. हे मेहेरगढ येथील उत्खननातून स्पष्ट होते. हाक्रा संस्कृतीचे लोक हे ऋग्वेदातील



अनुक्रमणिका

पांचजन्य संस्कृतीचे असावेत व ते सिंधूच्या खोऱ्यातून सप्तसिंधूच्या प्रदेशात आले असे सांगताना मायकेल विट्झेल लिहितात, 'ऋग्वेदातील सातवे मंडल म्हणजे निखळ इतिहास आहे' (विट्झेल १९९५) या मताचा आढावा घेत उत्तर सिंधुकालीन लोक वैदिककाळातील असल्याची दाट शक्यता ते व्यक्त करतात. आर्यांच्या मूळ वसतिस्थानाचा शोध घेताना पुरातत्त्वीय पुरावा व वाङ्मयीन उल्लेख यांचे विश्लेषण करत ते नोंदवतात की, दहा हजार वर्षांपूर्वी सिंधू खोऱ्यातील काही लोक लहान, छोट्या वस्त्यांतून राहत होते. हे मध्ययुगीन वंशाचे लोक होते. या वेळी पर्यावरण अनुकूल असल्याने प्रारंभी कंदमुळे, फळे व छोटे छोटे प्राणी निसर्गतः उपलब्ध होते. पुढे लोकसंख्या वाढली व पर्यावरण प्रतिकूल झाले. त्यांना शेती करण्यासाठी म्हणून काही काळ एका ठिकाणी वसती करणे आवश्यक वाटू लागले. या वेळी त्यांनी मातीची भांडी घडवली व दगडी हत्यारे बनवली. गड, किल्ले, गुल अहमद इ. ठिकाणांच्या उत्खननातून सापडले आहे. इ.स.पूर्व ५०००च्या सुमारास काही नव्या लोकांचे सिंधू खोऱ्यात आगमन झाले. प्रतिकूल पर्यावरणामुळे त्यांना सतत वस्त्या हलवाव्या लागत. इंडो-आर्यन भाषा बोलणारी ही मंडळी इ.स.पूर्व ५०००-४५०० मेहेरगढ येथे राहत होती. त्यांची तांब्याची हत्यारे, मातृदेवतेची उपासना व वैशिष्ट्यपूर्ण दफन पद्धतीमुळे या संस्कृतीला पुरातत्त्वज्ञ 'टोआगो' संस्कृती असे म्हणतात. पुढे याचा विस्तार पूर्वेकडे झाला व ते सरस्वतीच्या खोऱ्यात येऊन पोहोचले. तिथे हाक्रा संस्कृती उत्क्रांत झाली. पुढे पूर्वसिंधू संस्कृती व तिच्यातून नागरी सिंधू संस्कृती निर्माण झाली. तिचा विस्तार संपूर्ण सिंधू प्रदेशात झाला व याचे चित्रण ऋग्वेदातील रचनेत पाहायला मिळते. पुढे इ.स.पूर्व २२०० ते २००० प्रतिकूल पर्यावरणामुळे व्यापार मंदावला व सिंधू संस्कृतीचा ऱ्हास सुरू झाला.

सरस्वती नदी आटू लागली व लोकांची स्थलांतरे झाली. नदीच्या खालच्या खोऱ्यातील अनेकांनी आपल्या वरील भागातील वसाहती हलवल्या. तेथे वास्तव्य असल्याने ही स्थाने तीर्थस्थळे झाली. महाभारताच्या शल्य पर्वात (३७) बलरामाच्या तीर्थक्षेत्राचे वर्णन येते. ही सर्व स्थळे सरस्वतीच्या वरील खोऱ्यातील आहेत. (आर्यांच्या शोधात १९०८) डॉ. ढवळीकरांनी अगदी प्रारंभिक काळात 'अजिंठ्यातील सांस्कृतिक जीवन' यावर पीएच.डी.चा प्रबंध लिहिला. ऐन उमेदीत इनामगावचे उत्खनन केले व उत्तरार्धात सरस्वती, सिंधू संस्कृती, नदी व आर्य प्रश्नाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला. असे करत असताना या क्षेत्रातील संपूर्ण विविध प्रवाह, समकालीन वाङ्मय व पुरातत्त्वीय पुरावे यांचा परस्परसंबंध स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या व्यापक कामामुळे ते पुढच्या अनेक पिढ्यांना सतत प्रेरणादायी ठरतील. सरांची कामाची पद्धत, विश्लेषण क्षमता, चौफेर वाचन, मराठी व इंग्रजीवर असलेले विलक्षण प्रभुत्व व कार्यमग्नता यामुळे ते कुठलाही क्लिष्ट विषय सोप्या पद्धतीने मांडत असत. विरोधकांचे स्वागत असले तरी स्वतःच्या मतावर कायम असत.

म.न. देशपांडे यांच्यानंतर सूक्ष्म विश्लेषण क्षमता व तत्त्वज्ञानाची बैठक असलेल्या या श्रेष्ठ पुरातत्त्वज्ञाला विनम्र अभिवादन व भावपूर्ण श्रद्धांजली.

**ग्रंथसंपदा -**

- Sanchi: Cultural Study (1965)
- Ajanta Cultural Study (1973)
- Masterpieces of Indian Terracottas (1977)
- Masterpieces of Rashtrakuta Art: The Kailas (1983)
- Late Hinayana Caves of Western India (1984)
- The First Farmers of the Deccan (1988)
- Cultural Imperialism: Indus Civilization in Western India (1994)
- Indian Protohistory (1997)
- Historical Archaeology of India (1999)
- Environment and Culture: Historical Perspective (2002)
- Archaeology of Western India
- Ellora (2003)
- Elephanta
- The Aryans: Myth and Archaeology (2007)
- Satavahana Art (2004)
- Sanchi
- Pre-History of India
- Socio-economic Archaeology of India
- Cultural Heritage of Mumbai (2016)
- Ganesha: The God of Asia (2014)

**सह-लेखक**

- Mathura Art in the Baroda Museum, (Madhukar Keshav Dhavalikar -V. L. Devkar) (1971)
- Studies in Indian Archaeology (Sankalia H.D., Deo S.B., and Dhavalikar M.K.)
- Illustrated Manuscript of Pyushana Kalpasutra (Editors: S. L. Bapat, R. M. Poddar)
- **उत्खनन अहवाल**
- Paunar excavation, 1967, Shantaram Bhalchandra Deo, Madhukar Keshav Dhavalikar
- Excavations at Kayatha, 1975 (With Z. D. Ansari)
- Apegaon Excavations: (Report of the Excavation at Apegaon: 1976), Shantaram Bhalchandra Deo - Madhukar Keshav Dhavalikar
- Excavations at Inamgaon Vol 1, Pt. 1 (Dhavalikar M.K., Sankalia H.D. and Ansari Z.D.)
- Excavations at Kaothe, Madhukar Keshav Dhavalikar, Vasant Shinde, Shubhangana Atre
- Kuntasi, a Harappan Emporium on West Coast (Dhavalikar M.K., Raval M.R., and Chitalwala Y.M.)

**- अरुणचंद्र पाठक**
चलभाष : ९६१९०४६०६९



भाषण

डॉ. आशुतोष जावडेकर

# 'सोशल मीडियामुळे साहित्याचे लोकशाहीकरण'



वा नाट्य-साहित्य संमेलनाचं हे अध्यक्षीय भाषण सुरू करण्याआधी मी व्यासपीठावरील सर्व मान्यवरांना अभिवादन करतो आणि तुम्हा उत्साही प्रेक्षकांचं इथे या सुंदर सभागृहात स्वागत करतो. साहित्य दिंडी नुकतीच खांद्यावर वाहून आपण इथे सभागृहाच्या आत आणली आहे. 'सॉक्रेटिस ते दाभोलकर' असा आयाम असणारं पथनाट्य इथे सादर झालं आहे आणि मला मनोमन हे संमेलन इस्लामपूरला असण्याचं औचित्य जाणवत आहे. मुंबई-पुणे-नागपूर ही केंद्रं व परिघावरची ही उर्वरित साहित्यिक ठाणी यांतला भेद किंवा संघर्ष जागतिकीकरणाच्या काळात वेगळं वळण घेतोय. केंद्र-परीघ असं द्वंद्व तपासलं तरी सध्या सहज ध्यानात येतं की परिघावर जास्त जिवंतपणा आहे. मी व्याख्यानं, माझे कार्यक्रम, मुलाखती या निमित्ताने महाराष्ट्रभर-खरं तर देशभर फिरतोय आणि मला हे राहून राहून जाणवतं आहे की केंद्राहून परीघ हा साहित्याला-संगीताला अधिक आस्थेने जोपासतो आहे. त्यामुळे आपल्या देशातलं ४-जी झालेलं जे पहिलं शहर आहे त्या इस्लामपूरमध्ये हे नवा जागतिक सूर आळवणारं युवा नाट्य-साहित्य संमेलन व्हावं, हे या पार्श्वभूमीवर अधिकच मोलाचं आहे. एक तर आत्ताही ही युवा पिढी शहरी-ग्रामीण-निमशहरी भेदात मानसिकरीत्या अडकलेली नाही. व्हॉट्सअॅप आणि फेसबुकमुळे बसल्या जागी युवकांना बाहेरचं जग, तिथले नियम आणि तिथली निर्मिती ही माहिती होते आहे. तसंच आजचं संमेलन हे नाट्य आणि साहित्य या दोन्ही कलांना कवेत घेणारं आहे. हे वेगळं आणि अर्थपूर्ण आहे. 'नाट्य' म्हटलं की समोर एकांकिका किंवा नाटक येतं. पण तसं म्हणायला नको खरं तर. 'नाट्य' या संज्ञेत व्यापक अर्थाने अभिवाचन, कीर्तन, कवितावाचन व गायन, व्याख्यान असं रंगमंचीय संवेदन येऊ शकतं. एखाद्या चांगल्या लेखकाची सशक्त व्यासपीठावर झालेली मुलाखत हेही 'नाट्य' या संज्ञेत येऊ शकतं आणि मुळात नाट्य हे साहित्याचं आरशासारखं बाह्यरूप असतं. तसंही आजकाल इंग्रजी समीक्षेमध्ये (जी मी अधेमधे विद्यार्थ्यांना शिकवतो,) 'Text' ही संज्ञा खूप व्यापक अर्थाने वापरली जाते. एखादा चित्रपट किंवा छोटी जाहिरात किंवा व्हॉट्सअॅपवर फिरणारा ग्राफिक विनोद हे सारंच 'Text' असू शकतं. तेव्हा आज कलाप्रकारांची घट्ट भिंत न जुमानता ते वर्गीकरण मोडू पाहतं आहे आणि आजच्या संमेलनाचं शीर्षकच त्या सगळ्याची साक्ष देत आहे.

कितीतरी नवे नाट्यकर्मी आणि लेखक मला आसपास उत्तम निर्मिती करताना दिसत आहेत. त्यातले काही आता प्रस्थापित झाले आहेत. काहींचे लगेच कंपू झाले आहेत. काही नव्या वाटा शोधत आहेत, तर काही अल्प यशाने गुंगून, हरवून गेले आहेत. हे चालायचंच. पण तरी नवा सशक्त सूर मला मराठी साहित्यात उतरताना दिसतो आहे. कवी केवढेतरी आहेत आणि ते अनेक प्रयोग करताहेत. माझ्या पिढीची चाळिशीची 'समजुतीची कविता' विरुद्ध तिशीच्या-पंचविशीच्या पिढीची 'अॅटिट्यूडची कविता' असं एक द्वंद्व मला कल्पिता येतं. कविसंमेलनं तर ढिगानं होत असतात. काळ्या मातीत नॉस्टॅल्जिक गहिवर सहसा तिथे टाळ्या-वन्स मोअरची दाद मिळवतात. रंगमंचीय कविता ही कुणा समीक्षकांना आवडो न आवडो, ती राहणार आहे. कारण सगळ्या कविता काही आतल्या आत वाचायच्या अशा नसतातच मुळी. पण मग अभिवाचनात हे नवे कवी काहीसे कमी पडतात. रंगमंचावरची मूलतत्त्वंही ते जाणून घेत नाहीत. (आणि कविता वाचण्याआधी प्रस्तावनेची भरताड ते लावतात!) पण एकंदर मराठीत नवे युवा कवी वेगळं जग मांडत आहेत. हे नक्की. ललित गद्यामध्ये हिमांशू स्मार्तसारखा इथल्याच जवळचा कोल्हापूरमधला लेखक अतिशय ताकतीचं लिहितो आहे. कादंबरी हा प्रकारही हृषिकेश गुप्ते, मृणालिनी वनारसे, गणेश मतकरी, प्रतीक पुरी असे अनेक नवे लेखक उत्तमरीत्या हाताळत आहेत. 'सिरीयल' आणि चित्रपट संहिता हेही उपयोजित साहित्यामध्ये मोडायला हवं. त्यामध्ये मनस्विनी लता रवींद्र सारखी लेखिका 'दिल दोस्ती दुनियादारी'सारखी मालिका कवयित्रीच्या तरलतेने लिहिते आहे. सचिन कुंडलकर आणि तेजस मोडक 'गुलाबजाम'सारख्या चित्रपटातून वेगळी कथा आणत आहेत. कथाच आहे ती, पण कागदावर नसून पडद्यावर बोलणारी. ग्रामीण आणि शहरी अशी दोन्ही लेखन-घटितं मला लगोलग स्मरताहेत आणि ध्यानात येतंय की, दोन्ही त्यांच्या प्रतिमेत अडकली आहेत, साचेबद्ध झालेली आहेत. एकतर जागतिकीकरणाने ती जवळ आली आहेत आणि एकमेकांत मिसळत आहेत. ते मिसळणं मला मराठीत आत्ता अभावानं दिसतं. सगळे सतत बोलतात ते fragmentation विषयी.



अनुक्रमणिका










**महाराष्ट्र साहित्य परिषदेचे युवा साहित्य नाट्य संमेलन इस्लामपूर येथे प्रसिद्ध लेखक आणि संगीतकार डॉ. आशुतोष जावडेकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले.**
**त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा संपादित अंश..**



भंगलेपणाच्या जाणिवेविषयी. ती जाणीव काही जागतिकीकरणाची निजखूण आहे, असं मला वाटत नाही. खेरीज ती जाणीव नेहमी नकारात्मक नजरेने बघावी असंही कुणी म्हणणार नाही खरं तर. साधं बघा, फोनवर एकीकडे मित्राशी शेअर बाजाराच्या गप्पा मारताना दुसरीकडे मैत्रिणीला हृदयाचं चिन्हही चॅटवर माणसं पाठवतात आणि हे टेक्निकली भंगलेपणच असलं तरी ते आता सरावाचं आणि सोयीचंही झालेलं आहे. त्या भंगलेपणाची ही सोय आणि तो सराव मराठी नव्या नाटकात-साहित्यात किती अंशी येतो, हा मात्र मला प्रश्न पडतो.

जागतिकीकरणात आणि साहित्य-नवं साहित्य याचा विचार करताना पहिल्यांदा जाणवतं की अभिव्यक्त होण्याबद्दल हे बाह्य बदल आहेत. साधं पत्र ते इ-मेल ते थेट चॅट असा संवाद रंगू लागला, तेव्हाच भाषा आणि भाषिक व्यवहार बदलणार हे उघड होतं. ते बदलले. सोशल मीडियामुळे साहित्याचं लोकशाहीकरण झालं आहे, हे माझं प्रतिपादन मांडणं जरुरीचं आहे. फेसबुक पोस्ट आणि ब्लॉग हे मला साहित्याचेच प्रकार वाटतात. त्यात साहित्यिकता कमी-जास्त असेल (जशी प्रकाशित ग्रंथातही असते.) पण तेही साहित्याचंच नवं रूप आणि विस्तार असं दोन्ही आहे. किती नवे लेखक तिथे अभिव्यक्त करताहेत स्वतःला! नुकतीच एबीपी ब्लॉग स्पर्धा झाली, त्याचा मी परीक्षक होतो. तेव्हा त्या वाहिनीच्या शूट झालेल्या ( व प्रक्षेपित होऊन सोशल मीडियात सर्वत्र फिरलेल्या) माझ्या भाषणात मी ब्लॉग हा दीर्घ 'डिस्कोर्स' कसा आहे, हे मांडलं होतं. (डिस्कोर्सला मराठीत सध्या 'चर्चाविश्व' म्हणतात, पण ती संज्ञा मला अपुरी, त्रोटक आणि अर्थापासून दूर नेणारी वाटत असल्याने मी 'डिस्कोर्स (Discourse असंच म्हणतो आहे.) आनंद मोरे, रेणुका खोत, विकास पांढरे आदी ब्लॉगर्स सणसणीत लिहीत आहेत आणि त्यांना वाचकही लाभत आहेत. फेसबुकवर तर पुसताच सोय नाही! नवे फेसबुककर्ते लेखक दमाने लिहीत आहेत. त्याचे फायदे तोटे दोन्ही आहेत. संपादक नसणं हा महत्त्वाचा घटक आहे त्यातला. संपादकाच्या मर्जीने प्रसिद्ध होणं याचा अर्थच आता राहिलेला नाही. ते पुष्कळ चांगलं कारण त्यामुळे नवं लेखन समोर येतंय. ते थोडं वाईट, कारण ते लेखन संस्करणरहित असंही अनेकदा समोर येतंय. फेसबुकवर वाचकांची लगेच व थेट प्रतिक्रिया मिळते. स्तुतिपाठकांच्या घोळक्यात हरवू शकतो लेखक; पण खऱ्या, उमेद देणाऱ्या प्रतिक्रियाही मिळतात त्याला अनेकदा. तिथेही कंपूशाही आहे. मार्केटिंगदेखील आहे. पण अधिकांश फेसबुक पोस्ट या उमद्या, उत्साही संहितांना वाचकांसमोर आणतात. रॉलँड बार्थसची 'Reader response theory' समीक्षेत वेगळा आयाम घेऊन आलेली. लेखकाहून वाचकाला त्या थिअरीनं केंद्रभागी आणलं. आताही नेमकं तेच अधिक प्रभावीपणे घडतंय. अर्थाच्या शक्यता वाचक फेसबुक पोस्टवर त्वरेने, वेगळ्या दिशेने, वेगळं वळण घेत मांडताना मी बघतो आहे. कवितेला फेसबुक हे साजेसं माध्यम आहे. प्रवासवर्णनाला ब्लॉग जास्त सोयीचा. कादंबरीला मात्र यातलं काही नाही. ('ग्राफीक नॉव्हेल' मात्र सोशल मीडियात फायदेशीर आहे.) कथा भागांमध्ये आता लेखक फेसबुकवर प्रकाशित करताना मी बघतो आहे. मुख्यतः ग्रामीण व शहरी असे दोन्ही युवक ही सामाजिक माध्यमं लेखनासाठी वापरताना दिसताहेत. आणि मग इस्लामपूर ते इस्तंबूल हे जिथे जिथे मराठी वाचक आहेत, तिथे तिथे हे नवं लेखन पोहोचतं आहे!

आणि व्हॉट्सॲप! त्याने तर भाषाच बदलते आहे. अनेक उत्तम कविता, लेख, त्यांच्या लिंक्स, व्यंगचित्रे हे सारं व्हॉट्सॲपने इकडून तिकडे क्षणात जातं आणि मग भराभर ते मराठी भाषिकांच्या कानाकोपऱ्यात जाऊन पोचतं. यात कधी कॉपीराईटचे गंभीर प्रश्नही असतात. उचलेगिरी असते. दुसऱ्याची कविता, लेख आपल्या नावावर पसरवलं जातं व्हॉट्सॲपवर. माझे स्वतःचे वर्तमानपत्रात प्रकाशित झालेले लेखही कधीकधी फिरून येत दुसऱ्यांच्या नावानिशी माझ्या व्हॉट्सॲपवर जमा होतात. पण व्हॉट्सॲपने साहित्य नव्हे भाषेवर परिणाम घडतो आहे तो निराळ्या संबंधात. मुळात अजून सगळे मराठीत टाईप करत नाहीत फोनवर. मग संवाद मराठी भाषेत पण रोमन लिपीत होतो. त्यावरच एक नवं व्याकरणदेखील तयार होताना मला दिसतं आहे. ''तुमचा पिंटू अगदी गोड आहे.'' हे टाईप करताना पूर्वी लोक god लिहायचे व नकळत समोरचा माणूस 'गॉड' असं वाचायचा. आता मराठी 'गोड' रोमन लिपीत लिहिताना अनेकजण 'goad' असं स्पेलिंग करतात. रोमन लिपीच्या वापराने मराठी मरणार आहे असं लोक म्हणतात, तसं नसतं. लिपी बदलत जाऊनही भाषा

वाढू शकते. (कुर्दी भाषा, तुर्की भाषा या अरेबिक ते रोमन लिपी असा प्रवास केलेल्या आहेत.) पण त्याहून मोलाची गोष्ट ही आहे की चिन्हांच्या वापराने भाषेचा संकोच होतोय का, हे तपासणं. एक अंगठा आता पुरतो. एक स्माईली बरेच अर्थ संभाषणाला प्रदान करतं. हा मोठा बदल आहे आणि आपली समीक्षा, जी अजून पढिक रस्त्यांमध्ये अडकून पडली आहे, तिने हे असे विषय programatics च्या नजरेतून बघणं आवश्यक व कालसुसंगत आहे.

या नव्या जगात साहित्य वेगवेगळ्या तऱ्हांनी पोहोचतं आहे. वाचकांपर्यंत मग PDF फाइल ते इ-बुक्स ते आता ऑडिओ बुक्स असा मोठा प्रवास मला दिसतो आहे. यातही अभिजात विरुद्ध सामान्य हा वाद आहेच! आजचं नवं साहित्य एकाच वेळी अभिजात व पॉप्युलर असू शकतं. झुंपा लाहिरीची 'नेमसेक' कादंबरी त्याचं उत्तम उदाहरण आहे. मराठीत लेखकांनी मात्र स्वतःभोवती 'अभिजात' किंवा मग 'पॉप्युलर' असा एक कुठला तरी पाश उगाच घालून घेतलाय की काय, असं वाटत राहतं. फेसबुकवरही हे दोन स्तर मला आढळतात. पण मी आजच्या भाषणासाठी मात्र फेसबुकवरच्या वाचकांना, साहित्याची जाण असणाऱ्या फेसबुककर्त्यांना काही मुद्दे पाठवायला सांगितलं होतं. त्यांचा सहभाग या अध्यक्षीय भाषणात मी मुद्दाम करतोय. हेही लोकशाहीकरण आहे, असं मला वाटतं. हा इशान पिंगळे लिहितोय, ''फार कमी लोक मराठी वाचतात आणि कॉलेजमध्ये तर स्टेट्स सिंबॉल म्हणून इंग्रजी वाचतात.'' मनोज तुळपुळे लिहितात, ''साहित्यावर टीका करायला व टीका झेलायला घाबरू नका म्हणावं. ही तरुण मुलं- तू माझ्या लिखाणावर गोड बोल, मी तुझ्या लिखाणावर गोड बोलतो हे लवकर शिकली आहेत. त्यांचे कंपूही फार झटकन होताना दिसत आहेत.'' पुष्पा क्षीरसागर म्हणताहेत, ''पुरुषी वृत्तीतून होणारी घुसमट मोकळेपणाने व्यक्त करायला शिका. निकोप कुटुंबासाठी ते आवश्यक आहे.'' हा अतुल पद्मिन दिलीप लिहितोय, ''मनात लय खदखदतंय, ते बाहेर कसं काढावं, सुरुवात कशी करावी? लिहायला गेलं की गोंधळ होतो... लोड येतो की हे आवडेल का लोकांना?''

ही काही उदाहरणं सजग वाचकवर्गाविषयी सचिंत असलेल्या- भूतकाळात रेंगाळणाऱ्या माणसांना वर्तमानकालीन साहित्यआस्था, साहित्यव्यवहार दाखवायला. ही फेसबुकीय उदाहरणे पुरेशी आहेत. तुम्ही तरुण इथे समोर आहात आणि हे संमेलन तुमचं आहे.

यावरून महत्त्वाचा व नेहमीच्या वादग्रस्त विषयांवर संमेलनाची गरज काय, असा प्रश्न नेहमी उपस्थित केला जातो. अरे, किती साधं आहे. सुतकी चेहऱ्याचे ब्रिटिश नाहीयोत आपण. आपणा भारतीयांचा पिंडच उत्सवप्रिय आहे. तो डीएनए आहे आपला! संमेलनातून नवे वाचक व लेखक तयार होण्याची शक्यता असते हेही केवढं महत्त्वाचं आहे! आणि मग चर्चा होते राजकारणी व साहित्यिक यांची, त्या नात्यांची. साहित्य हे मूलतः राजकीय व सामाजिकच असतं. अगदी प्रेमकविता असली तरी त्या प्रेमामागे तत्कालीन अर्थकारण, राजकारण आणि समाजकारण हे उभं असतंच. पण म्हणून सामाजिक विषयावरचं लेखनच अस्सल असं नाही. तसं म्हटलं तर आख्खे जी.ए. कुलकर्णी, निम्मे पु. ल. आणि संपूर्ण अरेबियन नाईट्स वगैरे मोडीत काढायला लागेल. साहित्यिक विरुद्ध राजकारणी ही वायनरीही फसवी आहे. साहित्यिक हा सामाजिक घटित असतो. साहित्यिकांमध्ये कसलेले संघटक व राजकारणी असतातच. दुसरीकडे यशवंतराव चव्हाणांपासून आजच्या काळातही अनेक राजकारण्यांना उत्तम साहित्यिक समज होती व आहे. कधीकधी दोन्ही बाजूने थोडी उथळ विधाने केली जातात. मीडियामध्ये ती गाजतात. निषेध हा सध्या तरी अनेकदा धोरणी, चतुर व सिलेक्टिव्ह असतो. आणि कड घेणंही तसंच असतं. इथून जवळ कऱ्हाड आहे. आणीबाणीत कऱ्हाड संमेलनात दुर्गा भागवतांनी जी धमक दाखवली, तशी धमक मला तरी आसपास दिसत नाही!

आणि एक मोठ्ठा युवा वर्ग आहे जो यापासून लांब आहे. त्याला लिहायला वाचायला आवडतं. त्याची जगताना प्रत्यही घुसमट होत असते. अस्मितांच्या सामाजिक, राजकीय राजकारणात विवेक बाजूला ठेवून तो कधी सामील होतो. वाट चुकल्याचं कळलं तर परततो. त्याच्या विवेकी जगण्याला बळ द्यायला कधी नव्हे इतकी साहित्याची समाजाला गरज आहे! डाव्या आणि उजव्या पलीकडे साहित्य असतं आणि राजकारणदेखील! डाव्या-उजव्यामध्ये एक सामायिक रस्ता असतो. तो समजुतीचा आणि सहमतीचा असतो. त्या रस्त्यावर या पिढीला आपल्याला आणायचं आहे. ही नवीकोरी पिढी लोकशाहीचा स्वतंत्र ॲटिट्यूड धारण करणारी सशक्त पिढी आहे. रूपकात्मक निषेध करतानाही 'राजा आणि प्रजा' हे शब्द व संकल्पना ती वापरत नाही! माझ्या आत जो एक लहानसा पण नेमका बंडखोर आहे, त्याला ही पिढी सुखावते, आश्वस्त करते!

तुकोबांच्या 'निर्धार' या अभंगाचं मी नुकतंच वाहिनीसाठी गाणं केलेलं. ज्ञानदेव तर माझ्या तिन्ही पुस्तकांमध्ये epitaphच्या रूपात आहेत. ते सशक्त मराठी शब्द-विचार संचित या तरुण पिढीला जगण्याची पायवाट दाखवेल. ''तुज मज नाही भेद, केला सहज विनोद। तू माझा आकार, मी तो तूच निर्धार...''

तसा अनोखा निर्धार- आत्मप्रत्ययाचा निर्धार, समाजाच्या जाचक रूढी मोडण्यापासून ते खुलेपणाने प्रेम करण्यापर्यंतचा निर्धार या युवा पिढीला मिळावा आणि त्यांनी तो मराठीत शब्दबद्ध करावा, हीच शेवटी इच्छा व्यक्त करतो आणि थांबतो.

●

डॉ. आशुतोष जावडेकर
ashudentist@gmail.com



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका





भाषण

डॉ. तारा भवाळकर

# संतचळवळ : उपेक्षितांना आत्मस्वर देणारी चळवळ!

ज्ञानियांचे राजे संत श्री ज्ञानेश्वर महाराज यांच्या संजीवन अस्तित्वाने इंद्रायणीकाठी नांदत असलेल्या देवांच्या आळंदीच्या पुण्यभूमीला अंत:करणपूर्वक अभिवादन करते. ज्ञानेश्वर माउलींचे ऋण मस्तकी धारण करून विनम्र नमस्कार करते आणि विषयाकडे वळते.

परमार्थ मार्गावरच्या कोणाही व्यक्तीला प्रपंच हा सर्वांत मोठा अडथळा असतो. येथे प्रपंच व्यापक अर्थाने अभिप्रेत आहे. स्वतःचीच देहाबद्दल आणि देहसुखाबद्दल आसक्ती हा सर्वांत मोठा अंत:स्थ अडसर. शिवाय लोकलज्जा हा दुसरा बाहेरचा अडथळा. त्यामुळे,

रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग ।

अंतर्बाह्य जग आणि मन ।।

या शब्दात तुकाराम महाराज या स्थितीचे वर्णन करतात, ते प्रातिनिधिक समजायला हरकत नाही. संत-स्त्रियांच्या बाबतीतही हा झगडा आहेच. पण त्या अंतःस्थ मनाशी असलेल्या झगड्याइतकाच जगाशी असलेला झगडा मोठा आहे. पुरुषाने मनाच्या झगड्यावर विजय मिळवला की जगाशी झगडण्याचे त्याचे काम तुलनेने सोपे होते. पण स्त्रीची शरीराची आसक्ती संपली तरी सहजासहजी प्रपंचातून सुटका होत नाही.

स्त्रियेचे शरीर पराधीन देह ।

न चले उपाय विरक्तीचा ।।

हा अनुभव येतो. शरीराचे भोग वैरी वाटू लागले, तरी प्रत्यक्षात त्यातून सुटका करून घेताना प्रचंड अडथळे येतात. स्त्रीच्या बाबतीतला प्रपंच म्हणजे प्रामुख्याने तिचे सासर. मध्ययुगीन स्त्रियांना तर विवाहाखेरीज पर्यायच नव्हता. संत मुक्ताबाई आणि संत जनाबाईसारख्या ज्या स्त्रिया अविवाहित राहिल्या, त्यात त्यांच्या इच्छेचा फारसा प्रश्नच नव्हता. तत्कालीन समाजरीतीला त्यांचा विवाह मान्य नव्हता; म्हणून होऊ शकला नाही.

संन्याशाची मुले म्हणून ज्या समाजाने मुलगे असूनही ज्ञानदेवादी भावांच्या मुंजीला प्रतिबंध केला, तो समाज मुक्ताबाईसारख्या मुलीचा विवाह सुखासुखी कसा मान्य करील? शिवाय जन्मजात ज्ञानी आणि मुक्तीची ओढ असलेल्या या मुलीशी विवाह करण्याची इच्छा तरी कोणत्या पुरुषाला होईल? प्रचलित प्रस्थापित समाजात तिच्या विवाहासाठी प्रयत्न तरी कोण करणार? तिच्या भावांना ज्या समाजाने बहिष्कृत केले होते, त्या भावांना जरी वाटले असले तरी समाज त्यांना मानायला कोठे तयार होता? मुक्ताबाईंच्या विवाहाविषयी काहीच उल्लेख नाहीत. पण तिचा विवाह न होण्यामागे स्वेच्छेचा भाग किती अन् तत्कालीन परिस्थितीचा भाग किती, याचा अंदाज करणे शक्य आहे आणि तो यापेक्षा फारसा वेगळा असणे संभवत नाही. जनाबाईंचे तर बालपणीच आईबाप वारले. दामाशेटीकडे कष्टाची कामे करून आश्रित म्हणून राहणारी ही अंत्यज (बहुधा) मुलगी. हिच्या विवाहाची जबाबदारी तरी कोण घेणार? शिवाय

विदुर सात्त्विक माझिये कुळीचा ।

म्हणत असताना तिने केवळ सात्त्विकतेच्याच बाबतीत त्याच्या कुळाशी नाते जोडले होते, की विदुराच्या जन्मकुळाशी साधर्म्य दाखवण्याचा तिचा अभिप्राय होता, हे गूढ उलगडणेही कठीण आहे. जर दुसऱ्या प्रकारचे नाते असेल तर तिच्या विवाहाचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

तात्पर्य, असे अपवाद सोडले तर त्या काळात मुलीचे स्वेच्छेने अविवाहित असणे अशक्य होते.

अशा परिस्थितीत स्त्रीला विवाहाखेरीज पर्याय नाही. त्यातही ते विवाह बहुधा बालपणीच होत. त्यामुळे सासर आणि पती निवडण्यात तिच्या इच्छेचा, मनाचा, मताचा विचारच नसे. घरातील ज्येष्ठ मंडळी निवडतील तो नवरा अन् ते सासर मान्य करण्यावाचून गत्यंतर नसे. आजही बहुसंख्य मुलींच्याबाबत ही स्थिती आहे, तर त्या काळातला प्रश्नच नाही.

त्यातही संत बहिणाबाईंसारखा तो बाला-जरठ विवाह असेल आणि पती विशेष अहंकारी (बहुधा नवरा म्हणून एक 'अहं' असतोच) असेल तर त्या मुलीच्या हालाला पारावर राहत नसे. एखादीला प्रपंचाची खरोखर इच्छा असेल, आवड असेल तर अशा परिस्थितीत पतिसहवास अन् दांपत्यजीवन यांबाबत दहशत बसायची आणि नावड निर्माण होण्याची शक्यता जास्त.

तीन वर्षांची अजाण बालिका असलेल्या संत

अनुक्रमणिका





**महाराष्ट्र साहित्य परिषद आणि श्री ज्ञानेश्वर महाराज संस्थान कमिटी आळंदी यांच्या वतीने पहिले पसायदान साहित्य संमेलन लोकसाहित्याच्या आणि संत साहित्याच्या व्यासंगी अभ्यासक डॉ. तारा भवाळकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झाले. त्यांच्या अध्यक्षीय भाषणाचा संपादित अंश...**



बहिणाबाईंचा विवाह तीस वर्षांच्या प्रौढ पुरुषाशी होतो. ही कल्पनाच अमानुष आणि विवाहाविषयी घृणा निर्माण होण्यास पुरेशी आहे. स्त्री-पुरुष संबंधांतील नैसर्गिक ओढ आणि आसक्ती संपून जायला यापेक्षा जास्त कशाची गरज नाही. त्यातही तो पुरुष स्त्री-उपभोगासाठी आतुर असेल तर मुलगी किमान बारा वर्षांची होईतो पुरुष चाळिशीला आलेला असतो. अशा परिस्थितीत वयाच्या सोळा- सतराव्या वर्षीच 'शरीरभोग जर तिला वैरी वाटू लागले' अन् तिच्या ठायी वैराग्य निर्माण झाले तर आश्चर्य नाही.

संत बहिणाबाईंसारखीच दुसरी विठाबाई! पतीच्या लैंगिक आक्रमणाचे वर्णन तिने अगदी स्पष्ट शब्दांत केले आहे.

भ्रतार हो मजसी ओढितो एकांती ।
भोगावे मजसी म्हणोनिया ।।
ओढोनिया बहुत मारितो मजसी ।
मध्यरात्री जाणा समयासी ।

अजाण बालिका वधू आणि प्रौढ, भोगातुर पुरुष एकत्र आल्यावर त्या मुलींना कोणत्या भीषण अनुभवातून जावे लागले असेल याची कल्पनाचित्रे रंगवत बसायची गरजच नाही! विठाबाईंनी इतक्या सहज निर्व्याजपणे ती घटना साध्या सरळ शब्दांत मांडली आहे की, त्याच्या सच्चेपणाविषयी शंकाच राहू नये. स्त्रीच्या लैंगिक अनुभवाविषयी सामान्य पारंपरिक स्त्रीच्या बाजूचे मत, पुरावे (व्यक्त - लिखित) भारतीय स्त्रीच्याबाबत क्वचितच मिळतात. संत-स्त्रियांजवळच्या कवित्वशक्तीमुळे त्यांच्या सहज झालेल्या काही नोंदी त्या दृष्टीनेही महत्त्वाच्या आहेत.

सरळ प्रपंचेच्छू स्त्रीच्या मनातही विरक्ती निर्माण व्हावी असे जर हे अनुभव असतील तर ज्यांच्या मनात मुळातच प्रपंचाची ओढ नाही, अशा स्त्रियांना प्रपंचात अडकावे लागले असेल तर त्यातून सुटण्याची धडपड करतानाही त्यांना किती यातना सहन कराव्या लागल्या असतील, याची कल्पना येते. त्यांच्या रचनांतूनही त्यांचे पुरावे मिळतात.

अशा सासुरवाशीण संत-स्त्रियांविषयी स्त्रीरचित लोकगीतसरणीच्या रचनाही आहेत. त्यातून सर्वसामान्य स्त्रीचा सासर व पतीविषयक अनुभव मुखर होतो. संत सखू या अशाच एक विठ्ठलभक्त स्त्री. तिची रचना उपलब्ध नाही. पण त्यांची कथा मात्र उपलब्ध आहे. स्त्री-गीतांतूनही ती वेधकपणे सांगितली आहे.

कृष्णातीरी कन्हाडनगरी
क्षेत्र बसविले ब्रम्हपुरी ।।
दुराचारी ब्राह्मण नांदे,
सून सखू भाग्याची खरी ।।

अशा पंक्तींनी गीताला सुरुवात होते.

सखुबाई या मोठ्या विठ्ठलभक्त असतात. अशात एकादशी येते. सखूला पंढरीची ओढ लागते. सासरी सांगून-सवरून पंढरीला जाणे शक्य नसते. ती सख्यांसह नदीवर घागर घेऊन पाण्याला जाते. पंढरीची ओढ अनावर होते. अखेर,

गंगेवरती घागर ठेऊन,
सखू चालली पंढरीसी ।।

ही वार्ता तिच्या मैत्रिणींनी सासूला जाऊन सांगितली. सासूला भयंकर राग आला. तिने मुलाला सांगितले.

त्या पुत्राला इतका राग आला की तो काठी घेऊन निघाला.

हाणीत मारीत सखू आणिली ।
कोंडिली पहा खोलीत ।।

पुढची कथा ही नंतरच्या काळात घडवलेली, उदात्तीकरण घडवणारी सांकेतिक चमत्कारकथा आहे. पांडुरंगाने तिला बंदिस्त खोलीत दर्शन दिले आणि पतीने तिला बांधून घातले होते, त्या बंधनातून मुक्त केले.

या घटनेचा साधा सरळ व्यावहारिक पातळीवरचा अर्थ इतकाच की, संत सखूचे प्राण देहमुक्त झाले. एका अर्थी ती सासरच्या अन् पतीच्या बंधनातून कायमची मुक्त झाली. ही कथा केवळ संत सखूची नाही. विठाईची कथाही सखूच्या कथेशी साधर्म्यच दाखवते. सासरच्या जाचाला-अन् विशेषतः पतीच्या कामलंपटतेला-विटून तिने घर सोडले अन् स्वप्नात दृष्टान्त झाल्यानुसार चिदंवर स्वामींच्या मंदिरात गेली. सासरची मंडळी नेण्यासाठी आली. पतीने इतकी मारहाण केली की, ती बेशुद्ध पडली. पण विठाईने मात्र पतीला बजावले होते,

तुझी सत्ता आहे, देहावरी जाण।
माझेवरी तुझी किंचित नाही।।

हा देह म्हणजे संपूर्ण 'मी' नव्हे, याचे भान विठाईने प्रथम व्यक्त केलेले दिसते. विवाहाने स्त्रीच्या देहावर फार तर पतीची सत्ता प्रस्थापित करता येईल, येते. पण तिचे मन आणि आत्मा बंदिस्त करता येणार नाही, हे सांगण्याचे धाडस तिने केले.

आत्तापर्यंत संत-स्त्रियांच्या ज्या चरित्ररेखा पाहिल्या, त्या प्रत्येकीच्या चरित्रातून अखेर हाच निष्कर्ष निघतो की, विवाहाने त्यांची शरीरे परावलंवी झाली तरी मने स्वतंत्र राहिली.

तशी तर स्त्री विवाहित असली काय, अविवाहित असली काय अन् विधवा असली काय, देहसंबद्ध तिचे चारित्र्य, त्यासंबंधीचे लोकनिर्बंध, लोकसमज आणि मुख्य म्हणजे लोकेच्छा हा एकूणच स्त्री-जीवनातला मोठा अडसर आहे. त्याच्या आधारे एखाद्या स्त्रीला समाज जीवनातून उठवू शकतो. स्त्रीच्या लैंगिक जीवनासंबंधीचे लोकनिर्बंध हाच तिच्या चारित्र्याचा अन् अस्तित्वाचा निकष ठरतो.

म्हणून लोकलज्जेचे, लोकापवादाचे दडपण स्त्री-मनावर सतत असते, ती भयाची अनामिक टांगती तलवार असते. समाजाच्या हातातले ते एक शस्त्र असते. सीता-द्रौपदीसह अनेक स्त्रिया आजवर या लोकनिर्मित चारित्र्याच्या मापदंडाने दंडिल्या गेल्या आहेत. मग संत-स्त्रिया तरी त्याला अपवाद कशा असणार? मुख्य म्हणजे त्यांचे संतत्व सिद्ध होईपर्यंतच्या वाटचालीचे काय? नंतर याच लोकांनी सीता-द्रौपदीसह सर्व स्त्रियांचा उदो उदो केला. पण त्यांचा छळ करण्यात आधी हाच समाज पुढे असतो. संत-स्त्रियांना याचे भान निश्चित होते.

स्त्री जन्म म्हणवुनी न व्हावे उदास ।
साधुसंती ऐसे मज केले।।

हा जनाबाईंचा अनुभवही साधुसंतांच्या बाबतीतलाच फक्त आहे. इतरेजनांची जाचणी तिलाही सहन करावीच लागली. अशा परिस्थितीत जाचक प्रपंच सोडणे स्त्रियांना सहज शक्य नव्हते. त्यांना प्रपंचात लोटण्याला कारणीभूत होणारी महत्त्वाची व्यक्ती म्हणजे नवरा! नवऱ्यामुळे सासर आणि सासरची मंडळी. पण स्त्रीला प्रपंचात गुंतवून ठेवणारा आणि तिची सर्व स्वाधीनता हिरावून घेणारा, बंदिस्त करणारा म्हणजे नवरा, पती! संत-स्त्रियांना जर मुक्तीची वाट चोखाळायची असेल तर प्रपंचाचा त्याग करणे गरजेचे होते. प्रपंच-मोहात गुंतवून ठेवणाऱ्या देहाला प्रपंचातून सोडवायचे होते आणि प्रपंच तर पतीमुळे निर्माण होतो, म्हणून पतीचा त्याग करणे भाग होते. कारण मानवी पती हा सर्व बंधनात गुंतवणारा! ते मूळबंधच तोडायचे तर पतीचा त्याग केल्याशिवाय गत्यंतर नाही.

सर्व संत-स्त्रियांच्या चरित्रपटाकडे नजर टाकली तर पतीजवळ राहूनही जिने संतांना अभिप्रेत अशा मुक्तिमार्गाची वाट चोखाळली आहे, अशी स्त्री-संत आढळत नाही. या ना त्या कारणाने त्यांच्यापासून पती विभक्त झाले आहेत. मग त्यात वेणाबाई, गोदाबाईसारख्या विधवा आहेत, जनाबाई, मुक्ताबाई किंवा चंद्रावतीसारख्या (बंगाल) अविवाहिता आहेत किंवा विवाह होऊनही वैवाहिक जीवनाचा त्याग केलेल्या मीराबाई (राजस्थान), अक्कमहादेवी (कर्नाटक), लल्लेश्वरी (काश्मीर) किंवा महाराष्ट्रातल्या नागी, विठाई अशा संत-स्त्रिया आहेत. संत बहिणाबाईंनी दीर्घकाळ पतीसमवेत राहण्याचा प्रयत्न केला. पण अखेरच्या काळात त्यांनीही त्याच्यातून पूर्णपणे मन काढून घेतले. यावरून संत म्हणून प्रसिद्धीस आलेल्या स्त्रिया अगदी वास्तव पातळीवरही पतीपासून विभक्त असलेल्या स्त्रिया आहेत. दुसरीकडे या सर्वांनी परमेश्वराशी मात्र जे नाते जोडले आहे, ते प्रियकराचे किंवा पतीचे नाते आहे. जी स्त्री लौकिक पतीचा त्याग करते आणि अन्य कोणा पुरुषाची अपेक्षा करते तिला समाज चारित्र्यहीन समजतो. लोकलज्जा आणि लोकमर्यादा उल्लंघन करणारी स्वैरिणी समजतो. स्वैरिणीचा दर्जा समाजाच्या दृष्टीने अत्यंत हीन अशा वेश्येचा समजला जातो.

आश्चर्य म्हणजे सर्व स्त्रियांनी उघडच स्वतःला 'स्वैरिणी' म्हणवून घेतले आहे. लोकांनी त्यांना समाजातून उठवण्याची वार्ता करण्याआधीच त्यांनी लोकमर्यादेची सगळी बंधने झुगारून दिली आहेत. आपल्या 'निर्लज्जपणाची' द्वाही मुक्तपणे मिरवली आहे.

स्त्रीदेह ज्या विवाहसंस्थेमुळे, पतीमुळे आणि सासरघरामुळे परावलंबी, बंदिस्त होतो, त्यातून मुक्त झाल्यामुळे येणारे सर्व आरोप लोकांनी करण्याआधी त्यांचा स्वीकार स्वतःहून केला आहे.

लग्नाचा नवरा सोडून दिला. कारण तो मुक्तीच्या आड येतो. याचा अर्थ दुसऱ्या कुठल्या पुरुषाचीच अभिलाषा नाही, असे नव्हे. पुरुष तर हवा आहे, पण तो बंधनात टाकणारा नको. असा पुरुष कोण? संतांच्या दृष्टीने असा उदार अन् श्रेष्ठ (परम) पुरुष म्हणजे परमेश्वर! लग्नाचा स्व-पुरुष सोडून 'पर(म)' पुरुष मात्र हवासा वाटतो. नव्हे, त्याच्या प्राप्तीसाठी वाटेल ते दिव्य करण्याची त्यांची तयारी आहे.

लग्नाचा मानवी नवरा का नको? आणि परमेश्वरच (अक्कमहादेवींचा चेन्न मल्लिकार्जुन) पुरुष म्हणून का हवा? याचे उत्तर अक्कमहादेवींनी स्पष्ट शब्दांत दिले आहे,

पती माझा तो माझा स्वामी ।
चेन्न मल्लिकार्जुन तो सुंदर ।।
मरण-क्षय ज्या पती ते सारे
फेका अग्नीमध्येच सत्वर ।।

मानवी पती हे सगळे देहभावाच्या मर्यादेत ग्रस्त झालेले. त्या देहभावापलीकडे अविनाशी, नित्य सुंदर तत्त्वाशी नाते जोडताना मरण-क्षयादी भौतिकात बद्ध अशा मर्यादित जगातल्या पतीचा त्याग केल्याशिवाय गत्यंतर नाही. अशा पतीला अग्नीत फेकणे हाच उत्तम उपाय! याचा पारमार्थिक अर्थ 'कामभावना' मुळातच नष्ट करणे, असाही होईल.

प्रपंचात राहणाऱ्यांना ही भाषा किती जहाल वाटेल याची पर्वा अक्कमहादेवी करीत नाही. स्त्रीच्या चारित्र्यावरचे आक्षेप धुवून काढण्यासाठी स्त्रीला अग्नीतून तावून-सुलाखून काढायला लावणारा हा समाज अक्कमहादेवीच्या या भाषेने किती हादरला

असेल!

पण एकटी अक्कमहादेवीच का? सर्वच संत-स्त्रियांनी पर(म) पुरुषाशी नाते जोडण्याची आणि त्यासाठी रूढ प्रपंच सोडण्याची उघड द्वाही फिरवली आहे.

मेरे तो गिरिधर गोपाल दूसरो न कोई ।
तात मात सुत न भ्रात मेरो पती सोई ।।

म्हणणाऱ्या मीराबाई पुढेही सांगतात की, ''कुल की लाज खोई दई।'' मी कुलमर्यादा सोडलेली आहे. ''संतनसंग बैठी बैठी लोकलाज खोई।।'' संतांच्या सहवासात राहून राहून सगळी लोकमर्यादा मी धुळीला मिळवली, हे सगळे मला कबूलच आहे. मी काहीच अमान्य करीत नाही. आता काय व्हायचे असेल, ते होवो.

अब तो बात फैल गई।
होनी हो सो होई ।।

अशी लोकमर्यादेविषयीची प्रचंड बेपर्वाई मीरेत दिसते.

राजघराण्यात जन्माला आलेली एक मुलगी! तीही मध्ययुगातल्या राजस्थानसारख्या कडव्या रजपूत प्रदेशात! राजघराण्यातच तिचा विवाह झाला अन् अशा तरुण, स्वरूपसुंदर मुलीने पती, प्रपंच नाकारावा? उच्च घराण्याच्या दृष्टीने फाटक्या वाटणाऱ्या रस्त्यावरच्या साधू-गोसाव्यांच्यात बरोबरीच्या नात्याने मिळून-मिसळून वागावे? हे कोणाला आवडणार होते? मीराबाईवर कुलबुडवी, कुलनाशिनी, निर्लज्ज, कुलटा म्हणून शिव्यांचा वर्षाव झाला असेल तर काय आश्चर्य! इतकेच नाही तर कधी विषारी सर्प तिच्या अंगावर सोडून तर कधी साक्षात विषाचा प्याला हाती देऊन अशा 'व्यभिचारिणी'ला कायमची संपवण्याचा प्रयत्न केला गेला नसता तर नवल! काय काय भोगायला लागले असेल त्या मीरेला ते तिची तीच जाणे! जनापवादाचे विषारी बाण तर ती झेलतच होती. अखेर विषाच्या पेल्याने तिला तिच्या पर(म) पुरुषापाशी शांती दिली असेल. पण राजभय किंवा जननिंदेचे भय या सर्वांपासून ती आधीच मुक्त झालेली होती. देहाची सुरक्षितता आणि त्यासाठी पाळावी लागणारी जनमर्यादा तिने कधीच कस्पटासमान मानली होती. ती जीवन्मुक्तच होती. म्हणूनच ती निर्भयपणे उच्चरवाने गर्जत राहिली, ''होय! मी रतले परपुरुषाशी'' मी परपुरुषाशी नाते जोडले आहेच.

संत जनाबाईंना संतांनी आधार दिला असला, तरी जनसामान्यांनी त्यांच्या चारित्र्यावर आक्षेप घेतले असणार. म्हणून तर अखेर त्यांना निर्धाराने सांगावे लागले, ''होय! आहे मी निर्लज्ज! डोईचा पदर खांद्यावर येणे हे जर बाजारबसवीचे लक्षण असेल तर मी तशीच आहे. नव्हे मी पंढरीच्या वाटेवर बाजारच मांडून बसले आहे, उघडे पाल थाटले आहे, आता माझ्या विरोधात काय शंखध्वनी करायचा असेल तो खुशाल करा. देवा, मी खरेच वेसवा (वेश्या) झालेय अन् वेश्या ही घरघुशी (घररिघी) असेल तर मी तुझेच घर फोडायला बसले आहे. तुझीच घररिघी झाले आहे. तुझ्याशीच अनैतिक संबंध जोडायला बसले आहे. आता लोकांना काय करायचे असेल ते करू दे.''

''डोईचा पदर आला खांद्यावरी
भरल्या बाजारी जाईन मी।।
हाती घेईन टाळ, खांद्यावरी वीणा,
आता मज मना कोण करी?
पंढरीच्या वाटे मांडियले पाल,
मनगटावर तेल घाला तुम्ही।
जनी म्हणे देवा, मी झाले वेसवा
रिघाले केशवा, घर तुझे ।।

असे म्हणणारी जनाबाईही मीराबाईचीच सखी! मुक्तिमार्गावर जाऊन पोहोचलेली परमभक्त!

स्त्रियेचे शरीर पराधीन देह,
न चले उपाय विरक्तीचा।।

म्हणून प्रारंभी विकल अन् व्यथित होणाऱ्या, जबरदस्तीने प्रौढ पतीच्या बरोबर प्रपंचात गुरफटून राहावे लागल्याची खंत असलेल्या तुकाराम-शिष्या बहिणाबाईला खरे तर प्रपंच, घर-दार पर्वतासारखे अडथळे वाटत होते.

विरक्तीचे मूळ, प्रपंचाचा त्याग ।
पाहताचि एक गृह शैल ।।

ही तिची व्यथा होती. 'स्त्री ही पुरुषाच्या परमार्थमार्गातील धोंड', म्हणून पुनःपुन्हा तिचे वर्णन केले जाते. पण एखाद्या विरक्त वृत्तीच्या स्त्रीला घर-प्रपंच आणि पती हेच मोक्षमार्गातले अडसर वाटत असतील, असा विचार तरी कधी कोणाच्या मनात आला असेल का? उलट अशा प्रवृत्तीची जर एखादी स्त्री असेल, तर 'उठवळ' म्हणून ती दोघांचीच फक्त धनीण व्हायची. पण बहिणाबाईने अखेर आपली खंत बोलून दाखवली.

दुसरीकडे पती स्वतःला वेदज्ञ ब्राह्मण म्हणवणारा! तो उलट स्त्रियांचे दोष सांगत राहिला आणि तिच्या मनात साशंकता, न्यूनगंड निर्माण करीत राहिला. पिढ्यान्‌पिढ्यांच्या रूढ धर्ममार्तंडांनी तेच केले आहे.

वेद हाका देती, पुराणे गर्जती,
स्त्रियेच्या संगती हित नोहे ।
मी तो सहज, स्त्रियेचाचि देह,
परमार्थाची सोय आता कैची?

म्हणून पुन्हा हतबुद्ध होऊन 'पती हाच परमेश्वर' या रूढ चाकोरीत ती फिरत राहिली.

भ्रताराची सेवा । तोची आम्हा देव ।
भ्रतार स्वयमेव परब्रह्म ।।

परंतु बाहेरून दडपून ठेवलेली आत्म्याची मुक्तीसाठी चाललेली धडपड त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. परमार्थाच्या गुरूची ओढ लागली होती. तुकोबारायांची कीर्ती ऐकून 'हाच आपला गुरू' याची खूणगाठ तिच्या मनाने घातली. एकदा स्वप्नात आणि नंतर लवकरच प्रत्यक्ष तुकोबारायांची भेट झाली आणि त्यांच्या मनातली सगळी खळबळ शांत झाली. साशंकता





अनुक्रमणिका

नाहीशी झाली.

घट हा बुडावा जसा डोहाआत ।
न फुटता ओतप्रोत पाणी ।
बहिणी म्हणे तैसे झाले माझ्या मना,
तुकाराम खुणा ओळखी त्या।।

या शब्दात त्यांनी आपला मुक्ततेचा अनुभव व्यक्त केला आहे. या 'दिव्य' अनुभवानंतर मात्र बहिणाबाई सर्वार्थाने मानवी पतीपासून मनाने मुक्त झालेल्या दिसतात. दीर्घकाळ 'हे बरोबर की ते बरोबर' या प्रश्नाने हेलावणारी त्यांची बुद्धी आता स्थिर आणि निश्चिंत झाली. आता त्यांनीही पारंपरिक पत्नीधर्माच्या मर्यादा झुगारून दिल्या. आता तिनेही 'सौरीची', स्वैरिणीची द्वाही फिरवली. त्यांचे द्वंद्व संपले. 'स्वैरिणी' झाल्याखेरीच त्या पर(म) पुरुषाची प्राप्ती होणार नाही, हे महासत्य त्यांनी जाणले. त्या आता हाती डौर घेऊन जगाला सांगत सुटल्या, 'मी स्वैरिणी झाले।' मी मुक्त झाले.

सोडूनी लाज झाले निर्लज्ज, डौर घेत हाती।
प्रेमभरे नाचत पुढती अविद्या करूनी परती।।
अविद्यानिधी सारूनी सिद्ध झाले निःसंग सौरी ।
स्वरूपाचे जन्मस्थान, दावी घरोघरी ।।
विधिनिषेध कैसा, आम्हां सौरीयांची जाती।
बहिणी भावे, घेऊनी डौर उर्ध्वमुखे गाती ।।५।।

'पती हा परमेश्वर' या विचारापासून मुक्त होऊन 'मी स्वैरिणी झाले, निर्लज्ज झाले' ही द्वाही स्वमुखाने सांगण्यापर्यंतचा संत बहिणाबाईंच्या मनाचा हा प्रवास दीर्घ, कष्टाचा, ओढाताणीचा परंतु अंतिम परमश्रेयाचा प्रवास आहे. स्त्री-देह हा कितीही मोठा अडसर असला तरी वैराग्याची ऊर्मी आणि निश्चयाचे बळ बळकट असेल तर स्त्री किती मोठ्या संतपदाला पोहोचू शकते, याचे उत्तर म्हणजे संत बहिणाबाईंची चरित्रानुभवगाथा आहे. त्यांचा हा सगळा अंतर्बाह्य संघर्ष संत तुकोबारायांच्या संघर्षाशी खूप जवळचे नाते सांगतो. म्हणून तर संत तुकोबारायांनाच गुरू करावा, अशी ओढ तिला लागली नसेल ना! आणि प्रपंचाचा अडथळा उभा करणाऱ्या स्त्री-पुत्रादिकांना 'रांडा-पोरे' म्हणणारे तुकोबारायही 'त्याचिये जातीच्या' वैराग्य मार्गावरच्या स्त्रिया भेटल्यावर स्त्री-पुरुष ही जाती विसरून एकच भगवत्भक्ताची जाती जाणत नसतील ना, असेही वाटते.

एकूण संत बहिणाबाईंनीही अखेर 'स्वैरिणी' झाल्याची गर्जना केली हे खरे!

संत कान्होपात्रांनी तर देवाला पती म्हणून प्रथमपासून निवडले असल्याने मानवी पुरुषांचा संपर्क हाच तिला अनाचार वाटतो. त्या देहमीलनाच्या भाषेतच म्हणतात,

तुझे म्हणविता । दुजे अंगसंग ।
उणेपणा सांग कोणाकडे ?

संत चोखोबारायांची बहीण निर्मळाही प्रपंचाला विटली.

बहु मज उबग आला असे देवा,
नाही मज आशा आणिक कोणाची।

अशा वेळी माणूस मदत काय करणार? मला देहातीत शुद्ध आत्मतत्त्वाची ओढ लागली आहे.

पंचमहाभूते ही अवघा त्यांचा खेळ,
आत्मा तो निर्मळ शुद्ध आहे।।

अशा देहातीत अनुभवाकडे जाण्यासाठी सर्व संतांनी 'स्वैरिणी' होणे खुशीने स्वीकारले आहे.

परमेश्वराला पती, प्रियकर, परपुरुष म्हणवून घेणे संत-स्त्रियांना भूषणाचे वाटते. त्याचप्रमाणे गुरूचीही महती वाटते. गुरूही ईश्वररूपच। त्याच्या संगतीमुळे जरी जनापवाद आले तरी त्याची पर्वा संत-स्त्रिया करीत नाहीत.

रामदासी संप्रदायातील अंबाबाई स्वतःला 'सद्‌गुरुची सौरी' म्हणवून घेणे गौरवाचे समजतात.

मी सद्‌गुरुघरची सौरी, शोभत्ये बरी ।

किंवा आणखी एके ठिकाणी त्या स्पष्टच म्हणतात,

रामदासाश्रय म्या केला।
अंबि न विसरे गुरुपदाला ।।

रामदासांच्या अनुग्रहित अशा स्त्रियांना अन् स्वतः रामदासांना समकालिनांचे अपवाद सहन करावे लागलेच. तरुण विधवा वेणाबाईंबावत हे प्रारंभी झालेच होते. पण वेणाबाईला जननिंदेची पर्वा नाही.

आमुच्या वाटे नका जाऊ ।
नये ते वाटे तुम्हां लाऊ ।।
आम्ही पारिखे पारिखे ।
न हो लौकिकासारिखे ।।

म्हणून एके ठिकाणी अध्यात्ममार्गीयांचे वेगळेपण सांगण्याचा वेणाबाईंनी प्रयत्न केला आहे. गुरुसंगतीमुळे

कोणी निंदिती, कोणी वंदिती
वास मी त्यांची पाही ना ।
हृदयाशी धरिले गुरुचरण
प्राणांतीही विसंबेना ।।

म्हणून एके ठिकाणी आपला दृढनिश्चय वेणाबाई व्यक्त करतात. अगदी एकोणिसाव्या शतकातील बालविधवा गोदामाई यांनाही परमार्थाची वाट चोखाळताना 'स्त्री देहाची बुंथी' हा मोठा अडसर ठरला होता. त्यातून गुरूने, गुरुभक्तीनेच त्यांना मुक्त केले होते. गोदामाई आपला अनुभव सांगताना म्हणतात,

पडिले स्त्री देहाचे बुंथी ।
स्वतंत्र फिरता न ये जगती ।।
त्याचे नि ते कृपामूर्ती
दर्शन होती तै सरे ।।

येथे गोदामाईंनी योजलेला 'बुंथी' हा शब्द फार महत्त्वाचा आहे. 'बुंथी' म्हणजे आवरण. आत्मतत्त्वाला सगुण होताना व्यक्त देहाचे आवरण घ्यावे लागते. हा व्यक्त देह एक नराचा (पुरुषाचा) तरी असेल किंवा मादीचा (स्त्रीचा) तरी असेल.

माझ्या बाबतीत हे स्त्री-देहाचे आवरण असल्याने स्वातंत्र्यात फार मोठा अडथळा आला आहे. परंतु गुरुभेटीनंतर हा अडथळाही दूर झाला. 'आवरणाचे' बंधन नाहीसे झाले. व्यक्त देह नराचा की मादीचा? स्त्रीचा की पुरुषाचा? हा प्रश्नच उरला नाही. अंतिमतः सर्व एकच आहे. अद्वैतच आहे, असा अनुभव आला. गुरुभेटीनंतरच्या आणि गुरुकृपेनंतरच्या (रामचंद्र महाराजांच्या तिकोटीकर भेटीनंतरच्या) या अवस्थेचे वर्णन त्या करतात,

यापरी स्वरूप न्याहाळीता। गोदा पावली
तटस्थता।।
सुसमाधी भोगता।। देहावस्थित झाली।।१।।
राहिले स्त्री-पुरुष भान। राहिले ज्ञातिकुलवर्ण।
एक परब्रह निर्वाण। सच्चिदानंद कोंदले।।२।।

अशा देहातीत अनुभवानंतर त्या पर(म)पुरुषाचे सुख भोगण्यासाठी ती आपोआपच निःसंग झाली. त्या अनुभवाचे वर्णन त्या रतिसुखभोगाच्या परिभाषेतच करतात.

झाले निःसंग निःसंगभोग भोगाया हो।
परात्पर पुरुषाशी रत झाले, अर्पुनिया काया हो।।
सांडिली लाज सारा लौकिक हो।
परात्पर पुरुषाशी निजसदनी दिधला थारा हो।।
तयाविण न गमे लव पळहि जाता वाया हो।।१०।।

हा रतीच्या अनुभवसुखाचा मार्ग नरदेहावाचून येत नाही, म्हणून नरजन्मही महत्त्वाचा ठरतो. म्हणून हे सुख घेताना कितीही जनापवाद सहन करावे लागले तरी त्याची पर्वा नाही. त्याला - पर-पुरुषाला - घातलेली मिठी मी काही झाले तरी सोडणार नाही. रात्रंदिवस त्या परात्पर पुरुषाच्या उपभोगसुखात रत राहण्यात, त्याला काया अर्पण करण्यात आपल्या जीवनाची सार्थकता आहे, असे गोदामाईला वाटते.

एकीकडे देहाचे भोग हे बंधक आहेत, मुक्तिमार्गातले अडसर आहेत हे सांगत असतानाच देहातीत परब्रह्मप्राप्तीच्या सुखाचा अनुभव देहाच्या रतिभोग अनुभवाच्या भाषेतच सगळे संत सांगत आले आहेत. संत मीरेची तर उत्कट विरहाची अनेक पदे आहेत.

मैं तो प्रेम दिवानी मेरा दरद न जाने कोय?

अशी तिची गोड तक्रार असते. अगदी ज्ञानदेवही जेव्हा ज्ञानी ज्ञानदेवाच्या भूमिकेतून उत्कट भक्त ज्ञानदेवांच्या भूमिकेत येतात आणि ईश्वरविरहाचे वर्णन करतात, तेव्हा हीच रतिभोगाची परिभाषा वापरतात.

चंदनाची चोळी, माझे सर्व अंग जाळी।

या शब्दांत सांगतात. किंवहुना संतांच्या 'विराणी' (विरहिणी) रचना या ईश्वरविषयक उत्कट ओढीतून, रतिभावातून केलेल्या वर्णनांची सुंदर उदाहरणे आहेत.

येथे आणखी एक मजेशीर बाब आहे. पुरुष-संतांनी स्वतःकडे स्त्री-भूमिका घेऊन परमेश्वर ओढीविषयी व्यक्त केलेले उत्कट भाव आहेत. येथे मधुराभक्तीची उत्कट छाप आहे. परंतु महाराष्ट्रात बंगालसारखा मधुराभक्तीचा थेट प्रवाह नाही.

एक मात्र दिसते, प्रपंच हा परमार्थमार्गातला अडथळा आहे, हे सांगताना अगदी पुरुष-संतांनीही प्रपंच हा सासर किंवा नवरा या प्रतीकात पाहिला आहे आणि हा नवरा सोडून निःसंग झाल्याशिवाय त्या पर(म)पुरुषाची, परमेश्वराची प्राप्ती होणार नाही, हे पुनःपुन्हा सांगितले आहे. हा मानवी नवरा अन् सासर, अनुषंगाने सासरची सर्व माणसे सोडायला हवीत. त्यासाठी निःसंग व्हायलाच हवे. निर्लज्ज म्हणवून घ्यायला भ्यायचे कारण नाही. कारण बोलून चालून ते 'सौरी' (स्वैरी-स्वैरिणी) होणे आहे. 'स्वैरिणी' म्हणून घेणे पुरुष-संतांनाही हवे आहे. नव्हे, त्याखेरीज त्यांच्या मनातली ईश्वरविषयक ओढ पुरतेपणाने, नेमकेपणाने व्यक्त झाली आहे असे पुरुष संतांनासुद्धा वाटत नाही.

सर्व संतांनी आपले मनोभाव व्यक्त करण्यासाठी या ना त्या प्रकारे रूपकात्मक काव्यरचना केल्या आहेत आणि त्यात प्रत्येकाची हमखास एक तरी रचना 'सौरी' या शीर्षकाची आहे. प्रस्तुत स्त्री-संत हा प्रतिपादनाचा मुख्य विषय असल्याने पुरुष-संतांच्या 'सौरीविषयक' रूपक रचनांची जास्त उदाहरणे देण्यास अवकाश नाही आणि त्याची गरजही नाही. परंतु शितावरून भाताची परीक्षा व्हावी, या न्यायाने नमुना म्हणून काही उदाहरणे देत आहे. तुकाराम महाराज सर्वांत परखड अन् स्पष्टवक्ता म्हणून प्रसिद्ध आहेत. आडवाटांनी जाणे आणि आडवाटांनी बोलणे त्यांना फारसे माहीत नाही. तरीही ते याच परिभाषेत बोलतात. परमेश्वर हा परपुरुष! त्याचे सहवाससुख हे सर्वांत उत्कट सुख. परंतु स्वगृहाचा आणि स्व-पतीचा त्याग करून त्या परपुरुषाचे सुख भोगण्यासाठी नुसती इच्छा असून चालत नाही, हिंमतही असावी लागते. जनमर्यादा झुगारून देण्याचे अलौकिक धाडस असावे लागते. प्रसंगी मस्तक उतरवून देण्याची वेळ आली तरी ते सहन करण्याची तयारी असावी लागते. प्रपंचातली वेदना एकपट असेल तर परमेश्वराकडे जाताना दसपट वेदना सहन करावी लागते. अर्थात हे एक दिव्यच असते. हा भाव व्यक्त करताना तुकाराम महाराज म्हणतात,

परपुरुषाचे सुख भोगे तरी,
उतरोनि करी घ्यावे शीस।।

परंतु परपुरुषाचे सुख हे परमसुख आहे आणि कितीही किंमत द्यावी लागली तरी ते भोगावेच, यावद्दल तुकारामांचा आग्रह आहे.

ज्ञानदेवांच्या विराणी रचनांचा उल्लेख यापूर्वी केला आहेच. ज्ञानदेवही स्वतःकडे परपुरुषाकडे जाणाऱ्या व्यभिचारिणी, परद्वारिणी (घरिघी) नारींचीच भूमिका घेतात. त्याखेरीज ईश्वरभेटीची उत्कटता नेमकेपणाने व्यक्त झाली आहे असे त्यांना वाटत नाही.

पतिव्रता मी परद्वारिणी हो।

परपुरुषेसी व्यभिचारिणी हो ।।

रूपकात्मक भारूड रचना हे खास संत एकनाथांचे क्षेत्र! नाथांनी लोकगीतसरणीच्या भारूड रचनांतून लोकशैलीत नर्मविनोदाचा, उपहास-उपरोधाचा अन् विडंबनाचा आश्रय घेत घेत पुन्हा व्यभिचारिणी होणाऱ्या उत्कट भक्ताचीच भूमिका मांडली आहे.

दारिद्र्याने गांजलेली पोराबाळांच्या उपाशीतापाशी लेंढाराने कावलेली, बेपर्वा नवऱ्याच्या जाचाला उबगलेली स्त्री हे ग्रामीण भारतातले सर्वसामान्य चित्र आजही आहे. नाथांच्या काळात तर ते अधिक प्रमाणात असणार. अशा वेळी त्या दरिद्री संसाराचे वर्णन करीत त्या स्त्रीशी सहानुभाव साधीत या सगळ्यातून सुटण्याचा मार्ग ते पटकन सांगून टाकतात,

नवरा नको गं बाई ।
मला दादला नको गं बाई ।

लौकिक वास्तव जीवनातील अनुभवातून अलौकिकाकडे जाण्याचा मार्ग सांगताना जणू ते गांजलेल्या स्त्रीच्या अंतर्मनाचाच वेध घेतात. प्रपंचात दारिद्र्याने गांजलेल्या स्त्रीलाही कदाचित वाटत असेल की या सगळ्या जाचणुकीच्या अनर्थाचे मूळ म्हणजे नवरा. म्हणून

नवरा नको गं बाई...

मग द्व्यर्थी रचनेत 'नवरा नको' असण्याची जी कारणमालिका दिली जाते, ती लौकिक प्रपंचातल्या दुःखाची अन् वेदनेची नित्य अनुभूतीच असते.

लौकिक अन् अलौकिकाच्या क्षेत्रात सारख्याच समर्थपणे फिरत ठेवणारा नाथ महाराजांच्या रचनेतील आशय अन् अभिव्यक्ती केवळ अ-पूर्व आहे.

आणि मग त्या नवऱ्याबरोबर सगळे सासरही नकोसे होते. नाथांचा 'रोडगा' त्या दृष्टीने लक्षणीय आहे.

सत्वर पाव गे मला भवानीआई,
रोडगा वाहीन तुला ।।

या मुखड्याने रचनेचा नाट्यपूर्ण प्रारंभ होतो. मग सासरच्या एकेका व्यक्तीचा समाचार घेतला जातो. 'हे भवानी आई, माझा सासरा गावी गेला आहे. तिकडेच त्याला खपव, जाच करणाऱ्या सासूला लवकर निर्दाळून टाक, फडफड बोलणाऱ्या जावेला बोडकी कर (विधवा कर), नणंदेचं कारटं सारखं किरकिरत असतं, त्याला एकदाची खरूज येऊ दे... एकूण काय तर छळवादी सासरच्या सगळ्यांचा काटा काढ एकदाचा ! आणि या सगळ्या अनर्थांचं मूळ म्हणजे नवरा. हा नवराच केला नसता तर सासरची नाती कशी जुळली असती? म्हणून नवरा हे सगळ्या जाचाच्या अनर्थाचं मूळ. त्याला सगळ्यात मोठी शिक्षा मात्र मीच देईन.'

दादला मारून आहुती देईन,
मोकळी कर गं मला ।।
एका जनार्दनी सगळेच जाऊ दे,
एकटीच राहू दे मला ।।

दादल्याला मात्र जाळूनच नष्ट करायला हवा. देहभोगाच्या मोहाचे समूळ उच्चाटन दादला-नवरा नष्ट करण्याच्या प्रतीकातून संत एकनाथांनाही व्यक्त करावेसे वाटते हे महत्वाचे.

यापूर्वी अक्कमहादेवींनीही नवरा जाळून टाकण्याचीच परिभाषा वापरली होती, त्याचे येथे स्मरण होते.

प्रपंचातून मुक्ती मिळवणे हे सर्वच संतांचे ध्येय होते. त्यासाठी प्रपंच-मोहातून मोकळे होणे, निःसंग होणे, फकिरी स्वीकारणे आणि लौकिक भयातून मुक्त होणे, निर्द्वंद्व होणे हे उद्दिष्ट होते. स्त्रियांचेही तेच उद्दिष्ट होते.

परंतु लौकिक-भौतिक जीवनातले अडथळे आणि ओढाळ इंद्रियमोह जबरे बंधक आहेत याचे भान त्यांना होते. या जबऱ्या इंद्रियमोहासाठी पुरुष-संतांनीही 'नवरा' हेच प्रतीक मानून स्वतःकडे स्वैरिणीची भूमिका का घ्यावी? पुरुष-संतांनाही अशीच प्रतीके का वापरावीशी वाटली? तीही अगदी उत्कट आंतरिक ऊर्मीने! सर्वांनीच ही परिभाषा वापरली असल्याने त्यांची सार्वत्रिकताही आहे, असे आढळते. या सर्व बाबी केवळ काव्यातील प्रतिमा म्हणून सोडून देण्याजोग्या नाहीत. उलट त्यांचा गंभीरपणे विचार व्हावा. विश्लेषण व्हावे.

लौकिक जीवनात विवाहसंस्थेने आणि नवऱ्याने स्त्रीच्या पायात सगळ्यात भक्कम बेडी अडकवली आहे, हे वास्तव सत्यच त्यातून व्यक्त होते. ती बेडी तोडणे म्हणजे स्वैरिणीचा शिक्का मारून घेण्याचे धाडस करणे होय अन् प्रपंचातून मुक्ती हवी असेल तर स्वैरिणी होण्याची तयारी ठेवायला हवी, हेच संत सांगतात.

विश्वातील द्वंद्व परमार्थक्षेत्रात मांडण्याची विशिष्ट परिभाषा आहे. त्यातील 'पुरुष' आणि 'प्रकृतीची' परिभाषा सर्वज्ञात अशी परिभाषा आहे. अव्यक्त चैतन्यतत्त्व किंवा आत्मतत्त्व म्हणजे पुरुष आणि पंचमहाभूतांनी सिद्ध झालेली व्यक्त सृष्टी म्हणजे 'प्रकृती' होय.

मानवी नर-नारी म्हणजे अनुक्रमे पुरुष व प्रकृती आहेत, ही भूमिका तत्त्वज्ञानाची भूमिका नाही. मानवी नर म्हणजे पुरुष व मादी अथवा नारी म्हणजे प्रकृती हे म्हणणे म्हणजे पारमार्थिक संकल्पनांविषयीचे अज्ञान आहे. पंचमहाभूतघटित नाशवंत व व्यक्त अशी सर्व सृष्टी म्हणजे 'प्रकृती' असल्याने सर्व देह प्रकृतीच होय. मग तो नरदेह असो की नारी (मादी) देह असो आणि त्या पलीकडचे अविनाशी चैतन्य तत्त्व म्हणजे पुरुष, अशी भूमिका असल्याने आणि ते पुरुष-संतही देहधारी असल्याने 'प्रकृती' होत. या प्रकृतीला परम पुरुषाची, चैतन्याची ओढ असल्याने प्रकृतिजनित सर्व बंधने, सर्व प्रपंच सोडल्याखेरीज गत्यंतर नाही.

प्रकृतीचे मोहबंधन मोठे वळकट आणि चिवट असते. त्यासाठी त्यांनी सासर, नवरा, प्रपंच ह्या प्रतिमा आणि प्रतीके वापरलेली आहेत.

त्यामुळे सामान्य मानवी जीवनात जरी पुरुष-संतांचा



अनुक्रमणिका

पुल्लिंगी उल्लेख व्याकरणिक पातळीवर (जेंडर) आपण करीत असलो, तरी परमार्थ पातळीवर ती प्रकृतीच असल्याने वरवर विसंगती वाटली तरी अंतिमतः ती अंतर्गत सुसंगतीच आहे.

देह नराचा असो वा मादीचा असो; परमार्थाच्या परिभाषेत त्याला 'नरदेह' म्हणूनच संबोधले जाते.

अध्यात्माच्या आणि परमार्थाच्या क्षेत्रातील शब्दांचे हे व्याकरणिक संकेत माहीत नसल्याने अनेकदा मानवी स्त्री-पुरुष म्हणजेच प्रकृति-पुरुष असे समजून विवेचन केले जाते, ते योग्य नव्हे. हे उमजले की, लौकिक भेद आध्यात्मिक पातळीवर संपून जातात. संतांच्या बाबत स्त्री-पुरुष असा भेद अध्यात्ममार्गात शिल्लक राहत नाही. नव्हे, तो तसा मुळातच नसतो अशी संतांची भूमिका असते. लिंगभाव संपतो. व्यावहारिक पातळीवर मात्र स्त्री-पुरुष हे द्वंद्व सतत प्रश्नचिन्हे निर्माण करीत राहते.

अध्यात्मक्षेत्रातील मुक्ती मिळवण्यासाठी सर्वांनाच भौतिक सुख, मोह अन् सुरक्षितता झुगारल्याखेरीज अंतिम मुक्तीचा मार्ग खुला होत नाही. ज्ञात-अज्ञात भयापासून मुक्ती मिळत नाही. प्रकृतिमोहातून बाहेर येणे म्हणजे 'नवरा सोडणे' या परिभाषेचा आता उलगडा होईल. एकदा पुरुष-नवरा सोडायचाच म्हटल्यावर मग 'पर-पुरुष' तरी कशाला हवा?

एकतर मानवी पुरुष-पती ही 'प्रकृती'च आहे म्हणून तो 'पूर्ण पुरुष' नव्हे. ही प्रकृती बंधक आहे. उलट पर(म)पुरुष पूर्ण पुरुष आहे. पुरुषत्वाने सर्व सुख देण्यासाठी तो समर्थ आहे आणि लग्नच न झाल्याने इतर नाती अन् प्रपंच यांची कटकट नाही. बंधन नाही. ही मांडणीही पुन्हा दोन पातळ्यांवर अर्थ व्यक्त करते.

विवाहामुळे स्त्रीला सुरक्षितता मिळते, असे एकीकडे विवाहसंस्थेचे समर्थन केले जाते. पण ती सुरक्षितता किती फसवी असते, याचाही अनुभव पदोपदी येत असतो. विवाहित स्त्री आहे म्हणून सीतेला पळवून नेताना रावण कचरला नाही अन् द्रौपदीची विटंबना करताना कौरव कचरले नाहीत. उलट त्यांच्या चारित्र्यावर आक्रमणे झाली ती त्यांच्या नवऱ्यांमुळेच! इतरत्रही नवरे स्त्रीच्या चारित्र्याचे रक्षण करताना कुठे दिसत नाहीत. सीता-द्रौपदीसह प्रत्येकीला अखेर आत्मबळ खर्ची घालूनच स्वतःचे रक्षण करावे लागते. हा अगदी रोकडा अनुभव असताना विवाहामुळे मिळणारी (खरे म्हणजे न मिळणारी) तकलादू सुरक्षितता झुगारून देणेच अधिक श्रेयस्कर!

जी सुरक्षितता मुळातच नाही, ती आहे अशा 'भ्रमातून' वेळीच बाहेर आले तर आत्मबळ तरी जागे राहील. नाहीतर एखाद्या भ्रमात गाफील राहायचे अन् आक्रमण झाल्यावर खंत करायची, असेच घडण्याची शक्यता जास्त!

विवाहसंस्थेतील हा प्रत्यक्षानुभवही 'नवरा नको गं बाई।' च्या सार्वत्रिक प्रतिमेमागे अभावितपणे अंतःस्थ ऊर्मीने उभा राहिला नसेल ना?

अगदी वाच्यार्थानेही स्त्रीचा कोणी रक्षणकर्ता असा पुरुष कधी नसतोच. मग तो रक्षणकर्ता, (पती) नाहीसा झाला तर आपण असुरक्षित होऊ, हे भयही मिथ्याच असते. हे ज्ञान होणे, हे भान येणे माणसाला निर्भय बनवते. पांगुळगाडा आहे म्हटले, की आधार घ्यावासा वाटतो. तो 'नाहीच' म्हटले, की आत्मबळ जागे होते. हाच अनुभव संतांच्या प्रपंच सोडून 'परपुरुषाकडे' जाण्याच्या प्रतीकातून व्यक्त होतो.

परपुरुषाकडे जाणाऱ्या (किंवा खरे तर त्याला आपल्याकडे येऊ देणाऱ्या) स्वैरिणीला, वेश्येला कोणता पुरुष स्वीकारायचा अन् कोणता नाकारायचा, याचे स्वातंत्र्य असतेच. मिळेल तो पुरुष इच्छेविरहित स्वीकारण्याचे बंधन तिच्यावर मुळातच नाही. वेश्याजीवनातील या स्वातंत्र्यभावाच्या आशयाचाही एक सूक्ष्म पदर 'स्वैरिणी' अथवा 'वेसवा' होण्याच्या परिभाषेत अंतर्भूत आहे. पत्नीला ती सवलत नाही. अर्थात स्त्री-संतही याच समाजातल्या आहेत. त्यामुळे बरेचदा 'परपुरुषाशी' त्या विवाहितेचे, पत्नीचे नाते जोडतात. भक्त अन् परमेश्वर यांच्यात कधी स्वकीय (विवाहित) नर-नारी भाव असतो तर कधी परकीय (विवाहबाह्य) नर-नारीभाव दिसतो.

राधाकृष्णाच्या रूपाने भक्तिसंप्रदायाने मध्ययुगात नकळत स्त्री-पुरुष संबंधातील एक परमादर्श निर्माण केला. कोणतेच आदर्श हे वास्तव नसतात. किंबहुना वास्तव जीवनात ज्या ज्या बाबींची सर्वथैव उणीव दिसते, पण ती उणीव नसावीशी वाटते, जाचक वाटते आणि प्रत्यक्षात ती उणीव नाहीशी करणे तर शक्तीबाहेरचे काम असते. त्यामुळे अधिकच कोंडमारा होतो. अशा वेळी ही कोंडी फोडण्याचे काम मग केवळ मानसिक पातळीवर स्वप्नरंजन करून सुरू होते.

प्रत्यक्ष जीवनात गरिबांच्या बाजूने उभे राहून त्यांना न्याय मिळवून देणारे दुर्मीळ असतात. म्हणून मग निदान कथा-कादंबऱ्यांतून अन्यायाविरुद्ध झगडणारा, त्यासाठी सर्वस्व ओतणारा, देवसदृश नायक निर्माण होतो. हा नायक प्रत्यक्षात दिसणे कठीण! तो समूहमनाच्या दडपलेल्या इच्छांची पूर्तता करणारा एक स्वप्नादर्श असतो. जे प्रत्यक्षात घडत नाही, पण घडावे असे वाटते, त्याच्या ध्यासाने मन भरून गेलेले असते, जे सतत मनात वसते, तेच स्वप्नात दिसते, असे मानसशास्त्रज्ञ म्हणतात. जे व्यक्तीच्या बाबतीत घडते, तेच समूहाच्या बाबतीतही घडते, असे सामूहिक मनाचा सिद्धान्त सांगणारे डॉ. कार्ल गुस्ताँव युंग सारखे मानसशास्त्रज्ञ सांगतात. त्यांच्या या सिद्धान्तानुसार अतिप्राचीन काळापासून समूहमन काही आदर्शांची इच्छा करीत असते. ते आदर्श प्रत्यक्ष जीवनात येणे अशक्यप्राय असते तेव्हा त्या स्वप्नांची, त्या अपुऱ्या इच्छांची पूर्ती झाल्याचे अनुभव त्या समूहांच्या मिथकांतून, कथांतून, प्राक्कथांतून व्यक्त होतात.

राधाकृष्णांच्या निमित्ताने स्त्री-पुरुष संबंधातील प्रत्यक्षात दुर्मीळ असलेला मध्ययुगीन समाजजीवनातला एक स्वप्नादर्श (युटोपिया) भक्तिसंप्रदायातील समूहमनाने राधा-कृष्णरूपाने निर्माण केला आणि अन्य कोणत्याही पौराणिक मिथकापेक्षा



अनुक्रमणिका

राधाकृष्णाच्या मिथकाने सर्व काळ समाजाच्या सर्व स्तरांतील स्त्री-पुरुषांच्या मनाचा अक्षरशः शेकडो वर्षे ताबा घेतला आहे.

राधा-कृष्ण भक्तिसंप्रदायाच्या फार विस्तारात जाण्यास अवसर नाही. परंतु प्रस्तुत मराठी स्त्री-संतांनीच नव्हे तर भारतभरच्या स्त्री-पुरुष सर्व संतांनी परममुक्तीसाठी जी स्वैरिणीची प्रतीकात्मक भूमिका घेतली आहे, त्या भूमिकेचा राधा-कृष्ण मिथकाशी असलेला अन्वय अधिक स्पष्ट करणे आवश्यक आहे.

भारतभरच्या सर्व लोककथा, लोकगीतांतून ती 'परकीया नारी' म्हणूनच जनमानसात रुजलेली आहे. राधा-कृष्ण भक्तीच्या निमित्ताने शृंगाराची इतकी मुक्त वर्णने भारतभरच्या सर्व स्तरांतील अन् संस्कृत, प्राकृत आणि आधुनिक भाषांतील कवींनी केली आहेत, की त्याविषयीचा मागोवा हा एक बृहत्शोध प्रकल्प होईल. राधा-कृष्ण भक्तीच्या निमित्ताने रंगवलेल्या उन्मुक्त शृंगारवर्णनातून एक बाब स्पष्ट दिसते, ती म्हणजे येथील जनमानसाचे सर्व स्वप्नरंजन त्यातून व्यक्त झाले आहे.

प्रत्यक्ष जीवनात स्त्री-पुरुष संबंधातील बंधने, त्यातून येणारी कुंठितता या सर्वांचे विरेचन (कॅथर्सिस) जणू राधा-कृष्ण निमित्ताने निर्माण झालेल्या साहित्यातून झाले आहे, असे म्हटले तर अधिक योग्य होईल.

दडपण जितके जास्त किंवा क्रिया जितकी ताकदीची त्याच किंवा त्यापेक्षा अधिक ताकदीची प्रतिक्रिया असते. या सिद्धान्तानुसार भक्तिसंप्रदायातील भक्तरूपातील उन्मुक्त रतिभाव ज्या अर्थी अनेक वाटांनी, अनेक रूपांनी भारतभरच्या शैव-वैष्णव सर्व पंथोपपंथीयांच्या भक्तिसाहित्यातून व्यक्त झाला आहे, त्या अर्थी प्रत्यक्षात जीवनातील स्त्री-पुरुष संबंधातील दडपणांचा अंदाज येऊ शकतो. देहधारी (मानवी) स्त्री-पुरुषांचा कामभाव, शारीर पातळीवरील उपभोगांविषयी एक प्रकारची उपेक्षा, इतकेच नव्हे तर त्याबद्दल अपराधीपणाची भावना हे मध्ययुगीन 'सभ्य' समजल्या जाणाऱ्या स्तरांचे प्रत्यक्षात आदर्श होते. जी बाब अपराधीपणाची बोचणी देते, त्याबद्दल गोपनीयतेची पराकाष्ठा सुरू होते. त्यामुळे आदर्श प्रापंचिक जीवनात स्त्री-पुरुष शरीरसंबंधाबद्दल एक अपराधीपणाची भावना दिसते. त्यातही स्त्रीच्या बाबतीत सर्वाधिक अपराधी भावना आढळते. पुरुषाला कुटुंबात स्वपत्नीशी संबंध ठेवताना जरी दडपणे असली तरी त्याला बाहेरचे मार्ग खुले होते. प्रापंचिक स्त्रीचे जीवन मात्र कुंठेने व्याप्त असे.

धर्मग्रंथांतून स्त्रीची प्रतिमा एकीकडे उदात्त देवता म्हणून आणि दुसरीकडे पुरुषाला मोहात पाडणारी मोहिनी म्हणून केली आहे. तरुण पति-पत्नींचे परस्पर आकर्षण असणे निसर्गतः स्वाभाविक असले तरी पुरुष जर स्त्रीबद्दल अधिक ओढ दाखवू लागला तर पत्नी त्याची 'शक्ती' शोषते असे समज आजही ग्रामीण भागात दिसतात. त्यामुळे पति-पत्नी संबंध यावेत, पण ते केवळ अपत्यधारणेपुरतेच असावेत. त्याखेरीजचे संबंध हे अनैतिक आहेत, या विचारांचा प्रभाव धर्मक्षेत्रातील मंडळींवर तर होताच, पण सामान्य जीवनातही होता. महात्मा गांधी हे आधुनिक जीवनातले या प्रवृत्तीचे प्रातिनिधिक उदाहरण आहे. पण कुटुंबात जरी पुरुषाला स्वकीया नारी (पत्नी) अशी सीमित अर्थानेच उपलब्ध असली तरी त्याला परकीया नारींबाबत आडकाठी नसे. स्वकीया नारीशी त्याचे संबंध केवळ कर्तव्यभावनेने असणे, हा आदर्श असे. अगदी अजूनही एखादी वृद्धा मोठ्या अभिमानाने सांगताना दिसते की, "आजकालच्या नवरा-बायकोसारखे आम्ही रात्र रात्र खोली बंद करून राहत नव्हतो तरी आम्हाला इतकी इतकी मुलं झाली." वगैरे...

म्हणजे एकीकडे बहुप्रसवा स्त्रीचे कौतुक करायचे कारण ती मुले कामाला उपयोगी पडतात. पण ती प्रसूतिअवस्था ज्यामुळे प्राप्त होते त्या स्त्री-पुरुष संबंधाबद्दल मात्र एक सुप्त अपराधीपण स्त्री-पुरुष मनात राहावे, अशी चमत्कारिक कोंडी दीर्घकाळ समाजात नांदत आली आहे. प्रत्यक्षात ती नसावी असे मनातून वाटते. मग त्या संबंधांना उदात्ततेचा मुलामा देऊन ते संबंध भक्तिसाहित्यातून प्रवाहित झालेले दिसतात.

अर्थात पुरुषप्रधान समाजरचनेत स्त्रीचे अस्तित्व लैंगिक स्तरावर असे कुंठित झालेले दिसते. तिचा उपयोग पत्नी म्हणून अन् विवाहबाह्य संबंध म्हणून दोन्ही ठिकाणी करून तर घ्यायचा पण त्यात तिच्याच मनात अपराधाची बोच राहावी, अशी परिस्थिती होती, अजूनही आहे. वेश्येकडे जाणारा पुरुष किंवा 'अंगवस्त्र' बाळगणारा पुरुष ही सर्वसामान्य बाब पेशवाई अखेरपर्यंतच नव्हे, तर अगदी एकोणिसावे शतक संपेपर्यंत उच्चवर्णीयांतही होती. पण त्याच प्रकारचे संबंध ठेवणारी वेश्या स्त्री असल्याने प्रतिष्ठित समाजात बदनाम होती. दुसरीकडे वेश्येने किंवा विवाहबाह्य संबंध ठेवणाऱ्या स्त्रीनेही एकाच पुरुषाशी एकनिष्ठ राहणे, म्हणजेच पतिव्रताधर्माचे पालन करणे गौरवाचे असे. अनेकदा अशा स्त्रियाही असत. अगदी 'शिवलीलामृता'च्या पोथीतसुद्धा श्रीधराने वेश्येच्या पातिव्रत्याचा महिमा सांगितला आहे. महानंदा या परमशिवभक्त वेश्येची परीक्षा शिवाने पाहिली या संदर्भातल्या विवेचनात म्हटले आहे,

वेश्या असूनी पतिव्रता नेमिला जो पुरुष तत्त्वता।
त्याचा दिवस न सरता, इंद्रासही वश्य नव्हे ।।
(अ. ११, ओवी ४६)

अशी स्त्री-पुरुषांबाबत दुहेरी नीती जुन्या काळापासून प्रचलित आहे.

वेश्येबद्दल एकीकडे तुच्छताभाव आहे, तर दुसरीकडे काही महत्त्वाच्या मंगलप्रसंगी तिचे माहात्म्यही आहे. वधू-वरांच्या विवाहोत्तर पहिल्या मीलनरात्रीची शय्या वेश्येने तयार करावी, वधूच्या मंगळसूत्राचे मणी वेश्येने ओवावेत म्हणजे वधूला आजन्म सौभाग्य लाभते, हा समज होता. कारण वेश्या ही 'अखंड सौभाग्यवती' असते. वेश्येला वैधव्य नाही. म्हणून ती

अखंड पतिव्रता! पवित्र! ती 'नित्यसुमंगली' म्हणून पतिव्रतेने तिच्या हातचे सौभाग्यालंकार परिधान करावेत, हा समज होता. देवदासी या शब्दात हे सर्व अनुस्यूत आहे.

म्हणजे वेसवेसंबंधीची समाजाची भूमिका दुहेरी, खरे तर द्विखंड मानसिकता असलेली होती. समाजातील एखाद्या रूढीचा, समजुतीचा उपयोग जुनी व्यवस्था वा मूल्ये उद्ध्वस्त करून नवीन 'मूल्ये' रुजवण्यासाठी मोठ्या चतुराईने करून घेतला जातो. लैंगिक पातळीवर 'मुक्त' असलेल्या देवदासीचाच उपयोग स्त्रीचे लैंगिक स्वातंत्र्य बंदिस्त करणारी पातिव्रत्य संकल्पना दृढ करण्यासाठी केला गेला आहे.

या प्रकारचा विवाहबाह्य संबंध ठेवणाऱ्या स्त्रीला प्रतिष्ठा काही विशिष्ट परिस्थितीतच असे, तिचा दर्जा देवदासीचा असे.

देवदासीप्रथा जगभर अनेक देशांत प्राचीन काळापासून होती. महाराष्ट्रात खंडोबासाठी वाहिलेल्या मुली 'मुरळी' म्हणून तर यल्लम्माला वाहिलेल्या मुली 'जोगतिणी' म्हणून ओळखल्या जातात. आंध्रप्रदेशात त्यांना 'बसवा' म्हणतात.

'यल्लमा'ला वाहिलेल्या मुलींचा तर देवीशीच विवाहविधी होतो. त्यांचा तो दीक्षाविधी असतो. दीक्षाविधीनंतर जोगतिणीने देवीची उपासना करीत जीवन व्यतीत करावे, ही अपेक्षा असते. म्हणजे ती मूलतः 'देवीदासी' असते. प्राचीन मातृप्रधान समाजव्यवस्थेचे अवशेष स्त्री-देवतांच्या रूपाने आजही जिवंत अवशेष (लाइव्ह फॉसिल) म्हणून शिल्लक आहेत. या सर्व स्त्री-देवता 'आई' या उत्तरपद संबोधनाने ओळखल्या जातात. उदाहरणार्थ, यमाई, अंबाबाई, बोलाई इत्यादी. त्या देवतांची ठाणी स्वतंत्र - कोणत्याही पुरुष सहचर देवाशिवाय - आहेत. त्या कोणत्याही पुरुष देवाची पत्नी म्हणून ओळखल्या जात नाहीत. मात्र पुरुष देव त्यांच्या आसपास स्वतंत्र असतात. उत्सवात वगैरे त्यांच्या प्रतीकात्मक भेटी भक्तांच्या उपासनेत घडवल्या जातात. या स्त्री-देवतांची उपासना करण्यासाठी पुरुष भक्तानेही स्त्रीवेश घेणे, प्रतीकात्मक स्त्री होणे आवश्यक असे. काही वेळा तर पुरुष लिंगच्छेदन करूनही, पुरुषत्व नाहीसे करून स्त्री-देवतांचे उपासक होण्याची प्रथा दक्षिण भारतात अन् महाराष्ट्रात होती. केवळ स्त्रीवेश घेऊन प्रतीकात्मक 'स्त्री होणे' हा रिवाज अजूनही क्वचित दिसतो. म्हणजे या सर्व 'देवीदासी' होत. प्रत्यक्ष किंवा परोक्ष 'देवीदासी' होऊन स्त्रीदेवतोपासना करण्याची प्रथा होती. डॉ. रामचंद्र चिंतामण ढेरे यांच्या 'लज्जागौरी' या ग्रंथात या भूमिकेचे विस्तृत विवेचन आहे.

स्त्री-देवतांच्या स्त्रीउपासक या एका परीने स्त्री-देवतेची प्रतिरूपे मानली जात. स्वाभाविकच स्त्री-देवतांचे पुरुष देव सहचर (मेल कॉन्सॉर्ट) जसे त्यांच्या इच्छेनुसार कधीतरी त्यांच्या भेटी घेतात तशाच, या देवीदासीही आपले पुरुष सहचर शोधण्याबाबत आणि त्यांच्या सहवासाबाबत स्व-तंत्र होत्या. त्यांचे हे स्वातंत्र्य जन्मभर त्या जतन करीत. म्हणजे त्या विवाह करीत नसत. मात्र इच्छेनुसार पुरुष सहचराचा सहवास स्वीकारीत. पुरुषप्रधान व्यवस्थेत स्त्री-देवतांनाही गौणत्व येत गेले आणि त्यांच्या उपासकांनाही गौणत्व येत गेले. उपासनेच्या प्रथा त्या त्या समाजात श्रद्धा म्हणून शिल्लक राहिल्या. प्रत्यक्षात मात्र त्यांचे 'देवी-दासी'पण संपून त्या 'देव-दासी' झाल्या. हे देव 'भू-देव' होत. मुळात भू-स्वामिनी, भू-देवी असलेल्या स्त्रियांची भूमीवरची सत्ता संपली अन् त्या नामधारी भू-देवी राहिल्या. भूमीवरची सत्ता पुरुषप्रधान झाली अन् म्हणून देवी-दासींवरही भू-देवांची सत्ता आली. त्यांचे स्वातंत्र्य संपले. प्रतिष्ठा संपली. नववधूचे मंगळसूत्र ओवणे किंवा शय्या करणे अशा एखाद्या रूढीतून त्यांच्या भूतकालीन स्व-तंत्र प्रतिष्ठेचे अवशेषही काही काळ रेंगाळले अन् पुढे तेही नाहीसे झाले. स्त्रीची निसर्गदत्त मातृत्वशक्ती निर्बंधित झाली. सामाजिक नीतिनियमांनी बद्ध होत गेली तरी भूतकाळाचे अवशेष कुठेतरी रेंगाळत राहतातच.

पुरुषाने घेतलेला स्त्रीवेश 'राधावेश' म्हणून ओळखला जातो. एरवी पुरुषाने स्त्रीवेश घेणे पुरुषप्रधान व्यवस्थेत अप्रतिष्ठेचे लक्षण ठरते. पण आजही कोकणात शिमग्याच्या ४-५ दिवसांत 'राधावेश' घेऊन नाचण्यात पुरुषांना अप्रतिष्ठा वाटत नाही.

राधा म्हणजे स्त्रीचा वेश। देऊनिया पुरुषास।

तयाकडुनीया नृत्यास करवुनी वाद्यास वाजविणे ।। शाहमुनी

'राधावेश' हे स्त्री-देवतेच्या उपासनेसाठी धारण केलेले मुळातले स्त्रीरूपाचे अवशेष आहेत. स्त्रीप्रधान तांत्रिक उपासनेत तर स्त्रीवेश अपरिहार्य ठरतो. 'वामा भूत्वा यजेत् परम्।।' ही मान्यता आहे. 'वामा' म्हणजे स्त्री. स्त्रीप्रधान उपासनेचे आचार म्हणजे 'वामाचार'. पुरुष-वर्चस्व काळात मूलार्थ बाधित झाला आणि कोणत्याही अप्रतिष्ठित आचारासाठी म्हणून 'वामाचार' हा शब्द रूढ झाला. जगभरचे प्राचीन स्त्रीचे आपला जोडीदार शोधण्याचे स्वातंत्र्य अप्रतिष्ठित होत गेले आणि मूळची 'देवीदासी' 'देवदासी' होऊन अखेर तिला वेश्येची अवकळा आणि अप्रतिष्ठा प्राप्त झालेली दिसते.

राधावेश हा स्त्री-उपासकाचा वेश म्हणून त्याला शिमग्यासारख्या सुफलनार्थ केल्या जाणाऱ्या प्रथेत थोडी मुभा शिल्लक राहिलेली महाराष्ट्रात, कोकणात दिसते. लोकपातळीवर राधावेशाची ही अवस्था आहे. 'सौरी'चा एक अर्थ पुरुषाने घेतलेला स्त्रीवेश असा आहे.

भक्तिक्षेत्रातले राधामाहात्म्य हा पुरुषप्रधान व्यवस्थेच्या स्थिरीकरणानंतरचा अवतार आहे. त्यामुळे अवतार कल्पना स्थिर झाल्यावर राधा ही कृष्णाची समर्पिता सहचरी म्हणून भक्तिसाहित्यात अनेक रूपांनी येते. ती 'परम पुरुषाची', 'प्रकृती' म्हणून येते. पण ही 'प्रकृती' पुन्हा आपल्या मूळरूपाची, स्वतंत्रतेची ओळख ठेवण्याचाही प्रयत्न करते.





अनुक्रमणिका

बंगालमध्ये मधुराभक्ती विकसित झाली. बंगालमधील लोकजीवनातील प्रभावी अशा 'बाऊल' संप्रदायात 'प्रकृती'चे प्रबळ आदिम रूप दिसते. बाउलांच्या सहजिया पंथातील उपासना ही मधुरोपासना असून त्यांचे साहित्य राधा-कृष्ण प्रेमात रंगलेले आहे. प्रकृत्याच असलेले स्त्री-पुरुष लौकिक मीलन अलौकिक पातळीवर प्रतीक रूपात नेण्याचे काम मधुरोपासक भक्तिसंप्रदायाने केले. तरी आद्य प्रकृतिप्राधान्य त्यातूनही अनेक ठिकाणी प्रस्फुटित होते.

कृष्णोपासकांच्या अनेक संप्रदायांपैकी 'ललित संप्रदाय' हा एक संप्रदाय आहे. राधाभक्तिप्रधान 'सखी संप्रदाया'चेच हे एक रूप! या संप्रदायातील एक भक्त व कवी वंशीअली हे होते. ते राधेचे उपासक होते, कृष्णाचे नव्हे. आद्य प्रकृतिपूजकांचा, प्रकृतिप्राधान्य मानणाऱ्या उपासकांचेच राधोपासक हे एक रूप होते, हे सहज लक्षात येईल. या संप्रदायात राधिका सर्वेसर्वा आहे आणि कृष्ण तिचा सेवक आहे. 'महारास' कल्पनाचित्र रंगवताना वंशीअली म्हणतात,

सेव्य सदा श्रीराधिका सेवक नंदकुमार,<br>
दूजे सेवक सहचरी, सेवा विपुल विहार ।।

येथे राधा ही 'सेव्य' सेवा करून घेण्यास योग्य आहे आणि कृष्ण हा 'सेवक' आहे. प्रत्यक्ष जीवनातील स्त्री-पुरुषांच्या भूमिकेच्या नेमके विपरीत असे हे चित्र आहे.

परम पुरुष आणि प्रकृती यांच्या संवेशनातून विश्वचक्र चालते. पण पुरुष हा स्थिर व श्रेष्ठ आहे आणि प्रकृती ही चंचल व गौण आहे अशी 'पुरुष'प्रधान तत्त्वज्ञानाची मांडणी आहे. प्रकृतिप्रधान तत्त्वज्ञान नेमके उलट आहे. प्रत्यक्ष जीवनात स्त्री-पुरुष संबंध जसजसे बदलत गेले, तसतसे त्याचे प्रतिबिंब तत्त्वज्ञानात आणि समाजाच्या आदर्शात उमटलेले दिसते. पण समूहमनाची आदितत्त्वाकडे असलेली जबरदस्त सुप्त ओढ मात्र साहित्य अन् कला यांच्या माध्यमातून अनावरपणे व्यक्त होत राहिलेली दिसते. समूहमन आपली इच्छा कधी कधी अगदी सहज निर्व्याजपणे व्यक्त करून जाते.

'काकडआरती' हा सगुणोपासनेतील एक मोठा नाट्यपूर्ण आविष्कार आहे. त्यात आमच्या लहानपणी एक राधाकृष्णाचे मोठे लोभस अन् मजेशीर गीत गायिले जाई. तेव्हा ते पाठ होऊन स्मृतीच्या एका कप्प्यात साचून राहिले. आता त्या गीताची अपूर्वाई जाणवली आणि लोकप्रतिभेच्या चमत्काराने मन थक्क झाले. गीतात वर्णन केलेला प्रसंग राधा-कृष्णांचे परस्पर प्रेम, ओढ आणि आदर व्यक्त करणारा आहे. राधेने कृष्णाकडे एक लडिवाळ हट्ट धरला आहे.

राधा आग्रह करी हरीला, पायघड्या मज अजि घाला ।।

आता लाडक्या राधेचा हट्ट म्हटल्यावर तो पुरवण्यासाठी कृष्णही उत्साहाने तयारीला लागला. 'जाई, जुई, मधू, चंपक, मालती, गुलाब, चाफा, शेवंती, वाळा' एक की दोन अनेकानेक सुगंधी पुष्पांचा ढीग रचला. किंजलकांच्या राशी ओतून प्रियेचा पथ सुशोभित केला आणि हळुवारपणाने राधेचा हात धरून तिला पायघड्यांवर नेण्यासाठी तो उठवू लागला. पण राधेचा रुसवा अजून संपला नव्हता. पुन्हा कृष्णाने नाकदुऱ्या काढल्यावर तिने विचित्रच मागणी केली.

... पाय धुवा निजहस्ते वदली ती हरिला ।

कृष्णाला या मागणीत विपरीत तर काही वाटलेच नाही, उलट त्याला परमोल्लास झाला. अत्यंत आनंदाने तो तिला यमुनातीरावर घेऊन गेला अन्

कमलकर्णिका घेऊनी हाती,<br>
घाशी राधापदकमला ।।

इतका वेळ विविध हट्ट पुरवून घेणाऱ्या राधेचे मन कृष्णाच्या या सहजप्रेमाने भरून आले. कृष्णाचा स्पर्श चरणाला होताच तिला धन्य धन्य वाटले. एरवी सर्व शरीराला कृष्णस्पर्श होऊन त्या सुखात ती डुंवत असे. चरण मात्र अ-स्पर्श राहत. तिच्या मनीची अतृप्ती आता संपली.

धन्य राधिका धन्य म्हणे मी ।<br>
धन्य चरण स्पर्शिती प्रभूला ।।

असा हा अनोखा प्रेमसोहळा राधाच एकटी अनुभवत होती असे नव्हे, तर कृष्णही राधाप्रेमात रंगून गेला होता. तोही तृप्तपणे म्हणत होता, ''राधेच्या चरण-स्पर्शाने मी धन्य झालो.''

धन्य राधिके म्हणे कृष्ण तो,<br>
धन्य म्हणे मी अजि झालो ।।

परस्पर प्रेमात न्हाऊन तृप्त झालेले, धन्य झालेले ते आदिमिथुन, आदिम मिथुन कवीच्या मनीच्या तळघरातून हळुवारपणे शब्दरूपात अवतरले. येथे कोणी श्रेष्ठ नाही, कोणी कनिष्ठ नाही. कोणी गौण नाही, कोणी प्रधान नाही, कोणी सेव्य नाही, कोणी सेवक नाही आणि कोणी भोग्य नाही अन् कोणी भोक्ताही नाही.

जे नाते प्रत्यक्ष जीवनात अनुभवता येत नाही, पण जे कधी काळी भूतकाळात असेल अन् भविष्यकाळात पुन्हा असावे असे स्त्री-पुरुष संबंधातले परमादर्श स्वप्नचित्र अशा अनेक आविष्कारांतून अवतरले आहे.

हे राधाकृष्ण, प्रकृति-पुरुष मीलनाचे चित्र सत्य नव्हेच. पण हा आदर्श म्हणूनही पुरुषप्रधान व्यवस्थेत बदललेला दिसतो. मधुराभक्तिसदृश अनेक आविष्कारांतून परमेश्वर हा परमपुरुष प्रियकर-पती अन् भक्त प्रकृती प्रेयसी-पत्नी या प्रतीकातून येतात अन् प्रेयसी अथवा पत्नीची प्रियकर-पतीपुढे पूर्ण शरणागती, समर्पण अपेक्षितात. भक्त हा पूर्ण समर्पित हवा. हे समर्पणही एकतर्फी, निरपेक्ष हवे. त्यासाठी कोणतेही दिव्य भोगण्याची तयारी हवी. प्रतिफलाची अपेक्षाच नसल्याने ते मिळाले नाही म्हणून तक्रारही नाही. एकतर्फी, मूक समर्पण, विनातक्रार समर्पण ही भक्ताची, प्रियेची भूमिका आदर्श ठरली. स्त्री-संतांची प्रपंचमुक्तीची ओढ अनावर होती. पण रूढ

व्यवस्थेतील पती अन् प्रपंच यांची जाचक बंधने छळत होती. स्वेच्छेने निवडलेला, सखाभावाने वागवणारा, आनंद देणारा अन् घेणारा पुरुष मिळवण्याची इच्छा असली तरी प्रत्यक्षात ते अशक्य होते. म्हणून मग 'वेसवे'प्रमाणे परपुरुषाची निवड करून त्याच्यातच रंगून जाण्याचा स्वप्नादर्श निर्माण केला. त्यांच्या बदलेल्या वासना-इच्छांचे विरेचन (कॅथर्सिस) परमपुरुषाच्या रूपाने घडले. परपुरुषाची अनावर ओढ ही 'पर'(म) पुरुषाच्या ओढीत संक्रमित झाली. ते अटळ होते. लौकिक सुखाच्या आकांक्षेला अलौकिक पर्याय शोधला. त्यासाठी जनमर्यादा झुगारण्याची बंडाची प्रखर भाषा मुखर झाली. त्यातून त्यांच्या आंतरिक ऊर्मींचे स्वरूप स्पष्ट होते. आपला 'आत्मस्वर' शोधण्याची धडपड स्पष्ट दिसते.

मात्र हा पर(म)पुरुषाचा आदर्शही पुरुषप्रधान व्यवस्थेतील भक्ताचे / प्रेयसीचे एकतर्फी समर्पण अपेक्षिणारा होता. परंतु त्याचा लौकिक पातळीवर उपद्रव नसल्याने तो स्वीकारण्यात फारशी अडचण जाणवली नाही. दुसरीकडे गौळणी अन् लोकसरणीतील कथा-गाथांतून राधाभाव किंवा गोपीभाव भूमिकेतून मुक्त शृंगाराची स्वप्नचित्रे रंगवलेलीही आढळतात.

कारण प्रत्यक्ष लौकिक जीवनात पुरुषप्राधान्य आले आणि स्त्रीचे, विशेषतः पत्नीचे, 'पतीरूपी परमेश्वरा'च्या ठायी मूक, निरपेक्ष समर्पण हा आदर्श रुजला. प्रत्येक वरच्या स्तरापुढे खालच्या स्तराचे विनातक्रार मूक समर्पण हा प्रत्यक्ष जीवनातला मानदंड ठरला. जीवनातले सत्ताधारी अन् संपत्तीधारी हे ईश्वररूप 'स्वामी', 'मालक' झाले अन् वरकड श्रमकरी हे 'दास', 'सेवक' झाले. त्या श्रमकऱ्यांतली अखेरची, सर्वांत खालची पायरी स्त्रीची. त्यामुळे समाजातल्या सर्वच भोग्य साधनांचे स्वामी हे सत्ता-संपत्तीधारी झाले अन् भोग्य साधनांचे निर्माते जे श्रमकरी अन् स्त्रिया ते त्यापासून वंचित राहिले. कर्मविपाकवादाच्या विचारसरणीने हे दास्य बंदिस्त केले. त्याला धर्माचा मुलामा दिला. धर्मग्रंथ रचणाऱ्या भू-देवांनी श्रमिक अन् स्त्रिया या खऱ्या उत्पादकांना दास्यभावाच्या बेड्यांत जखडले अन् त्या बेड्यांना धर्मतत्त्वांचा अन् कर्मविपाकवादाचा सोनेरी मुलामा दिला. संतांची मुक्तीची चळवळ ही लादलेल्या या दास्याच्या विरोधातली बंडखोरी होती. बंडाचा हा पहिला उद्‌गार होता. बंडखोरांची मांदियाळी पुढे अवतरणार होती. पण बंडाचा झेंडा घेणारा पहिला बंडखोर तेराव्या शतकाअखेर संत ज्ञानेश्वरांच्या रूपाने अवतरला होता. (त्या बड्या बंडवाल्यांत ज्ञानेश्वर माने पहिला । 'बी' कवी) प्रथम भौतिक क्षेत्रात दास्य आले अन् क्रमाने धर्माच्या बेड्यांनी ते आवळत नेले होते. त्यातून सुटकेचा प्रयत्न करण्याचा प्रारंभ मात्र धर्मक्षेत्रातल्या बेड्या तोडण्यापासून झाला आणि त्याचा प्रारंभ संतचळवळींनी केला. प्रत्यक्ष जीवनात आलेली दुरवस्था नाहीशी करण्यासाठी चळवळ उभी करण्याचे बळ संतांजवळ नव्हते. तशी परिस्थितीही नव्हती. दास्य अन् अपमान यांचे शल्य मात्र तीव्रतेने डाचत होते.

समाजातील वरिष्ठ मुखंडांनी धर्माच्या नावावर नाकारलेले हक्क मिळविण्यासाठी प्रथम संतांनी धडपड केली. त्यामुळे पुढील सुधारकांची वाट प्रशस्त झाली.

दास्याची अन् गुलामगिरीची जाणीव दीर्घकाळ दास्य अंगवळणी पडलेल्यांना होतच नसते. मात्र समाजात काही व्यक्ती तीव्र संवेदनक्षम अन् उत्कट स्वातंत्र्यप्रिय असतात. त्यांना जेव्हा बंधनांची जाणीव होते, तेव्हा त्या बंदिस्त पिंजऱ्यातून बाहेर येण्याची धडपड करतात. भोवतालच्या समाजातही ती जाणीव जागी करण्याचा प्रयत्न करतात. त्याचा परिणाम समूहावर होतच असतो. विशेष सामर्थ्यशाली व्यक्ती अनुकूल काळ येण्याची वाट पाहत थांबत नाहीत. काळाची प्रतिकूलता भेदून ते मुक्तीचा आत्मस्वर शोधीत राहतात. संधी मिळताच तो व्यक्त करतात. त्यासाठी पडेल ती किंमत मोजतात. संतचळवळ ही उपेक्षितांना आत्मस्वर देणाऱ्या चळवळींची नांदी होती. प्रत्यक्ष जीवनच बदलून दास्य संपविण्याचे मार्ग शोधता येत नाहीत. शोधले तरी आटोक्यात येत नाहीत. शिवाय बंडखोर झाले तरी तेही त्या विशिष्ट भौतिक पर्यावरणातच घडलेले असतात. त्यामुळे पिढ्यान्‌पिढ्यांचे सर्व तत्त्वज्ञान, सर्व संचित मुळासकट उखडून फेकणे जमत नाही. अशा वेळी निदान व्यक्तिव्यक्तींचे सामर्थ्य तरी व्यक्त व्हावे अशी धडपड सुरू होते. संत चळवळ हा त्याचा आविष्कार आहे.

अंतिमतः सर्व विश्व द्वंद्वरहित आहे हेच खरे असले तरी परंपरेचा पगडा इतका जबरदस्त असतो, की वेद अन् वर्णाश्रमधर्म एकदम झुगारले जातच नाहीत. त्यांचे वैयर्थ एकीकडे कळत असते तरी त्यांच्या बेड्या प्रत्यक्षात तोडणे शक्य नसते. अशा वेळी निदान मानसिक पातळीवर 'मुक्ती'चे समाधान शोधण्याचा प्रयत्न होतो. संतांनी तेच केले. मध्ययुगीन जीवनातील भौतिक वातावरण ही संतांची मर्यादा ठरली हे मान्य करूनसुद्धा त्यांनी 'मुक्ती'चा पहिला कंठस्वर जिवाच्या आकांताने उमटवला, हे त्यांचे श्रेय त्यांना दिलेच पाहिजे.

परमश्रेयाकडे जाण्यासाठी 'विश्वाचे आर्त माझ्या मनी प्रकटले ।' असे उद्‌गार काढून 'विश्वस्वधर्म सूर्ये पाहो ।' म्हणून पसायदान मागणाऱ्या ज्ञानदेवांच्या दिव्य प्रतिभेपुढे मी नतमस्तक होते.

या पहिल्या पसायदान विचार साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद देऊन मला विचार व्यक्त करण्याची संधी दिली, याबद्दल मी विश्वस्त मंडळाला व आपणा सर्वांना धन्यवाद देऊन थांबते.

●

तारा भवाळकर
मोबाईल : ९८८१०६३०९९






अनुक्रमणिका



समीक्षा

प्रा. डॉ. आबासाहेब शिंदे

# नवनाथ गोरे यांच्या फेसाटी कादंबरीतील भाषाशैली


स्तावना :

'भाषा' ही एक सामाजिक संस्था असून व्यक्ती-व्यक्तीमध्ये संज्ञापन साधणे, हे भाषेचे खरे मूलभूत उद्दिष्ट असते. समाजव्यवहार चालविण्यासाठी भाषेचा माणसाला उपयोग होत असतो. परंतु भाषेत काही प्रादेशिक भेद असल्याचे आढळून येते. पण एक विशिष्ट भाषा बोलणारा कोणताही समाज कधीच एकसंघ राहत नाही. कारण त्या समाजात विविध कारणांनी वेगवेगळे गट किंवा समूह निर्माण होतात. धर्म, वंश, पंथ, जात आणि परंपरागत व्यवसाय, सामाजिक मागासलेपणा यामुळेच तो विभागला जातो. या पार्श्वभूमीमधूनच त्या-त्या भागाच्या बोली उदयास येतात. महाराष्ट्रात विविध भागांत विविध बोलीभाषा बोलल्या जातात. त्यामध्ये वैदर्भीय, माणदेशी, वऱ्हाडी, कोकणी, पुणेरी, खानदेशी बोलीभाषा, चंदगड बोली आदी भाषांमुळे मराठीमध्ये तब्बल सत्तर बोलींची नोंद केली.



वास्तविक, बोलीभाषेला एक विशिष्ट अशी लय, नाद मिळाल्यामुळे ती बोली वैशिष्ट्यपूर्ण ठरते. कारण बोलीभाषेला एक विशिष्ट अशी शैली प्राप्त झालेली असते. माणूस ज्या-ज्या परिसरात राहतो, तेथील लोकबोली तो बोलतोच. त्यामुळे स्थलपरत्वे वेगवेगळ्या बोली अस्तित्वात असतात, एवढेच नाही, तर विविध जातींच्या आणि वर्गांच्याही जातीनिहाय, वर्गनिहाय वेगवेगळ्या बोली अस्तित्वात असतात. असे समाजातील लोकबोलीतून लक्षात येते. त्यामुळे आपण नवनाथ गोरे यांच्या 'फेसाटी' या कादंबरीतील भाषाशैलीच्या विविध पैलूंचा अभ्यास करणार आहोत.

**नवनाथ गोरे यांचा जीवनप्रवास :**

नवनाथ गोरे यांचा जन्मच दुष्काळी पट्ट्यातील अवर्षणग्रस्त भागातील म्हणजे जत तालुक्यातील निगडी (बु.) या छोट्या गावातच झाला असल्याने त्यांच्या जीवनाची खरी परवड दुष्काळी पार्श्वभूमी असलेल्या भौगोलिक परिस्थितीत झाली आहे. बालपणापासूनच नवनाथला गरिबी सतत सतावत होती. गरिबीचं जिणं सांधताना नवनाथच्या आई-वडिलांची दमछाक होत असे. त्यात घरात खाणारी आठ माणसं; त्यामळे दररोजच एका वावरात कामाला गेल्याशिवाय चूलच पेटत नसे. इतक्या फाटक्या जीवनात नवनाथचा जन्म झाला.

वास्तविक, नवनाथचं मन कधीच शिक्षणात रमलं नाही. कारण त्याला सतत गरिबी सतावत होती. त्यातूनही शिक्षण घेण्याची ऊर्मी त्याची आई देत होती. त्यामुळे नवनाथचे प्राथमिक शिक्षण निगडी (बु.) येथेच झालं. नंतर त्यांनी माध्यमिक शिक्षण उमदी येथे घेतले. नंतर बी. ए., बी. एड. आणि एम. ए. पर्यंतच्या प्रवासापर्यंत त्यांची 'फेसाटी'च होऊन बसली आहे.

नवनाथ आपल्या भाषाशैलीबद्दल खूप काही ठळक सांगताना मन मोकळं करून माणदेशी ढंगात सांगतो. जत पूर्वभागातील भाषाशैलीचा आणि माणदेशी भाषाशैलीचा एक अनुबंध जुळतो आहे. भाषाबोलीच पण बोलताना ढंगदारपणा अन् त्यातच रंगेल आणि रगील शिव्या ऐकल्या, तर खूपच शेलक्या व बोलक्या असल्याचे जाणवते.

दरम्यानच्या कालखंडात नवनाथ गोरे हा उच्च शिक्षण घेण्यासाठी आला, तेव्हा तो साधा, सरळमार्गी, स्वभाव मितभाषीय, आपल्याच बोलीभाषेत बोलत होता. परंतु नंतरच्या कालखंडात गोरे शिवाजी विद्यापीठात शिक्षणासाठी आला आणि नवनाथच्या बोलीभाषेचं रूपांतर प्रमाणभाषेत झालं. परंतु गावाकडच्या गावरान बोलीभाषेत केव्हातरी जीवनप्रवास ठलगडून सांगताना मन आजही हेलावून सोडते.

**'फेसाटी'तील भाषाशैली :**

नवनाथ गोरे यांच्या फेसाटी कादंबरीतील भाषाशैली ही माणदेशी पूर्वभागातीलच असल्याचे अभ्यासातून दिसून येते. भाषेतील अस्सल गावरानपणा आणि रांगडेपणा जसाच्या तसा फेसाटी या कादंबरीत चित्रित केला आहे. तो संवाद पुढीलप्रमाणे -

नवनाथ म्हणतो,
वर्गात गुरुजी रागानं वरडलं,
''नाव सांग की रे सुक्काळीच्या.''
''नाथा.'' म्या म्हणालू.

अनुक्रमणिका








■■

**नवनाथ गोरे यांचा जन्मच दुष्काळी पट्ट्यातील अवर्षणग्रस्त भागातील म्हणजे जत तालुक्यातील निगडी (बु.) या छोट्या गावातच जन्म झाला असल्याने त्यांच्या जीवनाची खरी परवड दुष्काळी पार्श्वभूमी असलेल्या भौगोलिक परिस्थितीत झाली आहे. बालपणापासूनच नवनाथला गरिबी सतत सतावत होती. गरिबीचं जिणं सांधताना नवनाथच्या आई-वडिलांची दमछाक होत असे. त्यात घरात खाणारी आठ माणसं; त्यामुळे दररोजच एका वावरात कामाला गेल्याशिवाय चूलच पेटत नसे. इतक्या फाटक्या जीवनात नवनाथचा जन्म झाला.**

■■

गुरुजी म्हणाले, ''बाळा कुठं सोडून आलायंस?''

मी म्हणालो, ''नाथा सोपान.''

गुरुजी लईच कडाडलं, ''आडनाव कुठं वड्यात सोडलंस काय? व्हय रं देखण्या?''

फेसाटी कादंबरीतील मास्तर वर्गातील मुलांना नाव सांगण्यास सांगतात. परंतु नाथा प्रत्येक नाव तुटक-तुटक सांगतो. यातून त्यांच्या बोलीभाषेतील मागासलेपण जाणवते. त्याचबरोबर मनात न्यूनगंड वाळगून मास्तरांना तो कसा भीत होता, याचे ज्वलंत उदाहरण नाथाने आपल्या संवादात मांडले आहे.

गुरुजी दरडावलं आन म्हणालं, ''ह्याला घरला घेऊन जा, ह्यो काय शिकायच्या लायकीचा न्हाय. साधं पूर्ण नाव सांगता येत न्हाय सुक्काळीच्याला.'' इतक्या सहज भाषेत अन् शेलक्या शब्दात मास्तर नाथाच्या घरच्या लोकांना बोलतात, याची खंत नाथाच्या मनाला नेहमीच सतावत होती, हे तितकंच सत्य आहे.' (पृष्ठ क्र. २३)

वास्तविक विचार केला तर, नाथा गोरेला शिक्षण घ्यायचं म्हणजे फारच डोक्यावरनं जात होतं. कारण त्याचं अन् शिक्षणाचं सूत कधीच जमलं नाही, हेही तितकंच वास्तव आहे. म्हणून तो म्हणतो -

''काकू, मला शाळंला जायचं न्हाय...!''

''का रं बाबा?''

''मला शाळंत बसूच वाटत न्हाय बग.''

परंतु काकू म्हणते -

''बाबा, तसं करूनी रं, बक्कळ शाळा शिकावं, पुलिस व्हावं. मग शाळा न्हाय शिकला म्हंजी आमच्यावाणी तुला रानात काम करायला लागतंया. बाबा, बगतुयास न्हवं त्यो दत्ता शिकला न्हाय म्हणून कामाला जातूया.''' (पृष्ठ क्र. १८)

गरिबीच्या कचाट्यात अडकलेल्या नवनाथच्या जीवनात केवळ संघर्षच निर्माण झालेला असल्याने शिक्षणाची गोडी त्याला मुळातच नव्हती. कारण उद्याच्या पोटा-पाण्याचा प्रश्न त्याला सारखाच सतावत असल्याने त्याला शिक्षणापेक्षा जगणं महत्वाचं वाटत असल्याचे त्याच्या या भूमिकेतून स्पष्ट होते.

नवनाथ एक दिवस काकूला म्हणाला -

''काकू, त्वा पोळ्या केल्या न्हाईस?''

''बाळा आपला सण न्हाय ह्यो.''

''का?''

''आपल्या आयुष्याचा शिमगा चालू हाय न् सण कुठला बाळा?''

''काकू, मला पोळ्या नकू, म्या तुला कवा पोळ्या मागणारच न्हाय.''

''आरं माजं शानं बाळ,'' काकू म्हणते.' (पृष्ठ क्र. ३१)

गरिबीमुळे त्यांच्या घरात कधीच सण होत नसे. परंतु तेव्हा नाथाला कळत नव्हतं. शेजारच्या घरात पोळ्या असतात; मग आपल्या घरात का करत नाही, ही सल काकू त्याला समजावून सांगत म्हणाली, ''आरं नाथा, आपल्या घरात कधीच सण साजरा होत नाही; फक्त शिमगाच होतो.'' हे शब्द नाथाला समजताच तो त्याच दिवशी कानाला खडा लावतो आणि पोळ्या न मागण्याचा निर्धार करतो.

नवनाथ गोरे यांच्या घराण्यात अंधश्रद्धेचा प्रभाव जास्त प्रमाणात असल्याने देवा-धर्मावर फार श्रद्धा दिसून येते. त्याचे स्पष्टीकरण पुढीलप्रमाणे -

घरामागच्या पट्टीत येक लिंबाचं झाड हुतं. तिथं तीन दगडं हुती. त्या तिन्ही दगडांना हळदीचं, कुंकवाचं पट्टं वडलं हुतं, म्या काकूला म्हटलं,

''काकू, ह्या दगडाला कुकू का लावलाय गं?''

''ह्या दगडात बाबा, आई, आक्का हायती.''

''मग ह्यो दगुडाच हून वसल्या ती.''

''मग मलाच दाव बगू.''

''बाळा, तू बारका हायंस, तू मोठा झाला म्हंजी कळंल बग तुला.''

''मला आताच सांग.''

''तुला आक्काचं बगायचं हाय न्हवं.''

''व्हय.''

''तू दररोज सकाळच्याला लौकर उठून आंघुळ करून आक्काच्या पाया पडायचं, तुला येका दिशी आक्का दिसंल बरं का.''' (पृष्ठ क्र. ४०)

इतका अंधश्रद्धेचा प्रभाव नाथाच्या घराण्यातील भोळ्या-भाबड्या लोकांच्यावर असल्याने दगडावरतीच श्रद्धा असल्याचे आपणास कादंबरीच्या वाचनातून पाहावयास मिळते.



अनुक्रमणिका

शाळेत एका दिवशी सातपुते गुरुजी वर्गात पाढे शिकवत असतानाच गुरुजींनं तसं जोरात वराडलं. ताईपण घाबरून येका कोपऱ्यात जाऊन बसलो आन गुरुजी शिव्या देऊ लागलं,

"आरं ये सुक्काळीच्या, कुठे होतास येवढा वेळ? आई-बाप शाळेत पाठवत्यात का बोंबलत फिरायला? शाळा शिकायची हाय का न्हाय?" मी शांत होतो. गुरुजी रागानं आणखी कडाडलं,

"आरं ये देखण्या, तू म्हण पाढे."

तसा म्या वर्गातून बाहीर आलू, तसं दोन्ही हातात दोन दगडं घेटली न् शिव्या देईला सुरुवात केली -

"ये चांभारा बाहीर ई, रांडंच्या तुजा जीवच घेतू. रांडंच्या मला मारतूया." रडणं चालूच होतं. हात-पाय कापत हुतं. तोपर्यंत कोळी गुरुजी बाहेर आलं, म्हणालं, "अरे तू शहाणा आहेस. तो हातातला दगड टाक खाली." म्या न्हाय म्हटलं. येक दगूड जोरात मारला. त्यो दगूड दरवाज्याला जाऊन लागला. तसं गुरुजी आलं. सगळी पोरं खिडकीतनं बगत हुती. म्या मनाला म्हटलं -

'आजपसनं शाळंला लावला घोडा. मला शाळाच शिकायची न्हाय.'[५] (पृष्ठ क्र. ४३)

शिक्षण या विषयाचा नवनाथला मोठ्या स्वरूपात तिटकारा होता. त्याच्या जीवनात शाळा गौण होती. काम करून चार पैसे मिळविणे त्याच्या दृष्टीने गरजेचे होते. त्यात नाथाला शाळेतलं काहीच येत नसल्यानं त्याचं अन् सातपुते मास्तरचं कधीच जमलं नाही. अखेर नाथा मास्तरच्या अंगावर दगड घेऊन जातो अन् म्हणतो -

"ये चांभारा बाहीर ई, रांडंच्या तुजा जीवच घेतू. रांडंच्या मला मारतूया." इतक्या शेवटच्या टोकाला नाथा जातो. त्यामुळे शाळा, मास्तर, शिक्षण या विषयाचा नाथाच्या मनात तिटकारा निर्माण होत असतो. हे त्यांच्या फेसाटी या कादंबरीचे वाचन केले असता आपणासमोर येते.

शिक्षक आणि नाथा यांच्यामध्ये जिव्हाळा कधीच झाला नाही. ही त्यांच्या जीवनातील फेसाटी झाल्याचे आपणास कादंबरीतून स्पष्ट झाले आहे.

**'फेसाटी'तील भाषाशैली :**

नवनाथ गोरे यांचा गाव आणि परिसर दुष्काळी आणि अवर्षणप्रवण भाग ओळखला जातो. हा दुष्काळी पट्ट्यातील माणदेशी भाग म्हणून काही प्रमाणात ओळखला जातो. त्यामुळे नाथा गोरेची भाषा ही रांगडी; पण बोलकी असल्याचे कादंबरी वाचन करतेवेळी आपल्या समोर येते. बोलीभाषा आणि प्रमाणभाषा यांच्यात मोठ्या प्रमाणात फरक आपणास जाणवतो. या बोलीभाषेतील शब्द पुढीलप्रमाणे :

जल्म (जन्म), थोराड (मोठा), ल्याक (मुलं), येळंला (वेळेला), भुई (जमीन), अंगी (शर्ट), भाकणूक (भविष्य), टायम (वेळ), श्यात (शेत), कडबा (वैरण), च्यार (चार), रावनं (कष्ट करणं), रान (शेत), भाकर (भाकरी), डालपाटी (मेंढराची पिलं झाकण्यासाठी असलेली), लई (जास्त), वागर (मेंढराची जाळी), ईना (येईना), येका (एका), ईज (वीज), कण्या (ज्वारीचं पीठ), जिता (जिवंत), म्होरं (समोर), कोकरं (मेंढराची पिलं), व्याकूळ (कासावीस), धाकटी (लहान), थोरली (मोठी), ईकून (विकून), राच्यापसनं (रात्रीपासून), आईत्वार (रविवार), सांज (रात्र), बेस्तरवार (गुरुवार), तवापसनं (तेव्हापासून), डोस्कं (डोकं), त्वांड (तोंड), भजं (भजी), घुंच्या (टोप्या), खळं (धान्य मळण्यासाठी शेतात केलेलं गोल खळं), रास (धान्याची रास), वरीस (वर्ष), कवातर (केव्हातरी), दरडावलं (मोठ्यानं बोलला), रोगराई (आजार), सात (आजार), नकू (नको), बगटलं (पाहिलं), अडाणी (न शिकलेला), शेर (धान्य मोजण्याचे माप), वझं (ओझं), राच्चं (रात्रीचं), तवर (तोपर्यंत), ईनंती (विनंती), आवशिद (औषध), किरसोनी (साळूता, झाडू), खिदळणं (डिवचणं), वरळणं (बडबडणं) आदी जत पूर्वभागातील माणदेशी; पण धनगरी भाषाशैली आपणास पाहावयास मिळते.

नवनाथ गोरे यांच्या गावाकडची गावरान, रंगेल आणि रगेल बोलीभाषा असल्याचे दिसून येते.[६]

नवनाथ गोरे यांच्या भागातील भाषाशैलीबरोबर त्या भागातील लोकांच्या काही ठळक शेलक्या पण रंगेल शिव्या असल्याचे 'फेसाटी'तून स्पष्ट होते. उदा. -

"सुमी रांडला काय आक्कल न्हाय
गेल्या बाच्या मागं लागून."

सुक्काळीच्या, आगं ये रांडं, बोडकीच्या, रांडंच्या, कडू बेणं, उंडगीच्या, मुडद्या, आईला लावला घोडा आदी रंगेल, शेलक्या शिव्याही त्या भागात बोलल्या जातात. पण त्यांना त्याची काहीच जाण नसते. ते सहजच ओघवत्या बोलीभाषेत बोलतात, असे नाथा गोरे यांचे म्हणणे आहे.

नवनाथ गोरे यांच्या गावाकडे स्त्री-पुरुषांची नावेही काही वैशिष्ट्यपूर्ण ऐकण्यास मिळतात. ती पुढीलप्रमाणे - मल्लाप्पा, हिराक्का, नंदाक्का, सुदाक्का, आंदामाता, धुळ्या, नकुसा, काकू, हिरुबाई, इंदाबाई, येसाबाई, बनुबाई, मलकारसिद्ध, कुचनूर, महादेवाप्पा (राय्याप्पा), दत्ता, इंदाताई, समा मावशी, धर्मू सावकार, नाथा, रंगा दगड्या, संग्या, बाळ्या, गुंडा, सुभान, कोंड्या पारधी, बिराप्पा, मल्ला पाटील, रामा टोणे, ईश्वराप्पा, आवाई, शिवबाई, राजू जेवरगी आदी स्त्री-पुरुषांची नावे आपणास 'फेसाटी'च्या माध्यमातून वाचण्यास मिळतात.

जत हा दुष्काळी भाग महाराष्ट्र आणि कर्नाटक सीमाभागावर असल्याने काही प्रमाणात कन्नड भाषेचा प्रभाव असल्याचे जाणवते; काही प्रमाणात लिंगायत समाजामुळे मल्लाप्पा, बिराप्पा, ईश्वराप्पा आदी नावे पाहावयास मिळतात.[७] (पृष्ठ क्र. ९४)

**'फेसाटी'तील भाषाशैलीचे वैशिष्ट्य :**

नवनाथ गोरे यांनी आपल्या फेसाटी या कादंबरीत आपल्या गावाकडची गावरान बोली जशीच्या तशी मांडण्याचा प्रयत्न



अनुक्रमणिका

केला आहे. जतसारख्या कायम दुष्काळी, अवर्षणग्रस्त भागातील बोलीतील ढंगदारपणा आणि त्यातील साधेपणामुळे भाषा आपलीशी वाटते. कारण ग्रामीण भागावरोबर अवर्षणग्रस्त भागातील नातेसंबंध, व्यथा, वेदना, जीवनात आलेल्या अनेक संकटांना तोंड दिल्याचे कादंबरीतून स्पष्ट दिसून येते.

नाथा गोरे यांच्या बोलीवर माणदेशी बोलीवरोबर कन्नड बोलीचाही प्रभाव असल्याचे स्पष्ट जाणवते. त्यामुळे त्यांच्या भाषेत ठसकेबाज, ढंगदार, रांगडा, रंगेल आणि रगेलपणा असल्याचे कादंबरीतून व्यक्त झाल्याचे दिसून येते.

१. आद्य 'ए'चा उच्चार 'य' असा करतात. 'याक' (एक); तसेच 'ओ'बद्दल 'वो' येणे हा कानडीचा प्रभाव असल्याचे दिसून येते.
२. 'इ', 'ई', 'ए' या स्वरांपूर्वी 'व' अस्पष्ट उच्चारला जातो. कधी-कधी त्याचा लोपही होतो. उदा.- विस्तव (इस्तू), वीस (इस), वेळ (येळ), दिस (इळ), विटी (इटी).
३. कधी अनुस्वाराचा उच्चार केला जात नाही. उदा. - चिंच (चिच), गुंतला (गुतला), संपला (सपला), खुंटी (खुटी), विंचू (इच्चू).
४. तर कधी वर्णलोप होताना दिसतो. उदा. - शहर (शार), चांदणी (चात्री), महिना (म्हैना), लवकर (लगीच), एवढासा (उलीसा), विहीर (हीर), कळाला (कळ्ळा).
५. 'ओ' चा 'व' होतो. उदा. - ओकारी (वकारी), ओढाळ (वडाळ), ओटा (वटा), ओसरी (वसरी).
६. 'वि'चा 'इ' होतो. उदा. - विडा (इडा).
७. 'ण'बद्दल 'न' येतो. उदा. - वहिणी (भनी), पाणी (पानी), पाहुणा (पावना), गाणे (गाने) आदी वैशिष्ट्यपूर्ण शब्दकळा आपणास कादंबरीतून दिसून येते.[४] (अक्षरनोंदी - ८३)

**नवनाथच्या जीवनातील परवड :**

नवनाथ गोरे यांच्या जीवनात खाण्या-पिण्याची मोठी आबाळ झाली होती. त्यातील काही प्रसंग पुढीलप्रमाणे -

आपली गरिबी आणि दारिद्र्याविषयी आपल्या भावना व्यक्त करताना नाथा म्हणतो की -

"आमच्या भाकरीवर कालवण कुठलं? नुसत्या हिरव्या मिरचीची चटणी आन आंबाडीची भाजीही मला ग्वाड लागत हुती."

म्या काकूला म्हटलं,

"काकू, आपून बाजूला का बसलूया गं?"

"बाळा, आपून गरीब हाय. आपल्या भाकरीवर कालवण नसतंया म्हून..." मग तवापसनं मी न् काकू लांब बसत हुतो.[५] (पृष्ठ क्र. ८९)

गोरे यांच्या जीवनात खाण्याची परवड नेहमीच होत असे. आज हाय तर उद्या न्हाय. त्यामुळं कालवणाला साधं तेल सुद्धा मिळत नसे; नव्हे चटणीवर सोडण्यासाठी तेलाचा थेंबही मिळत नाही, इतकी खाण्या-पिण्याची आबाळ झालेलं जीवन नवनाथ जगत होता. वास्तव जीवन त्याने आपल्या डोळ्यांसमोर पाहिले असल्याने मनाला चटका लागतो.

नवनाथ गोरेंच्या जीवनावरोबर शालेय जीवनातील होत असलेली परवड मनाला हेलावून सोडते. गोरे आणि मास्तरांचे कधीच पटलं नाही. त्यामुळे दोघांमध्ये शाब्दिक भांडण निर्माण होत होते. याचे कारण नवनाथ कधीच नियमित शाळेला जात नसल्याने शाळेत त्याला काहीच येत नसे. त्याचबरोबर अंग झाकण्याइतके अंगावर चांगले कपडे मिळत नसल्याने वेळ पडल्यास फाटकेच कपडे घालून शाळेला जावे लागत असे. त्यामुळे जगणं, शिक्षण अन् माणसावानी जगण्याची सतत परवड होत गेल्यानं त्याच्या जीवनाची 'फेसाटी'च झाल्याचे त्यांच्या कादंबरीतून स्पष्ट झाल्याचे पाहावयास मिळते.

**निष्कर्ष :**

नवनाथ गोरे यांनी आपल्या अल्पभूधारक शेतीसमूहातील तरुणाच्या संघर्षाची चित्तरकथा साकारली आहे. त्याचबरोबर नवनाथ गोरे यांच्या भाषाशैलीवर त्यांच्याच मागासलेल्या दुष्काळी भागातील बोलीचा प्रभाव झाल्याचे दिसून येतो. जत पूर्वभाग अवर्षण भागातील रंगेल आणि रगेल, रांगड्या बोलीभाषेचा प्रभाव असल्याचे जाणवते. नाथाच्या जीवनातील आणि शिक्षणाची झालेली परवड; त्याचबरोबर दारिद्र्याचा भाळी नेहमीच शाप, कर्जाच्या निरंतर सावटाखाली पिचलेलं जीवन त्यांनी आपल्या 'सुंवरान'च्या आख्यानरूपात गुंफलं गेलं आहे.

नवनाथ गोरे ज्या अवर्षणग्रस्त भागात राहतो, त्या भागातील लोकसंवादामध्ये रांगडेपणा, बोलके संवाद, इरसाल गावरान शिव्यांमुळे नाथाची भाषाशैली अधिकच गावरान आणि रांगडेपणातील ढंगदारपणा या कादंबरीतून व्यक्त झाला, असे पाहावयास मिळते. कारण नाथाच्या भाषाशैलीमध्ये असलेल्या मागासलेपणाबरोबरच कन्नडचाही प्रभाव दिसून येतो. या सर्व पार्श्वभूमीवर नवनाथ गोरे यांच्या 'फेसाटी' या कादंबरीतून वैशिष्ट्यपूर्ण भाषाशैली स्पष्ट पाहावयास मिळते. ●

संदर्भ :
१. गोरे नवनाथ, 'फेसाटी'- प्रकाशिका - सौ. प्रियांका प्रशांत पटवर्धन, १३३३, शुक्रवार पेठ, पार्श्वनाथ रेसिडेन्सी, पुणे (पृष्ठ क्र. २३)
२. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. १८)
३. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. ३१)
४. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. ४०)
५. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. ४३)
६. गोरे नवनाथ यांच्या २८ जुलैच्या मुलाखतीतून साभार पोहोच
७. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. ९४)
८. मोकाशे सयाजीराव, अक्षर नोंदी (पृष्ठ क्र. ८३)
९. गोरे नवनाथ, उ. नि. (पृष्ठ क्र. ८९)

- प्रा. डॉ. आबासाहेब शामराव शिंदे,
ई-मेल : shinde.abasaheb11@gmail.com
चलभाष : ९१७२७४८५८६ / ९४२११८३४३५



लेख

प्रा. चांगुणा कदम

# नवभारत
## मासिकातील स्त्री-प्रश्न एक चिकित्सा
### (इ.स. १९४७-२०००)



निव्वळ करमणूक हेच ज्यांचे प्रयोजन आहे. अशी नियतकालिके वगळता इतिहासाच्या अभ्यासाचे एक साधन म्हणून नियतकालिकांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. नियतकालिके कालसापेक्ष असल्यामुळे त्यांच्या अभ्यासातून समकालीन समाजाच्या उत्क्रांतीचे विविधांगी पैलू दृष्टिक्षेपात येतात. या दृष्टीने स्वातंत्र्योत्तर कालखंडात उदयास आलेले चिकित्साप्रधान, सर्वसंग्राहक स्वरूप लाभलेले मासिक म्हणून 'नवभारत' मासिकाचा उल्लेख करावा लागतो.

वरील पार्श्वभूमीवर १९४७पासून आधुनिक भारताच्या तसेच महाराष्ट्राच्या सामाजिक-सांस्कृतिक जीवनात जे जे विचारप्रवाह निर्माण झाले, त्यांचे मंडन किंवा खंडन करण्याच्या प्रयत्नामध्ये 'नवभारत' मासिकाने उल्लेखनीय कामगिरी केलेली दिसून येते. याशिवाय स्वातंत्र्योत्तर काळातील समाजापुढे उभ्या असलेल्या सामाजिक समस्यांची मोकळेपणाने चर्चा व्हावी या दृष्टिकोनातून 'नवभारत' मासिकाच्या रूपाने विचारवंत, अभ्यासक या वर्गास विचारांचे मुक्त व्यासपीठ उपलब्ध झालेले होते.

वेदपूर्वकाळात पुरुषांप्रमाणे स्त्रियांना धर्मकृत्य आदी सर्व संस्कारांचे अधिकार होते. पण भारतीय स्त्रियांच्या सन्मानाचा हा इतिहास प्रातिनिधिक नसून अपवादात्मक होता. या पार्श्वभूमीवर ऋग्वेदापासून ते इ.स. १२०० पर्यंत हिंदू समाजात अनेक बदल झाले. पुरुषसत्ताक समाजरचनेतून आलेली कुटुंबसंस्था हीच स्त्रीच्या स्वातंत्र्याच्या मार्गातील अडसर बनली. स्त्रीच्या या अधोगतीला स्मृतिकाळापासून सुरुवात झाली. मनुस्मृतीच्या काळात जन्मापासून मृत्यूपर्यंत स्त्रीचे जीवन नियंत्रित करणाऱ्या रूढी रूढ झाल्या. उदा. बालविवाह, स्त्री-शिक्षण बंदी, केशवपन, विधवा पुनर्विवाहबंदी, सती इ. परिणामी सामाजिक व इतर सर्वच क्षेत्रांत स्त्रियांचा दर्जा खालावला तर मध्ययुगीन काळात मुसलमानांच्या स्वाऱ्या आणि अंमल भारतवर्षात सुरू झाल्यापासून स्त्रियांच्या सामाजिक जीवनाला उतरती कळा लागली. कित्येक घरांतून गोषा आला आणि उजळ माथ्याने समाजात वावरण्याची मोकळीक स्त्रियांना राहिली नाही. त्यामुळे समाजाच्या सांस्कृतिक आणि राजकीय जीवनातही अस्वस्थता निर्माण झाली.[१]

पुढे पेशवाईत हिंदू स्त्रियांचे जीवन अनिष्ट रूढी, परंपरांमुळे अतिशय केविलवाणे बनले. या पार्श्वभूमीवर १८१८ला पेशवाईचा अंत झाला आणि संपूर्ण भारतावर ब्रिटिशांचा एकछत्री अंमल सुरू झाला. ब्रिटिश कालखंडापासून प्रबोधन युग सुरू झाले. इंग्रजी राज्याच्या आगमनामुळे भारतीयांचा पाश्चात्त्य विद्या, पाश्चात्त्य संस्कृती यांच्याशी संबंध आला. पाश्चात्त्यांकडून आलेले नवे विचार व आपली परंपरानुगतिक जीवनशैली यातील वैचारिक संघर्षातून नवे सामाजिक भान आकार घेऊ लागले. पारंपरिक गोष्टींची नव्या बुद्धिवादी, विज्ञानवादी दृष्टीने चिकित्सा होऊ लागली. प्रथमच 'धर्म' या कल्पनेवर कठोर आघात केले जाऊ लागले. आपल्या परंपरेतील शाश्वत मूल्यांचा व बदलत्या काळानुरूप ग्राह्य गोष्टींचा शोध प्रबोधनयुगात घेतला गेला. स्वाभाविकच भारतीय स्त्री-जीवनाशी संबंधित महत्त्वाच्या प्रश्नांवर चर्चा सुरू झाली. स्त्रीच्या सर्वंकष परवशतेची कारणमीमांसा करून समाजसुधारकांनी वैचारिक आणि कृतिशील पातळीवर संघर्ष सुरू केला. या सुधारणावादी वर्गाचे स्त्रीप्रश्नविषयक वैचारिक संघर्षाचे प्रतिबिंब आपणास नियतकालिकात पाहावयास मिळते. त्या दृष्टीने 'नवभारत' मासिकात इ.स. १९४७ ते २००० या काळातील स्त्री-प्रश्नाच्या अनुषंगाने प्रसिद्ध झालेल्या निवडक लेखांचा संक्षिप्त आढावा घेतलेला आहे.

वरील पार्श्वभूमीवर 'नवभारत' मासिकात स्त्रीप्रश्नाच्या दृष्टिकोनातून नोव्हेंबर १९४८ च्या दुसऱ्या अंकात डॉ. वा. वि. आठल्ये यांनी 'स्त्रियांचे प्रश्न व सामाजिक नियोजन' या शीर्षकाखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. या लेखाचा मतितार्थ असा की, हिंदुस्थान बरोबरच एकंदर जगातील स्त्रिया अजूनही कमी अधिक प्रमाणात दास्यावस्थेतच आढळून येतात. स्त्रियांच्या या दास्यावस्थेचा व अगतिकत्वाचा दुष्परिणाम म्हणजे स्त्रियांचे अंतर्मन दुखावले जात असते. प्रस्तुत लेखात स्त्रियांविषयी प्रचलित असणाऱ्या काही अपसिद्धांताचीही मांडणी केलेली दिसून येते. प्रस्तुत लेखातील विवेचनानुसार स्त्रियांच्या हक्कांबरोबर कर्तव्यांचाही विचार करणे आवश्यक आहे. तसेच आपल्याकडे पूर्वी आर्यधर्मीयांनी व युरोपात रोमन

अनुक्रमणिका

कायद्यांनी व प्रारंभीच्या ख्रिश्चनधर्मीयांनी आपापल्या काळात स्त्रियांना समाजात बरोबरीचे स्थान देण्याचा प्रयत्न केला होता. तोच प्रयत्न सध्याच्या गरजांना अनुसरून व निश्चित योजना आखून आपण पुनः करावयाचा आहे, असा आशावादही लेखकाने व्यक्त केलेला आहे.

स्त्री-प्रश्नाच्या अनुषंगाने 'नवभारत' मासिकात जून १९४९ च्या नवव्या अंकात डॉ. ए. स. अळतेकर यांनी 'मुलींचा वारसाहक्क' या शीर्षकाखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. लेखकाच्या मते स्मृतिग्रंथांनी मुलींच्या वारसा हक्काची तरतूद मान्य केलेली असली तरी, विवाहानंतर मुलींचा पित्याच्या संपत्तीवरील हक्क नष्ट होतो, असे नारदस्मृतीने स्पष्ट बजावले आहे. प्रस्तुत लेखात स्त्रियांच्या वारसा हक्काच्या प्रश्नावर एक नवीन प्रकारचे स्त्रीधन निर्माण करावे, असा उपाय लेखकाने सुचविलेला आहे.

'नवभारत' मासिकात स्त्री-प्रश्नाच्या अनुषंगाने मे १९५१ च्या आठव्या अंकात प्रा. जयंत जोग यांनी 'धन्य हे सतीत्व' या शीर्षकाखाली काव्यरचना प्रसिद्ध केलेली आहे. सती पद्धतीचे विदारक सत्य मांडताना ते लिहितात की, 'घडाड घडाड चाले आगगाडी, परि न ढळते धन्य हे सतीत्व । राकट कुरूप रमण पेंगतो धन्य सतीपण यथार्थ जीवन।'[२] तत्कालीन कालखंडात स्त्री-प्रश्नाच्या अनुषंगाने स्त्रीशिक्षणाचा प्रश्न अधिक चर्चिला गेलेला दिसून येतो. याच प्रश्नाला अनुसरून 'नवभारत' मासिकात श्री. व्यं. नखाते यांनी जानेवारी १९५३ च्या चौथ्या अंकात 'स्त्रियांच्या शिक्षणाचे स्वरूप' या मथळ्याखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. प्रस्तुत लेखात त्यांनी सहशिक्षणाचा पुरस्कार केलेला दिसून येतो.

स्त्रीशिक्षणाच्या अनुषंगाने प्रा. सौ. शरयू बाळ यांनी 'नवभारत' मासिकात मार्च १९५४ साली सहाव्या अंकात 'स्त्रियांचे शिक्षण व व्यवसाय' या शीर्षकाखाली लेखाची मांडणी केलेली आहे. प्रस्तुत लेखात भारतीय व पाश्चात्य स्त्रियांच्या व्यवसायाचे विश्लेषण लेखिकेने केलेले आहे. भारतीय संस्कृतीतील स्त्रियांच्या स्थानाला अनुसरून 'नवभारत' मासिकात डॉ. मा. स. केळकर यांनी जून १९५४ च्या सातव्या अंकात 'संस्कृती आणि स्त्रीविषयक दृष्टिकोन' या शीर्षकाखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. लेखकाच्या विवेचनानुसार पुरुषप्रधान संस्कृतीमुळे स्त्रीजातीला पाश्चात्त्य समाजातही मानाचे स्थान मिळालेले नाही. तसेच कार्ल मार्क्सने म्हटले आहे की, सामाजिक संस्कृतीचे एक गमक समाजातील स्त्रियांची स्थिती हे आहे याप्रमाणे पाहिले तर, स्त्रीजातीची स्थिती गुलामापेक्षा विशेष सुधारलेली नाही.[३] प्रस्तुत लेखात भिन्न धर्मातील स्त्रीविषयक रूढींचा आढावाही घेण्यात आलेला आहे.

'स्त्री स्वातंत्र्याला पात्र नाही' या मनुवचनाला अनुसरून श्री. ना. गो. चापेकर यांनी डिसेंबर १९६२ साली 'नवभारत' मासिकाच्या तिसऱ्या अंकात 'न स्त्री स्वातंत्र्य मर्हति' या शीर्षकाखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. उ.वैदिक कालखंडात उपनयन संस्काराऐवजी विवाह हा संस्कार रूढ झाला. त्यातूनच बालविवाहाच्या प्रथेस सर्रास सुरुवात झाली. या प्रथेला अनुसरून 'नवभारत' मासिकात शरद पाटील यांनी जानेवारी १९७६च्या चौथ्या अंकात 'विवाह' शीर्षकाखाली लेख प्रसिद्ध केलेला आहे. प्रस्तुत लेखात लेखकाने वैदिक कालखंड, धर्मशास्त्रीय ग्रंथ, स्मृतिग्रंथ, सूत्रवाङ्मय इ. ग्रंथांनी पुरस्कारिलेले विवाहाचे प्रकार अधोरेखित केलेले आहेत.

सती प्रथेचे ऐतिहासिक, सामाजिक विश्लेषण करण्याच्या आवश्यकतेतून 'नवभारत' मासिकात १९९४ साली 'पारंपरिक हिंदू समाज आणि स्त्रीचे कर्तेपण' या शीर्षकाखाली श्रीमती वसुधा डालमिया यांनी लेख प्रसिद्ध केलेला आहे. या लेखामागील भूमिका मांडताना श्रीमती डालमिया ल्युडरिट्झ लिहितात की, ज्या धार्मिक-मानसिक विश्वात व समाजात सती प्रथेचे अस्तित्व होते, त्या विश्वामध्ये आज पोचता येणे अशक्य आहे ही गोष्ट पूर्ण खरी नाही, असे मला वाटते. आजच्या घडीला कोणी सती जावे अशी लेखिकेची भूमिका नाही. ज्या कोनामधून, जो चष्मा चढवून सतीचे कृत्य करणाऱ्या स्त्रियांकडे बघितले जात होते आणि निवाडे केले जात होते, त्यांची यथार्थता व योग्यायोग्यता तपासणे हा त्यांच्या लेखाचा मुख्य उद्देश आहे.[४]

प्रस्तुत लेखात लेखिकेने असे भाष्य केलेले आहे की, भारतीय प्रवोघनाचे वारसदार असलेले आपण सारे जण सती प्रथेचे पुनरुज्जीवन व्हावे याला अर्थातच संमती देऊ शकत नाही. पण सती जाणाऱ्या स्त्रियांचा ऐतिहासिक सांस्कृतिक वारसा, त्यांच्या जीवनाचे धार्मिक अधिष्ठान जाणून न घेताच सरधोपटपणे आपण त्यांचा निवाडा करून त्यांचे कर्तेपण बाद ठरवितो. यात आपण त्यांच्यावर अन्याय करीत असतो.

अशा प्रकारे 'नवभारत' मासिकातून प्रसिद्ध झालेल्या निवडक लेखांतून स्त्री-प्रश्नांचा चिकित्सक आढावा घेतलेला आहे.

**संदर्भ आणि टिपा**


१) रचना माने, स्त्रीवाद संकल्पना आणि स्वरूप, अक्षर प्रकाशन, कोल्हापूर, प्रथमावृत्ती, २०१३, पृ. ८८.

२) जयंत जोग, धन्य हे सतीत्व! आचार्य शं. द. जावडेकर व इतर (संपा), नवभारत प्राज्ञपाठशाळा मंडळ वाई, वर्ष ४, अंक ८, मे. १९५१ पृ. ४७.

३) मा. स. केळकर, संस्कृती आणि स्त्रीविषयक दृष्टिकोन, आचार्य शं. द. जावडेकर व इतर (संपा.) नवभारत दी प्राज्ञ प्रेस वाई वर्ष ७, अंक ९, जून १९५४, पृ. ०६.

४) वसुधा डालमिया ल्युडरिट्झ, पारंपरिक हिंदू समाज आणि स्त्रीचे कर्तेपण, मे. पुं. रेगे व इतर (संपा), नवभारत, दी प्राज्ञ प्रेस वाई, वर्ष ४७, अंक १०-११-१२ जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर पृ. २२.



● प्रा. चांगुणा कदम

बी. डी. काळे महाविद्यालय घोडेगाव (पुणे)





अनुक्रमणिका



पुस्तक परीक्षण

# 'रक्तचंदना'च्या जाणिवांचा मोहोर




रमण रणदिवे



कलाकृतीला मुठीत पकडण्यासाठी बरीच धडपड करावी लागते. ही धडपड अंधार आणि प्रकाश ह्यांची सरहद्द ओलांडण्यासारखी असते. मात्र असे करताना अंधारात आणखी अंधार सांडत असतो. तिथे सच्चेपणाचा कस लागतो. कवीला हा मनस्वीपणा टिकवून धरता यायला हवा, कारण हा व्यवहार सृजनाचा आणि त्याच्या विश्लेषणाचा असतो. कोणत्याही कलावंताने असाच व्यवहार करणे उचित ठरते.

जगण्याच्या पसाऱ्यातूनच साहित्य निर्माण होते. त्यातच जीवनाचा शोधकिरण असतो. जीवनाचे अधिक दर्शन त्यामधून घडत असते. समग्र माणूस तथा समग्र वास्तव सदेह करण्याची प्रतिज्ञा कवीने करायला हवी, कारण साहित्य जीवनकेंद्री असते. जो कवी जीवनाला थेट भिडू पाहतो, जो माणसांची नस पकडतो, तो कवी चहूबाजूंनी वाढत जातो.

नामवंत कवयित्री आश्लेषा महाजन ह्यांचा 'रक्तचंदन' हा कवितासंग्रह नुकताच प्रकाशित झाला आहे. 'कविताघर प्रकाशन' आणि 'गोल्डन पेज पब्लिकेशन'ने तो प्रकाशित केला आहे. महाजनांचे तीन कवितासंग्रह यापूर्वी प्रकाशित झाले आहेत. 'शब्दपल्लवी', 'स्वसंवेद्य' आणि 'मनभावन'च्या पाठीवर 'रक्तचंदन' आला आहे. कथासंग्रह, विनोदी लेखसंग्रह, ललितलेखांची पुस्तके, बालकुमारांसाठी विपुल लेखन त्यांनी केले आहे. कवयित्री आश्लेषा महाजनांच्या नावावर अनुवादित पुस्तकेही असल्यामुळे त्यांचा हात सतत लिहिता राहिला आहे. विविध साहित्य पुरस्कारांनी त्यांना सन्मानित करण्यात आले आहे.

'रक्तचंदन'मध्ये गीते, गझला, मुक्तके, मुक्तछंद इत्यादी काव्यप्रकारांतील एकूण १०६ रचना आहेत. ह्यातील बव्हंशी कविता स्त्रीकेंद्री आहेत. ख्यातनाम साहित्यिक मा. वसंत आबाजी डहाके ह्यांनी मलपृष्ठावरील नेमक्या शब्दात या कवितांची मौलिकता विशद केली आहे. संग्रहातील पहिल्याच कवितेत (पुनर्नवा होणाऱ्या स्त्रीचैतन्यास) कवयित्री म्हणते,

''ही युगायुगाची धारा, ही जन्मजन्मीची राधा,
हा पिढीपिढीचा सेतू, अन् अस्तित्वाचा गाभा,
ह्या रुदरपोकळीमधुनी, उगमाचा अक्षय ओघ,
हृदयातील अमृतकुंभ संजीवक ऊर्जास्रोत,
ही युगायुगाची धारा, ही पुनर्नवा ऋतुगर्भा,
ही जन्मजान्हवी माता, ह्या युगंधरेच्यासाठी
ही शब्दसुरांची गाथा, ही युगायुगांची धारा...

स्त्रीला विधात्याने दिलेले नवसृजनाचे दान, त्यामुळे तिला मिळालेले मातृत्व ह्याबद्दलची कृतज्ञता कवयित्रीने समर्पक शब्दातून, प्रतिमाप्रतीकातून अभिव्यक्त केली आहे. संग्रहातील ही सर्वोत्कृष्ट कविता आहे. स्त्रीविषयी उदात्त भावना यात आहे. 'बाई जगणे' या कवितेत कवयित्री म्हणते...

बाई जगणे जगणे जणू धावणे धावणे
भुईवरी पाय आणि आभाळाला ओलांडणे

बाई घरात आनंदाचे नित्यनूतन सडे घालते, तरीही कुठेतरी गूढ अज्ञातात तिचे वेडे मन धावत असते. तिच्या प्रत्येक क्षणाला लौकिकाचा नवा रंग असतो. या अलौकिकाला भव्य दिव्य संग लाभतो.

'आपलं काय असतं' या कवितेत कवयित्री म्हणते,

''कोसळणंही आपलं नसतं, उगवणंही आपलं नसतं,
आपलं तर जगण्याचं तप असतं,
या तपाचा वर मात्र निराकाराच्या स्वाधीन असतो.''

पुढे एका कवितेत कवयित्री म्हणते, ''बदलांचा वेग इतका जबरदस्त असतो की, काळाच्या मागे धावताना, त्याचे वोट धरताना दमछाक होते.

मुक्तछंदात असणारी अंगभूत लय कवयित्रीने उत्तमरीत्या सांभाळली आहे. ह्या काही ओळी पाहा...

निरर्थाचे काही क्षण डोकावताना ध्यानीमनी
स्तब्ध वारा, ताठ झाडे, जाग नसते पानोपानी
किंवा
किती धावतोय काळ, जणू अस्तित्वाशी खेळतोय
वय झाल्या सुरकुत्यांचे जीर्ण जाळे विणतोय
'शाश्वती' ह्या कवितेत जगन्नियंत्यास म्हणते
''कसले हे तुझे गारुड?
कावलेल्या आयुष्याच्या भिजत घोंगड्याला,
तुझ्या लख्ख प्रेमाच्या उन्हात वाळवून...
त्याचीच रजई करणारे. कोण आहेस तू करुणाघना?
किती विलोपलायस तू माझ्या निजरूपात तनामनात....?''

'दूरजवळ' या सुंदर प्रेमकवितेत कवयित्री म्हणते...



अनुक्रमणिका




"तुला दूरचे दिसते आणि मला जवळचे दिसते
तुला दिसे क्षितिजाची कक्षा, हेच मला ठसठसते
धवधव्यापरी तुझे बरसणे, माझे छोटे तळे
चौकटीमध्ये कसे सावरू तुझ्या ऋतूंचे झुले?"

संग्रहात काही दर्जेदार पुस्तके, गझला, गीतेही आहेत. या सर्व गेय रचना तंत्रशुद्ध आहेत. भावसंपन्न आहेत. गीतलेखनात कवीला गीतभान असणे आणि गझलेमध्ये गझलियत असणे अनिवार्य असते. कवयित्रीने हे सर्व प्रकार यशस्वीरीत्या सांभाळले आहेत. इच्छा असूनही विस्तारभयास्तव उदाहरणे देणे मी टाळतो आहे.

'आता फारसे', 'अंधार चिखल', 'कान्ह्या माझे प्रेम', 'चुलीत अक्कल म्हणे कुणीसे', 'कसचे काय?', 'जगूतसुद्धा सोप्पं' इ. अनेक कविता अर्थगर्भ आहेत. वाचकाला त्या विचारप्रवृत्त करतात. पुन्हा पुन्हा वाचाव्याशा वाटतात. कलानंद देतात. कवयित्रीच्या चिंतनाचा परीघ मोठा आहे ह्याची खात्री पटते. चिंतनशीलता व्यक्तिमत्त्वावर, जीवनानुभवावर तथा अंतःप्रवृत्तीवर प्रकाशझोत टाकते.

ही कविता भावनांना पाखडते. संवेदना व्यक्त होताना वेडे शब्द पाझरतात. कल्पनांच्या वेड्या थव्यांचे ती गीत आळवते. वेदनांचा गुंता साहून, संयमाने त्यास जोजवते. सांडलेले शब्द जेव्हा भांडतात, तेव्हा त्यांना थोपटते. लेखणीला वास्तवाचे भान आल्यावर... माझे शब्द का बरे जळू लागतात? असा तिला प्रश्न पडतो. मनात साचून आलेले व्यक्त करताना, ती निःशब्द होऊन स्वतःच्याच जाणिवांना गोठवते.

कवयित्री आश्लेषा महाजन ह्यांच्या कवितेचे स्वरूप थोडक्यात असे आहे. अर्थ हरवलेल्या शब्दांशी त्यांनी घरोबा केला नाही. उगाच तत्त्वज्ञानाच्या फैरी झाडण्यात त्यांच्या कवितेला प्रतिबंध करून त्यांनी साध्यासोप्या सुबोध कविता लिहिल्या आहेत. तर्काच्या प्रकाशात जीवनानुभव न्याहाळताना, त्यांनी प्रत्येक छोट्यामोठ्या अनुभूतीला, स्वतंत्र रसिकांना समृद्ध तर केलेच, परंतु जीवनप्रेमीही बनवले. रक्तचंदनी अस्सल जाणिवांच्या मोहोराने त्यांच्या कवितेचे झाड बहरले आहे.

● रमण रणदिवे
९७६५८१०६९९



पुस्तक परीक्षण

दयानंद कनकदंडे

# गुजरात फाईल्स
## उत्तर सत्य युगातील सत्याचा रहस्यभेद







००२च्या गुजरात दंगलीमागील अनेक गोष्टींचे रहस्योद्घाटन करणारे राणा अय्युब लिखित 'गुजरात फाइल्स' हे इंग्रजी भाषेतील पुस्तक मराठी भाषेत उपलब्ध झाले आहे. 'तहलका'साठी केलेल्या ज्यांच्या रिपोर्टिंगमुळे गुजरात दंगलीस जबाबदार अधिकारी व मंत्री यांना तुरुंगात जावे लागले, त्या राणा अयुब्ब यांनी ८ महिने आपली ओळख लपवत, जीव धोक्यात घालून केलेल्या शोधपत्रकारितेचा दस्तऐवज म्हणजे हे पुस्तक आहे. गुजरात २००२च्या दंगलीबाबत शोध-पत्रकारितेच्या माध्यमातून मोदी-शहा यांच्यावरील आरोपांचा शोध घेण्याचा प्रयत्न राणा अय्यूब या महिला पत्रकाराने केला. सनय प्रकाशन, पुणे यांनी सदर मराठी पुस्तक प्रकशित केले असून डॉ. दीपक बोरगावे यांनी या पुस्तकाचा अनुवाद केला आहे. रावसाहेब कसबे यांच्या राष्ट्रीय स्वयंसेवक संघावर लिहिलेल्या 'झोत' ह्या पुस्तकाचा त्यांनी इंग्रजीत केलेला अनुवाद प्रकाशनाच्या वाटेवर आहे. हे पुस्तक अशोक नारायण, राजन प्रियदर्शी, डी.पी. वंजारा, गिरीश सिंघल व अन्य उच्चपदस्थ अधिकारी तथा माया कोडनानी ह्या मोदी सरकारमधील मंत्री यांचे गुजरातसंबंधी माहितीपट बनविण्याच्या निमित्ताने दिग्दर्शक मैथिली त्यागी बनून अय्युब यांनी केलेले स्टिंग या पुस्तकात आहे.

नरेंद मोदी हे २०१४ साली प्रधानमंत्री होण्याआधी गुजरातचे मुख्यमंत्री होते. गुजरात मॉडेलच्या प्रचाराच्या आधाराने त्यांनी आपली एक 'विकासपुरुष' अशी प्रतिमा निर्माण केली. २००२मध्ये गुजरातेत झालेल्या दंगली, त्यांच्यावर झालेले आरोप यामुळे हिंदूहृदयसम्राट अशी एक प्रतिमासुद्धा त्याजोडीने निर्माण होणे त्यांच्या फायद्याचे ठरत गेले. विकास आणि हिंदुत्व यांच्या आधाराने निर्माण झालेल्या प्रतिमेच्या आधाराने ते प्रधानमंत्रीपदी पोचले. नेहरू युग, इंदिरा युग ते वर्तमानात देशात सुरू असलेले जे युग आहे ते मोदी युग आहे. मे २०१४मध्ये भारताचे प्रधानमंत्री झाल्यापासून या देशात मोदींच्या अवतीभवती चर्चा सुरू आहेत. एखादे वा एक-दोन राज्य वगळता गेल्या चार वर्षांत भाजपने विधानसभेच्या सर्वच निवडणुका जिंकल्या आहेत. मोदी व अमित शहा या जोडगोळीने हे सर्व हस्तगत केले आहे. देशातील अनेकजण विशेषतः मुस्लीम, दलित, ख्रिस्ती, आदिवासी हे सर्वच्या सर्व असुरक्षितता आणि भीतीच्या वातावरणात जगत आहेत. समूहाद्वारा हत्या(मॉब लिंचिग) हा एक प्रकार नव्याने किंबहुना दंगलीपेक्षा जास्त परिणामकरीत्या दहशत निर्माण करणारे हत्यार म्हणून

उपयोगात आणला जात आहे. देशात आजच्या घडीला जे काही चालले आहे त्याची व्याख्या लोक अघोषित आणीबाणीच्या स्वरूपात करीत आहेत. इंदिरा गांधींनी आणीबाणी काळात जनतेच्या अधिकाराचे दमन करण्याकरिता राज्ययंत्रणेचा उपयोग केला होता. ती आणीबाणी संविधानातील कलमांचा आधार घेऊन लावण्यात आली होती. वर्तमानातील अघोषित आणीबाणीच्या काळात राज्य यंत्रणा सोबतच बजरंग दल, विश्व हिंदू परिषद, अभाविप सारख्या संघटना दिमतीला आहेत. केंद्रात सत्तेत आल्यापासून लोकशाही संस्था आणि अभिव्यक्तिस्वातंत्र्य यांच्या दडपणुकीचा चाललेला प्रयत्न हा फॅसिस्ट राज्याकडे घेऊन जातो आहे. न्यायालयाचे स्वातंत्र्य धोक्यात आलेले आहे. न्यायमूर्ती चेलमेश्वर व अन्य तीन न्यायमूर्तींना घटीत होणाऱ्या घटनांना घेऊन पत्रकार परिषद घ्यावी लागली. ही भारताच्या इतिहासातील एकमेवाद्वितीय घटना आहे.

गुजरात फाईल्सच्या इंग्रजी पुस्तक प्रकाशन समारंभावेळी 'कारवान' पत्रिकेचे राजकीय संपादक हरतोश सिंग बल म्हणाले होते की, जे सत्य आपणास माहीत आहे, त्या सत्याचा पुनरुच्चार करणे, ते अधोरेखित करणे किंवा करत राहणे, ही गोष्ट पत्रकारितेमध्ये महत्त्वाची मानली गेली आहे. पण यासाठी पुन्हा पुन्हा पुरावे देण्याची गरज असते. 'गुजरात फाईल्स' हे पुस्तक वाचताना हे पुरावे मोठ्या प्रमाणावर दिलेले आपणास आढळतील.. सगळीच वृत्तपत्रे, वृत्तवाहिन्या ह्या सत्तेतील शक्तिशाली माणसाच्या प्रभावाखाली गेल्या आहेत. देशातील शक्तिशाली उद्योगसमूहाचे नियंत्रण हे प्रसारमाध्यमांवर प्रस्थापित होत जाण्याचा हा काळ आहे. अशा काळात आलेल्या या पुस्तकाने एक पत्रकार म्हणून आपण काय भूमिका घेतली पाहिजे, याचा वस्तुपाठ घालून दिला आहे. हे पुस्तक द्वेषाचे राजकारण करणाऱ्या प्रवृत्तीचे चेहरेच उघड करीत नाही तर लोकशाहीचे स्तंभ असणाऱ्या इतर चालक शक्तींचे खरे स्वरूप उघड करते. देशात सुरू असलेल्या घडामोडी समजून घेण्यासाठी गुजरात मॉडेल्स हे कुठल्या पायावर उभे होते, हे समजून घेण्याच्या दृष्टीने हे उपयुक्त असे पुस्तक आहे.

गुजरात फाइल्स हे पुस्तक केवळ सत्ताधारी जमातीच्या क्रूरतेबद्दल, निरंकुशतेबद्दलच बोलत नाही तर एकूणच लोकशाहीचा गळा आवळणाऱ्या प्रक्रियेच्या नोंदी घेते.. नव्या आर्थिक धोरणाच्या पार्श्वभूमीवर भांडवल आणि धर्म यांच्या युतीने ज्याप्रकारे राजकारणाचे कॉर्पोरेटायजेशन व गुन्हेगारीकरण केले आहे, याची मांडणी या पुस्तकात आहे. जनतेची सर्वसामान्य मानसिकता वर्चस्ववादी शक्तीच्या अनुकूल बनविण्यासाठी धर्म आणि संस्कृतीचा वापर हा किती अमानवीय असू शकतो, हे आपल्याला उच्चपदस्थ अधिकाऱ्यांच्या संवादावरून लक्षात येईल. 'जगा आणि जगू द्या' असे मानणाऱ्या, हिंदू उदारमतवादी असणाऱ्या अशोक नारायण यांच्यासारख्या गृह सचिव असलेल्या माणसाची हतबलता किती भयानक असू शकते, हे लक्षात येण्याबरोबर अन्य अधिकारी यांच्याशी झालेल्या संवादातून आपल्याला लोकशाहीचा गळा कसा आवळला जात होता, हे लक्षात येईल. राजन प्रियदर्शी यांचे दलित असणे, त्यांना त्यांच्या गावात त्यामुळे घर घेता न येणे, 'प्रियदर्शी'सारख्या दलित अधिकाऱ्यांना वेगळ्याच प्रकारच्या गंडात ढकलून व्यवस्थेकडून आपल्या फायद्यासाठी वापरून घेण्याची कार्यपद्धती अशा गोष्टीची नोंद त्या घेतात.. हरेन पंड्या यांच्या वायकोचे मुस्लिमांबद्दल असणारे पूर्वग्रह कसे अय्युब यांच्या सोबत झालेल्या मैत्रीने कमी होत गेले, हे मुळातून वाचलं जाण्यासारखं आहे. राजन प्रियदर्शी असो की माया कोडनानी सारखे लोक, समाजाने दिलेल्या न्यूनगंडावर मात करण्याच्या आकांक्षेपोटी मोदी-शहांच्या राजकारणाचे बळी कसे ठरत गेले? वंजारासारख्या लोकांना अन्य पर्यायच शिल्लक कसे ठेवण्यात आले नव्हते अशा अकल्पनीय गोष्टींबद्दल आपणास विचार करावयास भाग पाडतात. हे या पुस्तकाचे बलस्थान आहे, असे मला वाटते.

दंगलीचा व्होट बँक सुरक्षित ठेवण्याकरिता केला गेलेला उपयोग, प्रतिमानिर्मिती करिता खोट्या चकमकीचा वापर, संपूर्ण नोकरशाही एका व्यक्तीच्या हातचे वाहुले बनविण्यासाठी केलेल्या करामती, वर्ण-जातिव्यवस्थेने व्यक्तीला दिलेल्या सन्माननीय व अपमानास्पद ओळखीचा वापर, विरोधात जाणाऱ्या अधिकारी व मंत्रिमंडळ सहकाऱ्यांचा छळ 'गुजरात फाइल्स' मधल्या पाना-पानावर आपल्याला वाचायला मिळेल. चकमकीबद्दल काय म्हणाल? या प्रश्नाला उत्तर देताना अशोक नारायण म्हणतात, चकमकी या राजकीय होत्या; त्यातील धार्मिक अभिनिवेश हा कमी होता. सोहराबुद्दीन चकमकीकडे पाहा. राजकारणी लोकांनी आदेश दिल्यावर त्याला मारले गेले. अमित शाह यामुळेच गजाआड झाले. हे सगळीकडेच होत आहे. खोट्या चकमकी या एक तर राजकीय लोकांच्या प्रेरणेमुळे होत आहेत किंवा यात पोलिसांचा अतिउत्साह दिसतो आहे.

हे पुस्तक वाचून लोया सारख्या न्यायाधीशाची हत्या कशी झाली असेल? का झाली असेल? याचे चित्रण आपल्या डोळ्यांसमोर येते. आज देशभरात मोदीच्या हत्येच्या षड्यंत्राची जी चर्चा सुरू आहे, त्याची उत्तरे 'गुजरात फाइल्स' वाचायला लागलो की मिळायला लागतात. सोहराबुद्दीन, इशरत यांचे एन्काउंटर, जीवाला धोका असल्याच्या पेरलेल्या बातम्या, निवडणुकाची गणिते अशा अवर्णनीय गोष्टी आपल्या समोर प्रगट होतात.

इंग्रजी आवृतीच्या प्रस्तावनेच्या सुरुवातीला न्यायाधीश बी.एन. श्रीकृष्ण यांनी ईशावास्योपनिषदातील एक श्लोक उद्धृत केला आहे. त्यानुसार सुवर्णपात्राने सत्याचा झाकलेला चेहरा राणा अय्युब यांनी पत्रकारितेच्या सत्यधर्माचे रक्षण व्हावे म्हणून जीवावर उदार होऊन उघडा केला आहे. सदर अनुवाद हा राणा अय्युब यांचे म्हणणे मराठी भाषेत परिणामकारकरीत्या पोचविणारा आहे. इंग्रजी साहित्य व भाषांतर विद्येचे प्राध्यापक असलेल्या डॉ. वोरगावे यांनी इंग्रजीतल्या निवेदनातला ओघवतेपणा मराठीत आणण्याचा पुरेपूर प्रयत्न केला आहे. ●

दयानंद कनकदंडे
चलभाष : ८३६९६६६०५७
ईमेल : dayanandk77gmail.com



अनुक्रमणिका





कार्यवृत्त

प्रकाश पायगुडे

# महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे मुख्य शाखा कार्यवृत्त नोंद

## दि. १ मार्च २०१८ ते ३१ सप्टेंबर २०१८

**१. दि. ८ मार्च २०१८ : जागतिक महिला दिनानिमित्त :**

'कविता बाईच्या' हे विशेष कविसंमेलन आयोजित करण्यात आले. डॉ. अश्विनी धोंगडे अध्यक्षस्थानी होत्या. संदीप खरे, अशोक कोतवाल, संध्या रंगारी, बालिका बिटले या कवींनी आपला सहभाग नोंदविला. अध्यक्ष डॉ. अश्विनी धोंगडे यांनी आपले विचार मांडले.

**२. दि. ९ मार्च २०१८ : कवी यशवंत स्मृतिपुरस्कार समारंभ:**

शांताराम खामकर यांच्या 'भवताल' या कवितासंग्रहाला डॉ. रेखा इनामदार-साने यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. स्वप्नील पोरे व प्रभा सोनवणे या निवड समिती सभासदांपैकी स्वप्नील पोरे यांनी निवडीमागची भूमिका विशद केली. कवी शांताराम खामकर, अध्यक्ष डॉ. रेखा इनामदार-साने यांची समयोचित भाषणे झाली. कवी यशवंत यांच्या कन्या नीलिमा आलुलकर व जामात श्रीयुत आलुलकर यांचाही या वेळी हृद्य सत्कार करण्यात आला.

**३. दि. १५ मार्च २०१८ : मसाप गप्पा :**

या उपक्रमांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद आणि 'सरहद' पुणे यांच्या संयुक्त विद्यमाने काश्मिरी साहित्यिक मा. प्राणकिशोर कौल यांच्याशी मृणाल कुलकर्णी यांनी संवाद साधला. या वेळी सरहदचे संजय नहार उपस्थित होते. 'पद्मश्री' किताब जाहीर झाल्यानिमित्त मसापतर्फे त्यांचा जाहीर सत्कारही या वेळी करण्यात आला.

**४. दि. १९ मार्च २०१८ : कथासुगंध :**

या उपक्रमांतर्गत कथाकार मृणालिनी चितळे यांच्या निवडक कथांचे वाचन झाले. महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या सौदामिनी साने व शुभांगी दामले यांनी हे अभिवाचन सादर केले. त्यानंतर स्वतः कथाकार मृणालिनी चितळे यांनी कथांमागच्या कथा उलगडून दाखवल्या.

**५. दि. २ एप्रिल २०१८ : श्रद्धांजली सभा :**

कै. के. रं. शिरवाडकर, गंगाधर पानतावणे, म. के. ढवळीकर या तिघांसाठी कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या अध्यक्षतेखाली श्रद्धांजली सभा आयोजिण्यात आली होती. वामन खरे (नांदेड), मंजिरी भालेराव, श्रीराम रानडे, वि. दा. पिंगळे, अरुण खोरे, अरुणचंद्र पाठक (ढवळीकर), सुधीर गव्हाणे, डॉ. राजा दीक्षित, डॉ. न. म. जोशी, बीना ढवळीकर-इनामदार यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली.

**६. दि. ३ एप्रिल २०१८ : पुष्पा पुसाळकर पुरस्कार वितरण :**

राजेंद्र बनहट्टी यांच्या हस्ते 'मनोविकास' प्रकाशनाच्या अरविंद पाटकर यांनी 'अंग देशातलं नवल' या पुस्तकाचा उत्कृष्ट निर्मिती पुरस्कार स्वीकारला. प्रीती बनहट्टी, प्रा. मिलिंद जोशी, अरविंद पाटकर, राजेंद्र बनहट्टी यांची यथोचित भाषणे झाली. परीक्षक चंद्रशेखर जोशी यांनी विचार मांडले.

**७. दि. ६ एप्रिल २०१८ : कै. प्रा. रा. श्री. जोग स्मृतिपुरस्कार:**

डॉ. निशिकांत मिरजकर यांच्या हस्ते 'बिंब प्रतिबिंब' या ग्रंथासाठी डॉ. वासुदेव मुलाटे यांना आणि 'स्वरूप' प्रकाशनाच्या राजश्री पांगारकर यांना पुरस्कार प्रदान करण्यात आला. प्रारंभी उपस्थित मान्यवरांनी जोग यांच्या प्रतिमेला पुष्पांजली वाहिली. निवड समिती सदस्य डॉ. मनोहर जाधव, डॉ. वैजयंती चिपळूणकर, डॉ. तुकाराम रोंगटे यांचे सत्कार करण्यात आले. निवड समिती सदस्य डॉ. मनोहर जाधव यांनी परीक्षकांचे मनोगत व्यक्त केले. डॉ. वासुदेव मुलाटे यांनी पुरस्कार विजेत्याचे मनोगत व्यक्त केले. अध्यक्ष डॉ. निशिकांत मिरजकर यांनी समारोप केला.

**८. दि. ११ एप्रिल २०१८ :**

**कै. शं. ना. जोशी स्मृतिपुरस्कार वितरण समारंभ :**

डॉ. अनिल अवचट यांच्या अध्यक्षतेखाली व त्यांच्या हस्ते 'नागालँडच्या अंतरंगात' या ग्रंथाच्या लेखिका अर्चना जगदीश यांना यंदाचा शं. ना. जोशी पुरस्कार प्रदान करण्यात आला. डॉ. प्रतिमा जगताप यांनी परीक्षकाचे मनोगत व्यक्त केले. या वेळी अर्चना जगदीश, मोरेश्वर शंकर जोशी आणि डॉ. अनिल अवचट यांची यथोचित भाषणे झाली. मान्यवरांचे सत्कार करण्यात आले.

**९. दि. १३ एप्रिल २०१८ :**

**डॉ. बाबासाहेब आंबेडकर स्मृतिदिन :**

स्मृतिदिनाच्या पूर्वसंध्येला 'परिवर्तनाच्या कविता' हे कविसंमेलन डॉ. मनोहर जाधव यांच्या अध्यक्षीय उपस्थितीत पार पडले. वि. दा. पिंगळे, शशिकांत हिंगोणेकर, शाहीर बाबासाहेब

जाधव, अंकुश अरेकर, अनिल साबळे या कवींनी आपल्या कविता सादर केल्या.

**१०. दि. १६ एप्रिल २०१८ : पालकांची कार्यशाळा :**

कार्यवाह माधव राजगुरू यांनी उपस्थितांचे स्वागत व प्रास्ताविक केले. संगीता पुराणिक व राजीव तांबे यांचा सत्कार करण्यात आला. पुराणिक, तांबे यांनी मनोगत व्यक्त केले. पालकांचा उत्तम प्रतिसाद या कार्यशाळेस लाभला.

**११. दि. २१ एप्रिल २०१८ :**

ज्येष्ठ अर्थतज्ज्ञ आणि लेखक डॉ. वसंतराव पटवर्धन यांचा सत्कार व मुलाखत घेण्यात आली. सुधीर गाडगीळ यांनी डॉ. पटवर्धन यांची मुलाखत घेतली. सिंबायोसिसचे कुलपती डॉ. शां. ब. मुजुमदार व सुधीर गाडगीळ यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी केंद्रीय मंत्री ना. प्रकाशजी जावडेकर यांची ध्वनिचित्रफित दाखविण्यात आली. डॉ. मुजुमदारांच्या हस्ते डॉ. पटवर्धनांचा सत्कार करण्यात आला. डॉ. शां. ब. मुजुमदार, प्रमोद जेजूरीकर यांनी आपले विचार व्यक्त केले.

**१२. दि. २२ एप्रिल २०१८ : जागतिक पुस्तक दिन :**

या निमित्ताने डॉ. सरोजा भाटे यांच्या हस्ते निवडक 'मुद्रितशोधकांचा सन्मान' करण्यात आला. त्या मध्ये गोपाळराव कुलकर्णी, विजय सरदेशपांडे, मिलिंद बोरकर, रमेश भंडारी, विजय जोशी, जयश्री हुल्याळकर, प्रा. गिरीश झांबरे, अनुश्री भागवत, आरती घारे, रूपाली अवचरे, राजेंद्र पुरोहित, उल्का पासलकर, नरेंद्र आढाव, प्रदीप गांधलीकर, विशाखा धायगुडे, मोरेश्वर ब्रह्मो या मुद्रितशोधकांचा डॉ. भाटे यांच्या हस्ते यथोचित सन्मान करण्यात आला. पैकी विजय सरदेशपांडे, अनुश्री भागवत, आरती घारे, रूपाली अवचरे, उल्का पासलकर, रवींद्र गुर्जर यांनी मनोगते व्यक्त केली. डॉ. भाटे यांची यथोचित भाषणे झाली.

**१३. दि. ६ मे २०१८ : जागतिक हास्यदिन :**

मसाप व लायन्स क्लब (औंध पाषाण) यांच्या संयुक्त विद्यमाने एक वेगळा कार्यक्रम परिषदेत झाला. डॉ. सतीश देसाई यांनी आयोजनामागची भूमिका स्पष्ट केली. व्यासपीठावरील शि.द. फडणीस, मंगला गोडबोले, रवींद्र कोकरे, रमेश शहा या मान्यवरांचे स्वागत करण्यात आले. पैकी रमेश शहा व शि. द. फडणीस यांनी मनोगते व्यक्त केली. मंगला गोडबोले यांनी व्याख्यान दिल्यानंतर रवींद्र कोकरे यांनी कथाकथन केले. प्रदीप बर्गे यांनी सूत्रसंचालन केले.

**१४. दि. १५ मे २०१८ :**

ज्येष्ठ संशोधक आणि लेखक डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर यांचा सत्कार यास्मीन शेख यांच्या हस्ते करण्यात आला. यास्मीन शेख यांनी मनोगत व्यक्त केले. त्यानंतर भानू काळे यांनी डॉ. दत्तप्रसाद दाभोळकर यांची प्रदीर्घ मुलाखत घेतली.

**१५. दि. २६ मे २०१८ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद वर्धापन दिनानिमित्त विशेष ग्रंथकार आणि वार्षिक ग्रंथ पुरस्कार प्रदान समारंभ ११२व्या वर्धापनदिनानिमित्त एस. एम. जोशी सभागृहात आयोजित करण्यात आला. ही पारितोषिके ओरिसाच्या ज्ञानपीठ पुरस्कार विजेत्या प्रसिद्ध साहित्यिक मा. प्रतिभा राय यांच्या हस्ते प्रदान करण्यात आली. (सविस्तर यादी इतरत्र प्रकाशित केली आहे.) व्यासपीठावर मा. प्रतिभा राय, अध्यक्ष डॉ.रावसाहेब कसबे, मुख्य विश्वस्त डॉ. शिवाजीराव कदम, मा. उल्हासदादा पवार व मा. चंद्रकांत शेवाळे उपस्थित होते. प्रारंभी ऋचा बेंद्रे यांनी 'मोगरा फुलला' हे गीत सादर केले. या वेळी कार्यकारिणी सदस्यांच्या हस्ते उपस्थित देणगीदारांचा सन्मान करण्यात आला. पारितोषिकप्राप्त विजेत्यांपैकी डॉ. मुकुंद दातार, माधवराव गाडगीळ आणि प्रतिभा रानडे यांनी आपल्या भावना व्यक्त केल्या. मा. प्रतिभा राय यांचे मुख्य व्याख्यान व डॉ. कसबे यांनी अध्यक्षीय समारोप केला. या कार्यक्रमास गावोगावाहून आलेल्या श्रोत्यांचा मोठा प्रतिसाद मिळाला.

**१६. दि. २७ मे २०१८ : ११२ वा वर्धापन सोहळा :**

ज्येष्ठ मूर्तिविज्ञानतज्ज्ञ डॉ. गो. बं. देगलूरकर यांच्या अध्यक्षतेखाली यंदाचा वर्धापन सोहळा उत्साह व आनंदात पार पडला. डॉ. प्रभाकर मांडे यांना 'मसाप जीवन गौरव पुरस्कार', राजा शिरगुप्पे यांना डॉ. भीमराव कुलकर्णी 'कार्यकर्ता पुरस्कार' आणि रवींद्र बेडकीहाळ व गिरीश दुनाखे यांना रत्नाकर कुलकर्णी स्मृतिप्रीत्यर्थ 'मसाप कार्यकर्ता पुरस्कार' आणि राजा फडणीस पुरस्कृत मसाप पिंपरी चिंचवड शाखेला मसाप उत्कृष्ट शाखा पुरस्कार (फिरता करंडक) देऊन गौरविण्यात आले. मसापचे ज्येष्ठ कार्यकर्ते राजा फडणीस यांचा वयाची ८० वर्षे पूर्ण झाल्यानिमित्त सत्कार करण्यात आला. तसेच मसापचे कर्मचारी व सेवकांचा सन्मान करण्यात आला. देणगीदार अनुराधा कुलकर्णी यांचा सत्कार करण्यात आला. गिरीश दुनाखे, रवींद्र बेडकीहाळ, राजन लाखे, राजा शिरगुप्पे, डॉ. प्रभाकर मांडे यांची यथोचित भाषणे झाली. डॉ. गो. बं. देगलूरकर यांचे प्रमुख पाहुणे या नात्याने भाषण झाल्यावर डॉ. रावसाहेब कसबे यांनी अध्यक्षीय समारोप केला. या समारंभाचा प्रारंभ 'आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने' हा संत तुकारामांचा अभंग गायक अवधूत गांधी यांनी गाऊन केला. या सोहळ्यास श्रोत्यांचा प्रतिसाद लाभला. श्री. पतंगे यांनी चौघडा वादन केले व दोन्ही दिवस इमारतीवर रंगीबेरंगी लाईटच्या माळा सोडण्यात आल्या होत्या.

**१७. दि. २९ व ३० मे २०१८ :**

**ज्येष्ठ साहित्यिक राजेंद्र बनहट्टी गौरव व्याख्यानमाला :**

दि. २९ मे व ३० मे रोजी दोन दिवसीय गौरव व्याख्यानमाला आयोजित करण्यात आली. डॉ. अरुणा ढेरे यांची दोन व्याख्याने या निमित्ताने झाली. पहिल्या दिवशीचा विषय 'सृष्टी आणि स्त्री' व दुसऱ्या दिवशीचा विषय 'राणी रुक्मिणी' हा होता. त्यांना

ग्रंथभेट देऊन त्यांचा सत्कार करण्यात आला. दोन्ही व्याख्यानांना रसिक श्रोत्यांचा उदंड प्रतिसाद मिळाला.

**१८. दि. ११ जून २०१८ :**

**कृष्ण मुकुंद उजळंबकर पुरस्कार प्रदान समारंभ :**

व्यासपीठावरील मान्यवरांच्या हस्ते प्रतिमेस फुले अर्पण करण्यात आली. डॉ. नलिनी गुजराथी यांनी कै. उजळंबकर यांच्या विषयी मनोगत व्यक्त केले. समारंभाचे अध्यक्ष डॉ. वसंतराव गाडगीळ यांच्या हस्ते पुरस्कार विजेते नरेश नाईक यांना त्यांच्या 'सामवेदीबोली' या ग्रंथासाठी रु. १०,०००/-, सन्मानचिन्ह, सन्मानपत्र व गुच्छ देऊन त्यांना हा पुरस्कार प्रदान करण्यात आला. मोहन गुजराथी, उजळंबकर बंधू व भगिनी यांचे सत्कार करण्यात आले. डॉ. दिलीप शेठ व अभिजित घोरपडे यांच्या निवड समितीपैकी डॉ. दिलीप शेठ यांनी निवड समितीचा दृष्टिकोन विशद केला. कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी, पुरस्कार विजेते नरेश नाईक यांची भाषणे झाली. सामवेदी बोली भाषा कशी असते, याचे उदाहरण म्हणून श्री. नाईक यांनी त्या भाषेतील एक छोटी कथा वाचून दाखविली. डॉ. वसंतराव गाडगीळ यांनी संस्कृत भाषेतून अस्खलीतपणे अध्यक्षीय समारोपाचे भाषण केले.

**१९. दि. २५ जून २०१८ :**

**कै. हरी नारायण आपटे स्मृतिशताब्दी विशेष कार्यक्रम :**

मसाप व आनंदाश्रम संस्था यांच्या संयुक्त विद्यमाने कादंबरीकार कै. ह. ना. आपटे स्मृतिशताब्दीनिमित्त लक्ष्मीकांत देशमुख यांच्या अध्यक्षतेखाली आनंदाश्रमात एक विशेष कार्यक्रम झाला. प्रथम महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या सौदामिनी साने यांनी हरिभाऊंच्या 'पण लक्षात कोण घेतो' या कादंबरीतील निवडक भागांचे अभिवाचन केले. संमेलनाध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांचे 'हरिभाऊंच्या कादंबऱ्या' या विषयावर व्याख्यान झाले. या वेळी दोन्ही संस्थांचे पदाधिकारी उपस्थित होते. विश्वस्त वसंत आपटे, दिलीप आपटे, सरोजा भाटे, अपर्णा आपटे, माधवी कोल्हटकर, ॲड. मेधा नांदर्गीकर, प्रा. मिलिंद जोशी, सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर उपस्थित होते. प्रमुख विश्वस्त वसंतराव आपटे यांनी प्रास्ताविक केले व अपर्णा आपटे यांनी आभार मानले. अनेक मान्यवर साहित्यिक उपस्थित होते.

**२०. दि. ९ जुलै २०१८ :**

**कै. प्रा. शं. ना. तथा सोनोपंत दांडेकर स्मृतिपुरस्कार समारंभ :**

प्राचार्य डॉ. दिलीप शेठ यांच्या हस्ते 'श्रीमद्‌भगवतगीतेची प्रस्थानत्रयी'चे ग्रंथलेखक ॲड. अविनाश चाफेकर यांना दांडेकर स्मृतिपुरस्कार प्रदान करण्यात आला. या वेळी आनंदिनी क्षीरसागर उपस्थित होत्या. तसेच निवड समिती सदस्य वर्षा गजेंद्रगडकर, प्रा. विजय कारेकर उपस्थित होते. ॲड. अविनाश चाफेकर व प्रा. डॉ. दिलीप शेठ यांची यथोचित भाषणे झाली.

**२१. दि १५ जुलै २०१८ :**

**रेखा ढोले स्मृतिपुरस्कार प्रदान व व्याख्यान सोहळा :**

'राजहंस' प्रकाशनाच्या विनया खडपेकर यांनी प्रास्ताविक केले. प्रवीण ढोले हे रेखा ढोले यांच्याविषयी बोलले. राहुल देशपांडे परीक्षक समितीतर्फे बोलले. मुखपृष्ठकार यशवंत देशमुख, अंतर्गत मांडणीकार शेखर डेरे, मानचिन्ह डिझाईनर रविमुकुल यांचे सत्कार झाले. पुरस्कार विजेते चंद्रकांत भोंजाळ यांना अध्यक्ष डॉ. सदानंद मोरे यांच्या हस्ते पुरस्कार देण्यात आल्यावर भोंजाळ यांनी मनोगत व्यक्त केले. 'इंद्रायणी साहित्या'च्या मुग्धा कोपर्डेकर यांनी मनोगत व्यक्त केले. डॉ. सदानंद मोरे यांनी अध्यक्षीय समारोप केला. 'राजहंस'चे दिलीप माजगावकर हे उपस्थित होते.

**२२. दि. १८ जुलै २०१८ :**

**लोकशाहीर अण्णा भाऊ साठे स्मृतिदिन :**

मसाप आणि दलित साहित्य परिषद संयुक्त विद्यमाने अण्णा भाऊ साठे लिखित 'सापळा', 'रक्ताचा टिळा', 'माझा रशियाचा प्रवास' मधील 'लाल ताऱ्याखाली' व 'कलेचं माहेरघर' या साहित्याचे अभिवाचन महाराष्ट्र कल्चरल सेंटरच्या हर्षल राजपाठक व सचिन जोशी यांनी प्रभावीपणे केले. दलित साहित्य परिषदेचे अध्यक्ष धर्मराज निमसरकर यांनी प्रास्ताविक केले. या वेळी महाराष्ट्र कल्चरल सेंटरचे प्रमोद काळे उपस्थित होते.

**२३. दि. २० जुलै २०१८ :**

**कै. वा. म. जोशी ७५ वा स्मतिदिन :**

महाराष्ट्र कल्चरल सेंटरचे सचिन जोशी व अपूर्व साठे यांनी वा. म. जोशी यांच्या 'स्मृती लहरी'मधील काही लेखांचे अभिवाचन केले. याप्रसंगी जुन्या दुर्मीळ ध्वनिमुद्रिकांचे संग्राहक संजय संत यांनी कै. वा. म. जोशी यांच्या आवाजातील महर्षी कर्वे यांच्या विषयीच्या ध्वनिमुद्रिकेतील भाषण उपस्थितांना ऐकवले. या वेळी राम कोल्हटकर उपस्थित होते.

**२४. दि. २४ जुलै २०१८ : एक कवयित्री एक कवी :**

या कार्यक्रमात स्पृहा जोशी व वैभव जोशी यांचे काव्य-सादरीकरण झाले. त्यांची मुलाखत उद्धव कानडे व ॲड. प्रमोद आडकर यांनी घेतली.

**२५. दि. २८ जुलै २०१८ :**

मसाप व अक्षरयात्री आयोजित पुणे विभागातून दहावी परीक्षेत मराठी भाषा विषयात प्रथम-द्वितीय क्रमांक मिळवलेल्या कु. योगिता मगर व कु. ऐश्वर्या म्हस्के यांचा सत्कार डॉ. न. म. जोशी यांच्या हस्ते झाला. अनुराधा मराठे यांनी प्रार्थना सादर केली. संजीवनी बोकिल, डॉ. अ. ल. देशमुख, सुप्रिया केळवकर उपस्थित होते. मगर व म्हस्के यांनी मनोगते व्यक्त केली. श्री. विक्रम हनुमंत मगर या पालकांनीही मनोगत व्यक्त केले.

**२६. दि. ४ ऑगस्ट २०१८ :**

ना. सी. फडके यांच्या १२५व्या जयंती वर्षानिमित्त 'केशराचा मळा' या पुस्तकाचे प्रकाशन (सुनिधी प्रकाशन) ज्येष्ठ व्यंगचित्रकार शि. द. फडणीस यांच्या हस्ते झाले. त्यांनी मनोगत



अनुक्रमणिका

व्यक्त केले. या पुस्तकातील लेखकांचा सन्मान करण्यात आला. अविनाश काळे, विलास पाटील, श्रीकांत देशपांडे, र. गो. वैद्य, विजय तरवडे यांचा सत्कार झाला. फडके कन्या गीतांजली जोशी यांची संकल्पना असलेला 'साहित्य गंगेच्या काठी' हा कार्यक्रम झाला. त्यात गीतांजली जोशी, संजय गोखले, दीपाली दातार, मुकुंद दातार या सहभागींचा सत्कार करण्यात आला.

**२७. दि. ७ ऑगस्ट २०१८ : मसाप गप्पा :**

या कार्यक्रमाअंतर्गत ज्येष्ठ पर्यावरणतज्ज्ञ व लेखक माधव गाडगीळ यांच्याशी वर्षा गजेंद्रगडकर यांनी संवाद साधला. या वेळी सुलोचना गाडगीळ यांचा सत्कार करण्यात आला. या वेळी डॉ. अरुणा ढेरे उपस्थित होत्या.

**२८. दि. १४ ऑगस्ट २०१८ :**

**कै. डॉ. गं. ना. जोगळेकर स्मृतिपुरस्कार समारंभ :**

प्रा. उषा तांबे यांना मा. विद्या बाळ यांच्या हस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आला. उज्ज्वला जोगळेकर, पराग जोगळेकर व कुटुंबीय उपस्थित होते. पराग जोगळेकर, प्रा. उषा तांबे, प्रा. मिलिंद जोशी, विद्या बाळ यांनी आपले विचार मांडले.

**२९. दि. २२ ऑगस्ट २०१८ :**

**विंदा करंदीकर जन्मशताब्दी सांगता समारंभ :**

अमेय गुप्ते संपादित 'विंदा विशेषांकाचे' प्रकाशन राजीव तांबे यांच्या हस्ते झाले. 'विंदां'च्या कवितांचे वेगळेपण या विषयावर राजन लाखे, 'विंदांचा अजबखाना' या विषयी राजीव तांबे यांची भाषणे झाली. 'विंदांच्या विरूपिका' या विषयावर दीपक करंदीकर यांनी प्रास्ताविक केले.

**३०. दि. ३ सप्टेंबर २०१८ : विद्यार्थ्यांची परिषदेला भेट :**

पुण्यातील विश्वकर्मा विद्यालय मराठी माध्यमिक आणि महाविद्यालयाचे ८ वी ते १२ वी पर्यंतचे सुमारे ६० विद्यार्थी व विद्यार्थिनींनी परिषदेला भेट दिली. परिषदेची वास्तू व कामकाज पद्धती समजावून घेतली. ॲड. प्रमोद आडकर यांनी कार्यवाह काय कार्य करतात ते सांगितले. प्रा. मिलिंद जोशी व कार्यवाह माधव राजगुरू यांची मुलाखत मराठी विषय समन्वयक शिक्षक एस. जे. ठोंबरे यांनी घेतली. काही विद्यार्थ्यांनी प्रश्न विचारले. आर. सी. बेटावदकर, प्रमोद नेमाडे व मराठी विषय समिती सदस्य दिनकर लोंढे, दीपाली पाटील व शिक्षक उपस्थित होते.

**३१. दि. ८ सप्टेंबर २०१८ : शिक्षक कविसंमेलन :**

पुणे माध्यमिक शिक्षक पतपेढी मर्यादित व मसाप यांच्या विद्यमाने शिक्षकांचे कविसंमेलन घेण्यात आले. प्रास्ताविक व स्वागत पतपेढीच्या अध्यक्षा डॉ. उज्ज्वला हातागळे यांनी केले. अध्यक्ष म्हणून ज्योत्स्ना सरदेशपांडे यांनी भाषण केले. समन्वयक कार्यवाह माधव राजगुरू व कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार, दीपक करंदीकर उपस्थित होते. कविसंमेलनाचे सूत्रसंचालन विजय लोंढे यांन केले. सुमारे ३० शिक्षक-शिक्षिका कवयित्रींनी कविता सादर केल्या.

**३२. दि. १० सप्टेंबर २०१८ : लेखक तुमच्या भेटीला :**

या उपक्रमांतर्गत पुण्यातील सेंट क्रिस्पीन्स होम कन्या शाळेच्या विद्यार्थिनीसमोर मीरा शिंदे व आश्लेषा महाजन यांनी कविता, धडे, कथा यांचे वाचन केले. विद्यार्थिनींनी धड्याविषयी प्रश्न विचारले. मुख्याध्यापिका माधवी सॅम्युअल, संगीता कदम, परिषदेचे माधव राजगुरू व दीपक करंदीकर उपस्थित होते.

**-प्रकाश पायगुडे,**
प्रमुख कार्यवाह, मसाप, पुणे.
(कार्यवृत्त नोंद : **दीपक करंदीकर,**
कार्यवाह, मसाप, पुणे.)

---

# म.सा.प. इतर शाखा कार्यवृत्त नोंद

## (१ जानेवारी २०१७ ते ३१ मार्च २०१८)

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा दामाजीनगर

**१. १८ फेब्रवारी २०१८ :**

खूप ओळखीची असणारी माणसं बऱ्याचदा अनोळखी असतात. अशा विविध क्षेत्रांत लक्षणीय काम करणाऱ्या व्यक्तींची- ओळखीचे अनोळखी- या सदरात मुलाखती घेण्यात आल्या. त्यात ॲड. नंदकुमार पवार (माजी सभापती), प्रकाश जडे (साहित्यिक), दिगंबर भगरे (पत्रकार), यतिराज वाकळे (नाट्य कलावंत), लहू ढगे (डिजिटल कलाकार) यांच्या मुलाखती बालाजी शिंदे, प्रा. दत्ता सरगर व सौ. दया वाकडे यांनी घेतल्या.

**२. २१ फेब्रुवारी २०१८ :**

दामाजीनगर शाखेच्या सदस्या डॉ. सौ. राजेश्वरी कोरे व सौ. उषा कोष्टी यांना जि. प.चा आदर्श शिक्षक पुरस्कार मिळाल्याबद्दल सत्कार करण्यात आला.

**३. २५ फेब्रुवारी २०१८ :**

मराठी राजभाषा दिनानिमित्त कवितालेखनाची कार्यशाळा घेण्यात आली. या कार्यशाळेत कवी रवी सोनार, प्रा. दत्ता सरगर, सचिन कुलकर्णी व प्रकाश जडे यांनी मार्गदर्शन केले. ४२ प्रशिक्षणार्थी या वेळी सहभागी झाले.

**४. २७ फेब्रुवारी २०१८ :**

मराठी राजभाषा दिनानिमित्त मराठीने आपले मराठीपण हरवले आहे का? या विषयावर जनार्दन नेने यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. या परिसंवादात सौ. रेखा जडे, सौ. दया वाकडे, प्रा. दत्ता सरगर, ॲड. रमेश जोशी, सौ. आशा पाटील, प्रा.

विश्वनाथ ढेपे हे सहभागी झाले होते.

**५. १ मार्च २०१८ :**

कवी प्रा. दत्ता सरगर यांच्या 'संसदच एकदा नांगरावी म्हणतो' या कवितासंग्रहाचे प्रकाशन ज्येष्ठ अभिनेत्री किशोरी शहाणे यांचे हस्ते करण्यात आले.

**६. ३ मार्च २०१८ :**

नागपूरचे कवी खेमराज भुयेर, संदीप राठोड व स्वाती बंगाळे यांच्या कवितावाचनाची व गप्पांची रंगतदार मैफिल झाली.

**७. ४ मार्च २०१८ :**

महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांच्या विभागीय सचिवपदी निवड झाल्याबद्दल कल्याणराव शिंदे व मसाप दामाजीनगरचे कार्याध्यक्ष यतिराज वाकळे यांची अखिल भारतीय मराठी नाट्य परिषदेच्या नियामक मंडळावर निवड झाल्याबद्दल त्यांचा सत्कार करण्यात आला.

**८. १० मार्च २०१८ :**

जागतिक महिला दिनानिमित्त स्त्री-पुरुष समानतेची संकल्पना कालबाह्य झाली आहे का? या विषयावर परिसंवाद झाला. सौ. अर्चना सलगर यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या या परिसंवादात सोनम इंगळे, सौ. दया वाकडे, प्रा. तेजस्विनी कदम, सौ. रेश्मा गुंगे, सौ. प्रेमलता नकाते, परवीन बागवान, डॉ. राजेश्वरी कोरे, सौ. अवंती पटवर्धन, सुरेखा नाडगौडा या सहभागी झाल्या. जि. प. सदस्या सौ. मंजुळा कोळेकर यांच्या हस्ते दीपप्रज्वलनाने परिसंवादाचे उद्घाटन झाले.

**९. २२ मार्च २०१८ :**

कवी हेमंत रत्नपारखी यांच्या 'वास्तव' या कवितासंग्रहाचे प्रकाशन डॉ. हेमंत हुईलगोळ (पुणे) यांचे हस्ते करण्यात आले.

**१०. ३० मार्च २०१८ :**

ज्येष्ठ नागरिक संघाच्या सहयोगाने स्त्री-पुरुष समानता शक्य आहे का? या विषयावर प्रकाशक जडे यांच्या अध्यक्षतेखाली परिसंवाद झाला. यात सौ. रेश्मा गुंगे, गोरक्ष जाधव, सौ. रेखा जडे, भिमाशंकर तोडकरी, सौ. हेमलता नकाते, ॲड. रमेश जोशी, सुरेखा नाडगौडा, श्रीधर भोसले आदि सहभागी झाले होते.

**११. १५ एप्रिल २०१८ :**

शाखेची वार्षिक सर्वसाधारण सभा १५ एप्रिल २०१८ रोजी ज्ञानदीप शिक्षण संकुलात झाली. वर्षभराचा कार्यवृत्तांत कार्याध्यक्ष यतिराज वाकळे व आर्थिक ताळेबंद कोषाध्यक्ष अशपाक काझी यांनी उपस्थित ७७ सभासदांसमोर सादर केला.

**१२. २२ एप्रिल २०१८ :**

कवयित्री सौ. संगीता मासाळ यांच्या 'ऊर्मी' या कवितासंग्रहाचे व 'आत्मगुंजन' या चारोळी संग्रहाचे प्रकाशन अनुक्रमे ज्येष्ठ कवी माधव पवार व नितीन चंदनशिवे यांच्या हस्ते व मसाप पुणेचे विभागीय सचिव कल्याण शिंदे, जि.प.च्या समाजकल्याण सभापती सौ. रजनी देशमुख, नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी, कवी विजय वडवेराव, प्रा. शिवाजी बागल, प्रा. डा. वामन जाधव, प्रा. विश्वनाथ ढेपे, डॉ. एम. आर. टकले यांच्या उपस्थितीत झाले.

**१३. २३ एप्रिल २०१८ :**

अक्षरज्योत पुरस्कार 'आत्मनाद' या कथासंग्रहास मिळाल्याबद्दल लेखिका सौ. आशा पाटील यांचा सत्कार करण्यात आला.

**१४.** संत दामाजी यात्रेत शाखेच्या सभासदांनी दिगंबर भगरे यांच्या दिग्दर्शनाखाली बहारदार गीते सादर केली. त्यात लक्ष्मी माने, शुभदा जोशी, अशपाक काझी, लहू ढगे, संगीता वासनिक, रेखा कांबळे, राजेंद्र जाधव आदी सहभागी झाले होते.

**१५.** साहित्यिक व सांस्कृतिक कार्यक्रमासाठी सभागृह उभारण्याविषयी नगराध्यक्षा सौ. अरुणा माळी यांना लेखी निवेदन दिले. त्यांनी असे सभागृह लवकरच उभारण्याचे आश्वासन दिले.

**१६.** नारायण घुलेलिखित 'झळा' या आत्मकथनात्मक ग्रामीण कादंबरीवर चर्चासत्र घेण्यात आले. प्रारंभी लेखक नारायण घुले यांची मुलाखत प्रा. राजेंद्र जाधव यांनी घेतली. त्यानंतर प्रकाश जडे यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या मुक्तचर्चेत भारत दत्तू, सौ. दया वाकडे, प्रा. विश्वनाथ ढेपे, सौ. हेमलता नकाते, प्रा. दत्ता सरगर आदी सहभागी झाले होते.

**१७.** या अहवाल काळात शाखेत माजी समाजकल्याणमंत्री प्रा. लक्ष्मणराव ढोबळे, गझलकार विजय वडवेराव (पुणे), अभिनेत्री शिवानी भोसले, निर्माते डॉ.नितीन तोष्णीवाल (सोलापूर), अभिनेत्री किशोरी शहाणे, हिंदी अभिनेते बॉबी वीज (मुंबई), कथाकार संजय कळमकर (अहमदनगर) यांनी भेटी दिल्या.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा इस्लामपूर

**१. रविवार दि. ११ मार्च २०१८ :**

रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद पुणे व इस्लामपूर शाखेच्या वतीने युवा साहित्य नाट्य संमेलनाचे आयोजन 'लोकनेते राजारामबापू पाटील नाट्यगृह इ. इस्लामपूर येथे संपन्न झाले. संमेलनाचे अध्यक्षस्थान डॉ. आशुतोष जावडेकर यांनी भूषविले होते. साहित्य संमेलनाचा समारोप प्रा. मिलिंद जोशी, श्री. प्रकाश पायगुडे, प्रा. शामराव पाटील (अण्णा) या मान्यवरांच्या उपस्थितीत संपन्न झाला. साहित्य संमेलनाचे आभार प्रा. दशरथ पाटील यांनी व्यक्त केले.

**२. शनिवार दि. ३१ मार्च २०१८ :**

रोजी मसाप शाखा इस्लामपूरच्या वतीने डॉ. विवेक देशपांडे यांचा २१ वा स्मृतिदिन महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. मिलिंद जोशी, पुणे यांच्या प्रमुख मार्गदर्शनाखाली संपन्न झाला. या कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान सांगली येथील लोकसाहित्यातील



अनुक्रमणिका

थोर विचारवंत डॉ. तारा भवाळकर यांनी भूषविले होते.

**दि. १८ जुलै २०१८ :** प्राचार्य शरद भोसले स्मृतिदिन : प्राचार्य शरद भोसले यांच्या स्मृतिदिनानिमित्त अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांचे 'समाज आणि साहित्य' या विषयावर व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले. अध्यक्षस्थानी प्रा. शामराव पाटील (अण्णा) यांनी भूषविले. या प्रसंगी प्रा. प्रदीप पाटील, प्रा. दशरथ पाटील उपस्थित होते.

**दि. १८ जुलै २०१८ :** 'हुंकार' काव्यसंग्रहाचे प्रकाशन : संमेलन अध्यक्ष मा. लक्ष्मीकांत देशमुख यांच्या हस्ते प्राध्यापिका शैलजा यादव-पाटील यांच्या 'हुंकार' या काव्यसंग्रहाचा प्रकाशन सोहळा संपन्न झाला. या प्रसंगी डॉ. दीपा देशपांडे, मा. प्रदीप यादव-पाटील, मा. दि. बा. पाटील, डॉ. दीपक स्वामी, प्रा.सुनील पाटील, सौ. वृषाली आफळे, डॉ. मंगल कोकाटे, डी. आर. सलगर उपस्थित होते.

**दि. २२ जुलै २०१८ :** मा. नवनाथ गोरे सत्कार समारंभ : साहित्य अकादमीचा युवा पुरस्कार प्राप्त झाल्याबद्दल मा. ॲड. बी. एस. पाटील यांचे हस्ते लेखक नवनाथ गोरे यांचा सत्कार करण्यात आला. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान प्रा. वैजनाथ महाजन यांनी भूषविले. या प्रसंगी प्रसिद्ध लेखक दि. बा. पाटील, प्रा. प्रदीप पाटील, प्रा. शामराव पाटील (अण्णा), प्रा. दशरथ पाटील, डॉ. दीपक स्वामी, सौ. वृषाली आफळे, कवयित्री नंदिनी पाटील, प्रा. एकनाथ पाटील, कवी सुरेश मोहिते, प्राचार्य अंकुश बेलवरकर इ. उपस्थित होते.

**दि. २६ ऑगस्ट २०१८ :** डॉ. शिवाजीराव घोरपडे स्मृतिदिन : डॉ. शिवाजीराव घोरपडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त डॉ. जगन्नाथ दीक्षित, लातूर यांचे 'विनासायास वेटलॉस व मधुमेह प्रतिबंध' या विषयावर राजारामबापू नाट्यगृहात व्याख्यानाचे आयोजन करण्यात आले. अध्यक्षस्थानी मा. जयंतरावजी पाटील (प्रदेशाध्यक्ष रा. काँ.) यांनी भूषविले. आभार डॉ. संजीव घोरपडे यांनी व्यक्त केले. सूत्रसंचालक सौ. वृषाली आफळे यांनी केले.

**दि. १५ एप्रिल २०१८ :** प्रा. डॉ. चंद्रकुमार नलगे यांना डॉ. डी. वाय. पाटील विद्यापीठ, मुंबई यांनी 'डी. लिट.' ही सन्मानाची पदवी मिळाल्याबद्दल इस्लामपूर शाखेच्या वतीने प्राचार्य विश्वास सायनाकर यांचे हस्ते सत्कार करण्यात आला.

**दि. ७ जून २०१८ :** वर्धापन दिन व प्रकट मुलाखत : प्राचार्य डॉ. दीपा देशपांडे यांची प्रकट मुलाखत सौ. वृषाली आफळे यांनी घेतली.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद – शाखा चाळीसगाव

**दि. २७ फेब्रुवारी २०१८ :** मराठी राजभाषा गौरव दिन : मराठी राजभाषा गौरव दिन म्हणून साजरा करण्यात आला. कार्यक्रमाचे अध्यक्षस्थानी म.सा.प. पुणे चे जळगाव जिल्हा प्रतिनिधी प्राचार्य तानसेन जगताप हे होते, तर प्रमुख वक्ते म्हणून प्रा. सुनील जवंजाळ, शाहीर शिवाजीराव पाटील, नगरदेवळा हे उपस्थित होते.

कार्यक्रमाच्या यशस्वितेसाठी कार्यवाह बी. एल. ठाकरे व प्रा. पी. एस. चव्हाण, उपाध्यक्ष ॲड. सुषमा पाटील व सर्व कार्य. सदस्य व विश्वस्त मंडळाने विशेष सहकार्य केले. म.सा.प. पुणे कार्यवाह हास्यकवी बंडा जोशी यांच्या प्रमुख उपस्थितीत हास्यकवी संमेलन आयोजन करण्यात आले होते.

**मंगळवार, दि. २६ जून २०१८ :** रोजी मथुराई अध्यापक विद्यालयात विश्वस्त मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुनीलजी राजपूत यांचे अध्यक्षतेखाली जिल्हा प्रतिनिधी, प्राचार्य तानसेन जगताप, नाट्य विभाग यांच्या उपस्थितीत संपन्न झाले.

**दि. २६ जून २०१८ :** रोजी म.सा.प. पुणेचे कार्यवाह बंडा जोशी यांनी शाखा कार्यालयास भेट दिली. या प्रसंगी कार्याध्यक्ष विजय पाटील यांनी त्यांचे स्वागत केले. या प्रसंगी संस्थापक अध्यक्ष प्राचार्य तानसेन जगताप, प्रमुख कार्यवाह गणेश आढाव, कार्यवाह प्रा. पी. एस. चव्हाण, उपाध्यक्ष प्रा. अशोक वाबळे, तसेच ज्येष्ठ कार्यकारी सदस्य अशोकबापू ब्राह्मणकर उपस्थित होते.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा – सोपाननगर (सासवड, जि. पुणे)

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या सोपाननगर (सासवड, जि. पुणे) शाखेने आयोजित केलेल्या निबंध स्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभ सोहळा मातोश्री जिजाई सोपानराव जाधव माध्यमिक विद्यालय, साकुर्डे, ता. पुरंदर येथे संपन्न झाला. म. सा. प.ने आयोजित केलेल्या निबंध स्पर्धेत माध्यमिक शाळेतील एकूण शंभर विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला होता. निबंधाचे परीक्षण प्रा. पांडुरंग शिरवळकर (सेवानिवृत्त मुख्याध्यापक), मा. सिद्राम भुजबळ (सेवानिवृत्त कृषी अधिकारी), सुरेश कोडीतकर (अध्यक्ष,

मसाप शाखा सोपाननगर), मा. मोहन साळवी (कोषाध्यक्ष, मसाप शाखा सोपाननगर) आणि मार्गदर्शन अॅड. कैलास वेल्हेकर यांनी केले. अपेक्षा शामराव सस्ते - प्रथम क्रमांक, प्रफुल्लचंद्र बनसोडे - द्वितीय क्रमांक, तृप्ती रणजित जगताप - तृतीय क्रमांक, समृद्धी अजित सस्ते - उत्तेजनार्थ, अक्षदा सुभाष सस्ते उत्तेजनार्थ, शुभम जालींदर गायकवाड - उत्तेजनार्थ बक्षिसे देण्यात आली. विजयी सर्व विद्यार्थ्यांना स्मृतिचिन्ह देऊन गौरविण्यात आले.

या कार्यक्रमासाठी विद्यालयाचे मुख्याध्यापक कामथे सर, मा. तानाजी झेंडे, मा. शिंदे सर व इतर सर्व शिक्षक, सहकारी यांनी विशेष सहकार्य केले. या कार्यक्रमास संस्थेचे विद्यमान संचालक माननीय शहाजी सस्ते उपस्थित होते.

**दि. २६ जून २०१८ :** रोजी प्रमुख वक्ते म्हणून डॉ. प्रकाश पवार, कोल्हापूर यांनी आपले शाहू महाराजांविषयी विचार मांडले. या कार्यक्रमाचे अध्यक्ष होते. मा. रावसाहेब पवार विभागीय कार्यवाह मसाप, पुणे), या कार्यक्रमामध्ये डॉ. विलास आढाव, डॉ. लोखंडे, प्राचार्य डॉ. घोरपडे यांनीही विचार व्यक्त केले.

**दि. २७ जून २०१८ :** रोजी 'महात्मा जोतिबा फुले यांचे विचार' याविषयी व्याख्यान आयोजित करण्यात आले. याकरिता व्याख्याते म्हणून सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ येथील फुले अध्यापन प्रमुख डॉ. विश्वनाथ शिंदे यांना बोलविण्यात आले होते. या कार्यक्रमाचे अध्यक्ष होते सुरेश कोडीतकर.

**दि. २८/६/२०१८ :** डॉ. बाबासाहेब आंबेडकर विचार साहित्य परिषद आयोजित करण्यात आली. प्रमुख वक्ते होते डॉ. मिलिंद कसबे. या कार्यक्रमाचे अध्यक्ष म्हणून डॉ. नितीन घोरपडे (प्राचार्य वाघिरे महाविद्यालय, सासवड) उपस्थित होते.

**९ फेब्रुवारी २०१७ :** सोपाननगर शाखेची स्थापना आणि मान्यता. एकूण सभासद संख्या नोंदणी ९८.

**१४ डिसेंबर २०१७ :** महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोपाननगर आणि वाघिरे महाविद्यालय, सासवड, ता. पुरंदर यांच्यामध्ये शैक्षणिक गुणवत्ता आणि सहकार्य यासाठी सामंजस्य करार करण्यात आला. करार करताना डॉ. नितीन घोरपडे (प्राचार्य), सुरेश कोडीतकर (अध्यक्ष, मसाप शाखा सोपाननगर), रावसाहेब पवार (जिल्हा प्रतिनिधी, मसाप, पुणे) हे उपस्थित होते. या कार्यक्रमाला बडोदा साहित्य संमेलनाचे संमेलनाध्यक्ष मा. लक्ष्मीकांत देशमुख उपस्थित होते.

**१५ डिसेंबर २०१७ :** वाघिरे महाविद्यालय सासवड आणि महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा सोपाननगर यांच्या संयुक्त विद्यमाने एक कविसंमेलन आयोजित करण्यात आले. कार्यक्रमाचे अध्यक्ष होते कवी प्रकाश घोडके. या कार्यक्रमात कवी हनुमंत चांदगुडे, राजेंद्र सोनवणे, अरुण चिंचकर आणि महाविद्यालयीन विद्यार्थी यांनी विविध विषयावरील कविता सादर केल्या.

**२१ जानेवारी २०१८ :** मसाप शाखा सोपाननगर यांच्या विद्यमाने सुरेश कोडीतकर लिखित 'ज्ञानेश्वरी एक समाज प्रबोधन', 'चाणक्य नीती' आणि सौ. भारती कोडीतकर लिखित 'आकांक्षा' या पुस्तकांचे प्रकाशन करण्यात आले. या कार्यक्रमासाठी व्याख्याते म्हणून डॉ. रामचंद्र देखणे हे उपस्थित होते. या कार्यक्रमाचे सूत्रसंचालक होते डॉ. नानासो पवार.

**२४ फेब्रुवारी २०१८ :** जिजाऊ जाधव माध्यमिक विद्यालय साकुर्डे येथे निबंध स्पर्धा आयोजित करण्यात आली. निबंध स्पर्धेत एकूण ८८ विद्यार्थ्यांनी सहभाग घेतला. या कार्यक्रमासाठी कामथे सर (मुख्या.) तानाजी झेंडे सर, शिंदे सर यांनी विशेष परिश्रम घेतले.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा डोंबिवली

मसाप शाखा अद्ययावतीकरणासाठी सुरेश देशपांडे यांनी डोंबिवली, कल्याण, अंबरनाथ, बदलापूर, टिटवाळा, भिवंडी, वासिंद, किन्हली, उल्हासनगर, विक्रमगड, शहापूर आणि ठाणे इथे भेटी देऊन पाहणी केली.

**दि. २० मे २०१८ :** रोजी अरविंद गोखले यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने स्त्री-कथाकथनकारांच्या कथाकथनाचा कार्यक्रम आयोजित केला होता. कार्यक्रमाचे अध्यक्ष श्री. वामराव देशपांडे यांनी गोखले यांच्या आठवणी जागवल्या.

मसाप कार्याध्यक्ष सुरेश देशपांडे यांनी प्रास्ताविक केले, आनंद गोसावी यांनी आभार मानले; तर प्रज्ञा जोशी यांनी सूत्रसंचालन केले. महेश देशपांडे आणि गीता नवरे यांचे सहकार्य लाभले.

**दि. १८ मार्च २०१८ :** गुढीपाडवा शोभायात्रेत मसाप डोंबिवली शाखेच्या वतीने महेश देशपांडे, वृंदा कौजलगीकर, धनश्री साने, आनंद गोसावी, गीता नवरे, प्रज्ञा जोशी, आणि दीपाली काळे हे शोभायात्रेत सहभागी झाले.

**दि. २१ जानेवारी २०१८ :** लेखिका उमा आवटे-पुजारी यांच्या 'जीवनसे भरी तेरी आँखे' या व्यक्तिचित्रणात्मक पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाचे आयोजन. या पुस्तकाचे प्रकाशन ज्येष्ठ अभिनेते आणि उत्तम वक्ते अविनाश नारकर यांच्या हस्ते आणि कथाकार स्वाती चांदोरकर यांच्या उपस्थितीत झाले.

महाराष्ट्र साहित्य परिषद, डोंबिवली शाखेतर्फे नुकताच व्याख्यात्या धनश्री लेले आणि प्रसाद भिडे यांचा 'शाकुंतल' रसस्वाद नाट्य हा अतिशय आगळावेगळा प्रयोग आयोजित करण्यात आला होता. श्री. सुरेश देशपांडे यांनी या कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले तर महेश देशपांडे यांनी आभार मानले. वृंदा कौजलगीकर यांनी सूत्रसंचालन केले.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा उत्तर सोलापूर

**१. फेब्रुवारी २०१८ सत्कार समारंभ :** मसाप, पुणे उ. सोलापूर शाखा व महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने महाराष्ट्र शासनातर्फे देण्यात आलेल्या राज्यस्तरीय आदर्श शिक्षक पुरस्कारप्राप्त सौ. सरस्वती संभाजी पवार व त्यांच्या भगिनी भोसले यांचा व ज. रा. चंडक प्रशालेचे क्रीडा शिक्षक श्री. गुरव सर यांची जिल्हा क्रीडाध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल सत्कार ज. रा. चंडक प्रशालेच्या प्रांगणात प्रशालेचे मुख्यापक घोडके एम. आर. व इंदिरा प्रशालेच्या मुख्याध्यापिका सौ. सावंत आर. जी. व मसापचे पदाधिकारी यांच्या हस्ते करण्यात आला.

**२. दि. १३ मे २०१८ :** रोजी मसाप, पुणे शाखा उ. सोलापूर व महाराष्ट्र शिक्षण प्रसारक मंडळ, बाळे यांच्या संयुक्त विद्यमाने १३ मे १९३०च्या मार्शल लॉ च्या व सोलापूरची स्वातंत्र्य चळवळ या घटनेच्या स्मृती जागृत ठेवण्यासाठी मसाप उ.सोलापूर शाखेच्या वतीने विविध कार्यक्रमांचे आयोजन केले होते.

**३. दि. २७ जुलै २०१८ :** तुळशीदास नगर, बाळे येथे मसाप, पुणे शाखा उ. सोलापूर यांच्या वतीने ज. रा. चंडक प्रशाला, बाळे येथे गुरुपौर्णिमा मोठ्या उत्साहात व भक्तिमय वातावरणात साजरी करण्यात आली. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी निर्मलाताई ठोकळ या होत्या. प्रमुख पाहुणे म्हणून ह.भ.प. सुधाकर महाराज इंगळे, नागनाथ पाटील महाराज होते. प्रारंभी स्व. तुळशीदासजी जाधव, क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले व व्यासांच्या प्रतिमेचे पूजन मान्यवरांच्या हस्ते करण्यात आले.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा नाशिकरोड

**१. गुरुवार दि. ८ मार्च २०१८ :** जागतिक महिला दिनादिवशी 'मी द्रौपदी बोलतेय'- अ‍ॅड. प्रेरणा देशपांडे यांचे व्याख्यान ऋतुरंग सभागृह, दत्त मंदिर चौक येथे झाले.

**२. १ मे २०१८ :** प्रकट मुलाखत : मृणाल कुलकर्णी, मुंबई यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली.

**३. दि. २ मे २०१८ :** रंग अक्षरांचे- निमंत्रितांचे कविसंमेलन : कवी श्री. रवींद्र मालुंजकर, श्री. प्रशांत केंदळे, श्री. मिलिंद गांधी, श्री. गौरवकुमार आठवले, श्री. मनोहर विभांडिक.

**४. ३ मे २०१८ :** प्रा. मिलिंद जोशी पुणे यांचे 'अत्रे व देशपांडे विनोदाची दोन शिखरे' या विषयावर व्याख्यान झाले.

**५. ४ मे २०१८ :** श्री. बाबा भांड, औरंगाबाद यांचे 'सयाजीराव गायकवाड- नवभारताचे निर्माते' या विषयावर व्याख्यान झाले.

**६. ५ मे २०१८ :** डॉ. स्वागत तोडकर, कोल्हापूर यांचे 'घरगुती उपचार' या विषयावर व्याख्यान झाले.

**७. ६ मे २०१८ :** मा. न्या. श्री. शशिकांत सावळे, मुंबई यांचे 'विश्वस्त संस्था आणि सामाजिक संस्कृतीकरण' या विषयावर व्याख्यान झाले.

**८. ७ मे २०१८ :** श्री. मंगेश पंचाक्षरी, नाशिक यांचे 'राशींचे स्वभाव- तुमची रास, तुमचा स्वभाव' हे व्याख्यान झाले.

**९. दि. ८ मे २०१८ :** डॉ. संतोष खेडलेकर, संगमनेर यांचे 'तमाशा - काल, आज आणि उद्या' या विषयावर व्याख्यान झाले.

**१०. दि. ९ मे २०१८ :** श्रीमती गीता माळी, नाशिक यांचे 'गीतगंगा- हिंदी, मराठी सुरेल गीते' या विषयावर व्याख्यान झाले.

**११. दि. १० मे २०१८ :** डॉ. पंकज वाजपेयी, डॉ. भाऊसाहेब मोरे, डॉ. भूपेश परते, नाशिक 'मृत्यूनंतरचे जीवन' या विषयावर व्याख्यान झाले.

**१२. गुरुवार दि. ३ मे २०१८ :** पुस्तक प्रकाशन : 'कंगोरे मनाचे' या पुस्तकाचे प्रकाशन मसाप, पुणेचे कार्याध्यक्ष प्रा. मिलिंद जोशी यांच्या शुभहस्ते नाशिकरोड येथे झाले.

**१३. शनिवार दि. १९ मे २०१८ :** ११ पुष्प : प्रसिद्ध लेखक, कवी डॉ. श्रीकांत तारे यांनी मसाप शाखा नाशिकरोड आयोजित संवाद सृजनाशी.

**१४. दि. २४ मार्च २०१८ : संवाद सृजनाशी ९ वे पुष्प :** श्रीमती शैलजा चाफळकर. या वेळी ज्येष्ठ कवयित्री अरुणाताई कुलकर्णी, ब्लॉगर तन्वी अमित, डॉ. सहस्रबुद्धे, श्री. चाफळकर, शाखेचे कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कोषाध्यक्ष सुदाम सातभाई आदी उपस्थित होते.

**१५. शनिवार दि. २४ मार्च २०१८ :** संवाद सृजनाशी, १० वे पुष्प : श्रीमती स्वाती पाचपांडे.

**१६. शनिवार दि. २३ जून २०१८ :** संवाद सृजनाशी : पुष्प १२वे, श्री. राजू फिरके. या वेळी कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कार्यवाह रवींद्र मालुंजकर, कार्यकारणी सदस्य दशरथ लोखंडे, सुरेखा गणोरे, अरुण गिते, मंगेश कदम, राजेश जाधव, रफिक सय्यद, राजेश भालेराव, ललित कुलकर्णी आदी उपस्थित होते.

**१७. शनिवार दि. २९ जुलै २०१८ :** संवाद सृजनाशी : पुष्प १३ वे संदीप देशपांडे.

या वेळी कार्याध्यक्ष उन्मेष गायधनी, कार्यकारिणी सदस्य प्रशांत केंदळे, दशरथ लोखंडे, शिवाजी म्हस्के, सुजाता हिंगे, ज्येष्ठ साहित्यिक अरुणाताई कुलकर्णी, वास्तुविशारद रवी पारुंडेकर, डॉ. सहस्रबुद्धे, देवीदास खडताळे, गणपतराव मुठाळ आदी उपस्थित होते.

**१८. शनिवार दि. १७ मार्च २०१८ :** बडोदा एक अनुभव : डॉ. माधवी मुठाळ. कार्यक्रमाचे विशेष अतिथी श्री. जाधवांनी आपल्या अनुभवाचे कथन केले.

बडोदा साहित्य संमेलनातील कवी कट्ट्यात सहभागी झालेले नाशिककर संयुक्ता कुलकर्णी, मनिषा परदेशी आणि मुकुंद बेणी यांनी त्यांचे अनुभव सांगितले.



अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जामखेड

महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जामखेड व जाणीव नातं मुलांशी, जामखेड अंतर्गत 'वाचनापासून वाचनालयाकडे' या उपक्रमाची सुरुवात झाली.

वाचनापासून वाचनालयाकडे हा उपक्रम संयुक्तरीत्या राबविला जातो. मुलाला नुसतं वाचता येऊन उपयोग होणार नाही, तर वाचन विकासाची संधी त्याला उपलब्ध करून द्यावी लागेल; जेणेकरून तो वाचेल. काय वाचलं ते स्वतःच्या भाषेत लिहील, व्यक्त होईल, मुलांचं व्यक्त होणंच महत्त्वाचं आहे. मूल बोलकं झालं पाहिजे. या जाणिवेतून वाचनापासून वाचनालयाकडे या उपक्रमाची सुरुवात झाली.

त्यासाठी सुनील घायाळ, एच. यु. गुगळे सहकारी पतसंस्था, वाकीकर परिवार, विनायक भोंजाळ, मिठूलाल नवलाखा, संजय देशपांडे यांनी जवळपास १०० मुलांच्या वर्षभराची वर्गणीची रक्कम भरून दत्तक वाचक पालकत्व स्वीकारले.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा – पश्चिम सोलापूर (मनोरमा) शाखा

**दि. १४ जून २०१८ :** 'गंध मातीचा' कार्यक्रम उद्घाटन सोहळा : मसाप शाखा पश्चिम (मनोरमा) शाखा सोलापूर चे अध्यक्ष श्रीकांतजी मोरे, ज्येष्ठ साहित्यिक द. ता. भोसले यांच्या प्रमुख उपस्थितीत 'अस्मिता व्हीजन चॅनेल नं. १२१' या टी. व्ही. वाहिनीवर 'गंध मातीचा' या कार्यक्रमाचे उद्घाटन झाले.

**दि. २३ सप्टेंबर २०१७ :** या दिवशी शाखेच्या सर्व कार्यकारिणीची मिटिंग बोलावण्यात आली. सदर मिटिंगमध्ये सोलापूर शहरातील नवोदित साहित्यिक व कवींना आमंत्रित करून मनोरमा साहित्य पुरस्कार २०१७ कार्यक्रमासंदर्भात माहिती दिली.

**दि. १० ऑक्टोबर २०१७ :** या दिवशी दि. २५ डिसेंबर २०१७ रोजी पार पडणाऱ्या साहित्य पुरस्कारासाठी प्राप्त झालेल्या साहित्यामधून योग्य साहित्यिकांची पुरस्कारासाठी निवड करण्यासंदर्भात चर्चा करण्यात आली.

**दि. २५ डिसेंबर २०१८ :** पुरस्कार वितरण सोहळा : या कार्यक्रमामध्ये अनेक मान्यवर सहित्यिकांना पुरस्कार देण्यात आले – मनोरमा जीवन पुरस्कार २०१७, मनोरमा साहित्य पुरस्कार २०१७. या कार्यक्रमास ज्येष्ठ साहित्यिक द. ता. भोसले हे अध्यक्ष म्हणून उपस्थित होते. तसेच सोलापूर पोलिस आयुक्त मा. महादेव तांबडे यांच्या शुभहस्ते पुरस्कार प्रदान करण्यात आले. या कार्यक्रमास दै. 'लोकमत'चे संपादक राजा माने व मसाप पुणे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे यांची प्रमुख उपस्थिती लाभली.

**दि. १६ जानेवारी २०१८ :** ९१ व्या अखिल भारतीय साहित्य संमेलनाचे अध्यक्ष लक्ष्मीकांत देशमुख यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली. सदर मुलाखत पुणे येथील प्रा. रूपाली शिंदे यांनी घेतली.

**दि. २४ जानेवारी २०१८ :** रथसप्तमीनिमित्त महिलांचा हळदी-कुंकू कार्यक्रम : सोलापूर शहरातील तसेच विजापूर रोड परिसरातील साहित्यिक महिलांचा हळदी-कुंकू कार्यक्रम आयोजित करण्यात आला. सदर कार्यक्रम शाखेच्या उपाध्यक्षा सौ. शोभा मोरे व कार्याध्यक्षा सौ. अस्मिता गायकवाड यांच्या उपस्थितीत पार पडला.

**दि. २७ फेब्रुवारी २०१८ :** मराठी भाषा गौरव दिन : या कार्यक्रमात रंगपंचमीनिमित्त रंगावर आधारित स्वरचित कवितांचे वाचन करण्यात आले. या काव्यमैफलीत शाखेचे अध्यक्ष श्रीकांतजी मोरे, शाखेच्या उपाध्यक्षा सौ. अस्मिता गायकवाड, तसेच श्री. राजेंद्र भोसले, सौ. प्रांजली मोहिकर, सौ. शोभना सागर, कालिदास चवडेकर, पोपट माळी यांनी कविता सादर केल्या.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा भोसरी

पुस्तक प्रकाशन सोहळा डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या शुभहस्ते झाला. या वेळी प्रा. मिलिंद जोशी, ह. भ.प. नारायण महाराज जाधव, गिरीश प्रभुणे, चंद्रकांत वानखेडे, उद्धव कानडे, शाखेचे अध्यक्ष मुरलीधर साठे, पुरुषोत्तम सदाफुले, मुकुंद आवटे, अरुण इंगळे, डॉ. रोहिदास आल्हाट, प्रा. शंकर देवरे, बाळासाहेब ढमे, जयवंत भोसले, डॉ. शंकर गायकवाड उपस्थित होते. सूत्रसंचालन भरत दौंडकर यांनी केले.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा भोर

**दि. २३ व २४ डिसेंबर २०१७ :** रोजी छ. शिवाजी विद्यालय व ज्युनिअर कॉलेजच्या प्रांगणात 'तिसरे फुले-शाहू- आंबेडकर विचार प्रसार साहित्य संमेलन' संपन्न झाले. स्व. लोकनेते यशवंतराव चव्हाण साहित्य नगरीमध्ये स्वागताध्यक्ष आमदार मा. संग्रामदादा थोपटे यांच्या हस्ते संमेलनध्वजाचे ध्वजारोहण झाले.

**दि. २४ डिसेंबर २०१७ :** रोजी माजी केंद्रीय गृहमंत्री सुशीलकुमार शिंदे यांच्या हस्ते संमेलनाचे उद्घाटन करण्यात आले.



अनुक्रमणिका

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा जुळे सोलापूर

**१. २९ मार्च २०१८ :** महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर आणि डॉ. रायते परिवार, सोलापूर यांचे संयुक्त विद्यमाने दिला जाणारा 'स्व. श्रीनिवास विष्णू रायते गुरुजी बालसाहित्यिक पुरस्कार २०१८' यंदा जळगाव येथील महसूल विभागात प्रशासकीय अधिकारी असलेले बालसाहित्यिक मा. आबा गोविंदा महाजन यांना देण्यात आला. कार्यक्रमाचे अध्यक्ष आकाशवाणी सोलापूरचे साहाय्यक संचालक मा. सुनील शिनखेडे होते. मसाप पुणेचे कार्यवाह आणि ज्येष्ठ हास्यकवी मा. बंडा जोशी यांचे शुभहस्ते आणि औरंगाबादच्या ज्येष्ठ कवयित्री मा. सौ. रंजन कंधारकर यांचे प्रमुख उपस्थितीत हा पुरस्कार प्रदान करण्यात आला.

**२. दि. ५ मे २०१८ :** महाराष्ट्र साहित्य परिषद शाखा जुळे सोलापूर आणि जोशी परिवार सोलापूर संयुक्त विद्यमाने दिला जाणारा 'स्व. श्रीनिवास जोशी गुरुजी आदर्श शिक्षक पुरस्कार' २०१८' यंदा भंडारकवठे गावातील सेवानिवृत्त शिक्षक मा. आण्णाराव चंद्रशेखर पाटील यांना इंडियन मॉडेल स्कूलचे संस्थापक प्रा. ए. डी. जोशी यांचे अध्यक्षतेखाली, आकाशवाणी सोलापूर साहाय्यक संचालक, मा. सुनील शिनखेडे यांचे शुभहस्ते प्रदान करण्यात आला.

**३. दि. १० जून २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर आयोजित 'स्व. रामनिवासजी शुभकरणजी फोफालिया स्मरणार्थ' आयोजित 'राज्यस्तरीय दिवाळी अंक स्पर्धा २०१७'चा पुरस्कार वितरण सोहळा सोलापूर विद्यापीठातील पुरातत्त्व विभागाच्या प्रमुख मा. डॉ. सौ. माया पाटील यांचे शुभहस्ते आणि ज्येष्ठ समाजसेवक मा. श्री. ब्रिजमोहन फोफालिया यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाला. या कार्यक्रमाचे प्रास्ताविक श्री. पद्माकर कुलकर्णी यांनी, स्वागत सौ. सायली जोशी यांनी, सूत्रसंचालन अमित कामतकर, आभार प्रदर्शन गिरीश दुनाखे यांनी केले.

**४. दि. २४ जून २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर आणि प्रिसिजन फाउंडेशन सोलापूर आयोजित 'स्व. दत्ता हलसगीकर ज्येष्ठ साहित्यिक पुरस्कार २०१८' हा यंदा साहित्यिक पत्रकार व क्रीडा समीक्षक असलेले मा. द्वारकानाथ संझगिरी, मुंबई यांना ज्येष्ठ पत्रकार व स्तंभलेखक मा. भाऊ तोरसेकर यांचे शुभहस्ते आणि सोलापूर विद्यापीठाच्या नूतन कुलगुरू मा. डॉ. मृणालिनी फडणवीस यांचे अध्यक्षतेखाली संपन्न झाला.

**५. दि. १० जुलै २०१८ :** मसाप, पुणे यांनी मसाप जुळे सोलापूर शाखेला ज्येष्ठ कथाकार जी. ए. कुलकर्णी यांच्या ९५व्या जयंतीनिमित्त 'जी.एं.च्या रमलखुणा' लेखक विजय पाडळकर लिखित पुस्तकाचे प्रकाशन मा. प्रा. मिलिंद जोशी, कार्याध्यक्ष, मसाप पुणे यांच्या अध्यक्षतेखाली, मा. प्रा. डॉ. सुहास पुजारी, अध्यक्ष मसाप सोलापूर शाखा यांचे शुभहस्ते आणि जी. ए. कुलकर्णी यांच्या भगिनी मा. नंदा पैठणकर व ज्येष्ठ रंगकर्मी मा. शशिकांत लावणीस यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झाले.

**६. दि. १४ जुलै २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर आणि आनंदश्री प्रतिष्ठान, सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने कवी कालिदास जयंतीच्या निमित्ताने 'आनंदश्री' या डॉ. वासुदेव रायते यांच्या बंगल्यातील सभागृहात संध्या. ६ वाजता निसर्ग कविता वाचनाचा कार्यक्रम आयोजित केला.

**७. दि. २३ जुलै २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर आणि श्री व्यंकटेश संगीत विद्यालय, जुळे सोलापूर आयोजित 'दीनांची माउली' हा आषाढी एकादशीच्या निमित्ताने पूर्वसंध्येला हिराचंद नेमचंद वाचनालयाच्या ॲम्फीथिएटरमध्ये भक्तिगीत, अभंग यांची मैफल आयोजित केली होती.

**८. दि. २७ जुलै २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर आणि वसुंधरा कॉलेज, जुळे सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने कवी कालिदास जयंतीचे औचित्य साधून पाऊस कविता आणि निसर्ग कवितांचा कार्यक्रम आयोजित केला होता.

**९. दि. २९ जुलै २०१८ :** मसाप शाखा जुळे सोलापूर व नरेंद्र काळे मित्र परिवार यांच्या संयुक्त विद्यमाने कवी गोविंद काळे लिखित 'बापाचा बाप' या चरित्र पुस्तकाचा प्रकाशन समारंभ मा. ना. विजयकुमार देशमुख (पालकमंत्री) यांचे अध्यक्षतेखाली ज्येष्ठ पत्रकार व स्तंभलेखक मा. श्री. भाऊ तोरसेकर यांचे शुभहस्ते तर ज्येष्ठ कवी मा. हेमकिरण पत्की यांच्या प्रमुख उपस्थितीत संपन्न झाला. व्यासपीठावर पद्माकर कुलकर्णी, नरेंद्र काळे, गोविंद काळे, प्रकाशक लक्ष्मीनारायण बोधूल, बेंबळेगावच्या सरपंच सौ. कल्पना भोसले आदी उपस्थित होते.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, मावळ शाखा

१. कै. राम गणेश गडकरी यांच्या जन्मदिनानिमित्त त्यांच्या नाट्यकृती व नाट्यगीतांवर आधारित कार्यक्रमाचे आयोजन.

२. मसाप, मावळ शाखेच्या वतीने 'काव्यप्रतिभेत रंगला पुस्तक प्रकाशन सोहळा' याचे आयोजन करण्यात आले.

३. लेखक कवी श्रीकृष्ण पुरंदरे व कवी सतीश साठे यांच्या बहारीन व बाली यांच्या परदेशी प्रवासवर्णन कथनाच्या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले.

४. लेखक आपल्या भेटीला : बी.जे.एस. कॉलेज वाघोली व पिंपरी येथे 'लेखक आपल्या भेटीला' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले होते.

५. विविध शाळांना भेटी : विविध शाळांना शुभेच्छा भेटीचे आयोजन करण्यात आलेले होते. स्वामी विवेकानंद स्कूल, तळेगाव दाभाडे अंदर मावळ, नाणे मावळ व पवन मावळातील विविध माध्यमिक शाळांना भेटी देण्यात आल्या. मराठी भाषेच्या विकासाकरिता या शाळेत विविध कार्यक्रमांचे आयोजन करण्यात येणार आहे.

६. मराठी भाषा व गौरव दिनानिमित्त कार्यक्रम : कवी व लेखक सुरेश अत्रे यांनी 'ज्ञानपीठ' पुरस्कारप्राप्त विष्णु वामन शिरवाडकर अर्थात कुसुमाग्रज यांच्या जन्मदिनानिमित्त त्यांच्या साहित्यकृतीवर प्रकाश टाकणाऱ्या कार्यक्रमाचे आयोजन केले. त्यात कवी अत्रे यांनी अक्षर 'बाग', 'किनारा', 'चाफा', 'विशाखा' व 'स्वगत' या काव्यसंग्रहातील निवडक कवितांचे वाचन केले.

७. डॉ.प्रमोद बोराडे : 'छ. संभाजीराजे' विषयावर व्याख्यान.

८. मसाप, मावळ शाखेतर्फे 'दहावी परीक्षेला कसे सामोरे जावे' व 'करिअर मार्गदर्शन' या विषयावर करिअर मार्गदर्शक मसाप, मावळचे कार्यवाह प्रा.दीपक विचे यांचे मार्गदर्शन वर्ग आयोजित करण्यात आला होता.

९. ग्रामीण कथा अभिवाचन कार्यक्रम : गिरीश जोशी यांची 'फॅमिली बिझनेस' ही एकांकिका सादर करताना श्रीकृष्ण पुरंदरे, हर्षल आल्पे व विराज सवाई यांनी सर्व श्रोत्यांना खुर्चीला खिळवून टाकले. 'वारी' व 'इलायती कोंबडी' (व्यंकटेश माडगूळकर) 'एका गारुड्याचे मरण' (द.मा. मिरासदार) या तीन कथा श्रीकृष्ण पुरंदरे, हर्षल आल्पे व विराज सवाई यांनी सादर केल्या.

१०. नि:शुल्क कथालेखन तंत्र व मंत्र कार्यशाळा : प्रा. जयंत जोर्वेकर यांनी मार्गदर्शन केले.

११. अभिवाचन पुलंना मुजरा : महाराष्ट्राचं लाडकं साहित्यिक पु.ल. देशपांडे यांचे जन्मशताब्दी वर्ष सुरू होत आहे. त्यानिमित्ताने मसाप, मावळ शाखेच्या वतीने त्यांना मानाचा मुजरा अर्पण करण्यात आला. 'वखरपूरचा हुकूमनामा' हे वगनाट्य, दिग्दर्शक आणि कलावंत, 'कामचुकार' व 'श्रीयुत खादाड' ह्या साहित्यांचे वाचन हर्षल आल्पे, देवीदास वझे व श्रीकृष्ण पुरंदरे यांनी केले.

१२. पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर जयंती कार्यक्रम : मसाप, मावळ शाखेच्या वतीने भोसरी येथील अहिल्यादेवी सोशल फाउंडेशनकरिता मसाप कार्यवाह प्रा. दीपक बिचे यांचे वतीने 'पुण्यश्लोक अहिल्यादेवी' या विषयावर जयंतीच्या निमित्ताने व्याख्यान आयोजित केलेले होते.

१३. आनंदी कसे जगावे या विषयावरील कार्यशाळा : राष्ट्रीय कला अकादमी, पुणे या संस्थेच्या वतीने 'आनंदी कसे जगावे' विषयावरील कार्यशाळेचे आयोजन.

१४. जर्मनी, फ्रान्स देशातील साहित्याचा तुलनात्मक अभ्यास व युरोपियन अनुभव कथन : आदिती दीपक विचे. शेजार ज्येष्ठ नागरिक संघ व महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या वतीने तुलनात्मक साहित्याचा अभ्यास व युरोपातील अनुभव कथन या विषयावरील संवाद आयोजित केला होता.

१५. मसाप मावळ शाखेची वार्षिक सभा २२ जुलै २०१८ रोजी संपन्न झाली.

१६. गुरुपौर्णिमा : व्यासपौर्णिमेचे औचित्य साधून संस्थेचे अध्यक्ष सुरेश अत्रे यांच्या हस्ते व्यासांच्या प्रतिमेचे पूजन करण्यात आले. संस्थेचे अध्यक्ष सुरेश अत्रे यांनी व्यास पौर्णिमेचे पौराणिक, ऐतिहासिक व आधुनिक काळातील महत्त्व विशद केले. मराठी भाषेतील महत्त्वाच्या ग्रंथाचे पूजन या निमित्ताने करण्यात आले.

१७. निवडक साहित्याचे वाचन : गदिमा, सुधीर फडके व पु.ल. देशपांडे यांच्या जन्मशताब्दीनिमित्ताने त्यांच्या साहित्याचे वाचन व त्यांच्या कार्यकर्तृत्वाची माहिती सुरेश अत्रे, दत्ता मेढी, श्रीकृष्ण पुरंदरे यांनी दिली.

१९. मसाप, मावळा शाखेचा वर्धापन दिन : शाखेचा १० वा वर्धापन दिन मोठ्या उत्साहाने साजरा झाला. या वेळी मसाप, पुणेच्या कोषाध्यक्ष सुनीताराजे पवार व चाळकवाडी मसाप शाखेचे शिवाजीराव चाळक उपस्थित होते.

२०. पुस्तक प्रकाशन सोहळा : मसाप, मावळ शाखेचे सहसचिव श्रीकृष्ण पुरंदरे लिखित 'खिचडी' व 'अंदाज' या ललित व कथासंग्रहांचे प्रकाशन प्रसिद्ध कवी व लेखक प्रवीण दवणे व कोषाध्यक्षा सुनीताराजे पवार यांच्या उपस्थितीत संपन्न झाला.

२१. कवी लेखक प्रवीण दवणे यांचा कार्यक्रम : कुणीतरी वाट बघतंय प्राणांतून : या प्रेमकवितेच्या निरूपणाचा कार्यक्रम.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा चांडोली बु।।

**दि. ११ मार्च २०१८ :** विनोदी कविता आणि विडंबन गीतांचा 'हास्यमैफल' कार्यक्रम : या कार्यक्रमात हास्यकवी व एकपात्री कलाकार श्री. बंडा जोशी, श्री. भालचंद्र कोळपकर आणि श्री. अनिल दीक्षित यांनी बहारदार रचना सादर करून रसिक श्रोत्यांना हास्यरसात डुंबवून टाकले.

कार्यक्रमाचे प्रास्ताविक चांडोली बु।। शाखेचे कार्याध्यक्ष प्रा. लक्ष्मण थोरात यांनी केले. आभार कार्यवाह प्रा. प्रभाकर मावकर यांनी मानले. या कार्यक्रमास शाखेचे अध्यक्ष श्री. दत्तात्रय थोरात, कार्यवाह प्रा. रतिलाल बाबेल, कोषाध्यक्ष शंकर धिमते उपस्थित होते.

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा सोलापूर (मुख्य शाखा)

**दि. २४ – २५ मार्च २०१८ :** ग्रंथ तुमच्या दारी : कुसुमाग्रज प्रतिष्ठान, नाशिक व मसाप, शाखा सोलापूर यांच्या संयुक्त विद्यमाने 'ग्रंथ तुमच्या दारी' या उपक्रमांतर्गत 'पुस्तक घ्यावे, पुस्तक घ्यावे' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले. कार्यक्रमाचे उद्घाटन आकाशवाणी, सोलापूरचे कार्यक्रम अधिकारी सुनील शिनखेडे यांचे हस्ते झाले. या वेळी मसाप पुणेच्या उपाध्यक्षा निर्मला ठोकळ यांची प्रमुख उपस्थिती होती. कुसुमाग्रज प्रतिष्ठानचे विनायक रानडे व मधुरा बापट यांनी या उपक्रमाचा हेतू व प्रतिसादाबद्दल माहिती दिली.

## मसाप, पिंपरी-चिंचवड शाखा

**१. दि. ६ जानेवारी २०१८ :** मसाप, पिंपरी चिंचवड शाखेतर्फे माउली गार्डन निगडी प्राधिकरण येथे सई परांजपे लिखित 'सख्खे शेजारी' या नाटकाचा नाट्यअभिवाचनाचा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. कवयित्री इंदिरा संत यांच्या काव्यावर आधारित 'इंदिरा संत - एक आविष्कार' यावर डॉ. रजनी शेठ यांचे व्याख्यान आयोजित करण्यात आले.

**२. दि. ९ फेब्रुवारी २०१८ :** चाकण (ता. खेड) येथे मसाप पिंपरी चिंचवड शाखा व मनःशक्ती केंद्र, लोणावळा यांच्या संयुक्त विद्यमाने 'बालकुमार साहित्य संमेलन' आयोजित करण्यात आले. सदर संमेलनाचे उद्घाटन मसाप पुणेचे कार्याध्यक्ष मिलिंद जोशी यांच्या हस्ते संपन्न झाले. व्यासपीठावर संमेलनाच्या अध्यक्षा ज्येष्ठ साहित्यिक सौ. इंदुमती जोंधळे आणि आमदार सुरेशभाऊ गोरे, मन:शक्ती केंद्राचे विश्वस्त प्रमोद शिंदे, मसाप परिषद पिंपरी चिंचवडचे अध्यक्ष राजन लाखे उपस्थित होते.

**३. दि. १० फेब्रुवारी २०१८ :** मसाप पिंपरी चिंचवड शाखा व रामकृष्ण मोरे महाविद्यालय निगडी यांच्या संयुक्त विद्यमाने मराठी भाषा गौरव दिनानिमित्त 'विद्यार्थी काव्य संमेलन' आयोजित करण्यात आले. या वेळी राजन लाखे यांनी 'काव्यलेखन एक कला' या विषयावर आपले विचार मांडले. महाविद्यालयाचे प्राचार्य एम. जी. चासकर हे अध्यक्षस्थानी, तर व्यासपीठावर प्रा. अपर्णा पांडे, विनिता ऐनापुरे, सौ. माधुरी मंगरूळकर उपस्थित होते.

**४. दि. २७ फेब्रुवारी २०१८ :** रोजी शाखेतर्फे सायंकाळी ६ वाजता 'मराठी भाषा दिना'निमित्त 'मी मराठी' या विषयावर मसाप पिंपरी चिंचवड शाखेच्या कार्यालयामध्ये कविसंमेलन आयोजित करण्यात आले. सदर कार्यक्रमात ३५ कवींनी सहभाग घेतला.

**५. दि. २८ फेब्रुवारी २०१८ :** रोजी मसाप पिंपरी चिंचवड शाखा व स्वातंत्र्यवीर सावरकर मंडळ यांच्या संयुक्त विद्यमाने सावरकरांच्या स्मृतिप्रीत्यर्थ सिने-नाट्यअभिनेते योगेश सोमण प्रस्तुत 'मी विनायक दामोदर सावरकर' या कार्यक्रमाचे आयोजन करण्यात आले.

**६. दि. ११ मार्च २०१८ :** मसाप पिंपरी चिंचवड शाखेतर्फे महिला दिनानिमित्त 'कवयित्री काव्यसंमेलन' आयोजित करण्यात आले. तसेच विविध क्षेत्रात उत्कृष्ट काम करणाऱ्या महिलांचा सदर दिवशी सन्मान करण्यात आला. डॉ. मीनल लाड- वैद्यकीय क्षेत्र, सायली सांभारे- अभिनय व गायन क्षेत्र, संजीवनी पांडे- सामाजिक क्षेत्र व प्रज्ञा जगताप - औद्योगिक क्षेत्र, डॉ. समिता टिल्लू - आध्यात्मिक क्षेत्र.

**७. दि. २२ एप्रिल २०१८ :** मसाप पिंपरी चिंचवड शाखेतर्फे राज्यस्तरीय कथा व काव्यस्पर्धातील विजेत्यांचा पारितोषिक समारंभ व मराठी प्राध्यापकांचा विशेष सत्कार हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला. त्या वेळी प्रमुख पाहुणे मसाप पुणेचे प्रमुख कार्यवाह प्रकाश पायगुडे, पिंपरी चिंचवड मनपाचे सत्तारूढ पक्षनेते श्री. एकनाथ पवार, नगरसेवक नामदेव ढाके, सामाजिक कार्यकर्ते श्री. शेखर चिंचवडे उपस्थित होते.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषद, शाखा विश्रांतवाडी, पुणे

विश्रांतवाडी शाखा व पुणे मनपाच्या मराठी भाषा संवर्धन समितीच्या समन्वयाने आणि महिला दिनाच्या निमित्ताने काव्यमैफल आयोजित करण्यात आली होती. या कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान प्रा. डॉ. निशा भंडारे यांनी भूषविले. प्रमुख पाहुणे म्हणून उपमहापौर डॉ. सिद्धार्थ धेंडे उपस्थित होते. या वेळी महिला पवार, कवयित्री शिल्पा परुळेकर, अपर्णा बन्नगरे, प्रा. नीलिमा बाकरे आदी उपस्थित होते. कार्यक्रमाचे आयोजन रमेश जाधव, विजय कांबळे, गणेश पारखे, सुरेश पाटोळे, आनंद गायकवाड, बाळकृष्ण बाचल यांनी केले.

---

## शाखा मंगळवेढा (सोलापूर)

**१. दि. १५ एप्रिल २०१८ :** रोजी मसाप शाखा मंगळवेढा आयोजित राज्यस्तरीय पुरस्कार वितरण सोहळा सुशीलकुमार शिंदे यांच्या हस्ते संपन्न झाला.

**२. माधव पवार यांचा शाखेच्या वतीने सत्कार :** मसाप शाखा मंगळवेढ्याच्या वतीने या सत्काराचे आयोजन करण्यात आले होते. या वेळी इंग्लिश स्कूल आंबे चिंचोलीचे मुख्याध्यापक रामेश्वर भुसे, लेखक संजीव जाधव, चित्रकार वल्लभ शिंदे, गणेश यादव, कवी शिवाजी सातपुते, रामचंद्र हेंबाडे, हृषिकेश गायकवाड आदी मान्यवर उपस्थित होते.

**३. चिमुकल्यांसाठी काव्यसंवाद आणि बालकवितांचा धमाल सोहळा :** कार्यक्रमाचे उद्घाटन मुख्याधिकारी नीलेश देशमुख यांच्या हस्ते झाले तर अध्यक्षस्थानी कामसिद्ध विद्यालयाचे मुख्याध्यापक तुकाराम मेटकरी हे होते. विस्तार अधिकारी बजरंग पांढरे, प्रा. विनायक कलुबर्मे, शाखा अध्यक्ष सुरेश पवार, राजकुमार पांढरे उपस्थित होते.



अनुक्रमणिका

